# प्रास्ताविक



आर्यापति मयूरपंडित यांचें नांव ऐकिलें नाहीं, असा मराठी वाचक विरळा. तथापि मोरोपंतांच्या काव्यसंपदेबद्दल आज बरींच वर्षें गैरसमज माजून राहिला आहे, हेंही तितकेंच खरें. कोणी त्यांना केवळ भाषांतरें किंवा अनुवादक समजून स्वतंत्र कविपदवी नाकारतात, तर कोणी त्यांना रघुकिरातादि पंडितमान्य काव्यांची तोंडओळखही नव्हती असें मानून, त्यांचें विद्वत्पदही हिरावून घेतात. वास्तविक हीं अर्धवट मतें पंतकाव्याचें सखोल आलोडन न केल्यामुळेंच प्रसृत झालेलीं आहेत. ज्या संस्कृत पुराण-ग्रंथांचीं केवळ भाषांतरेंच पंतांनीं केलीं, असे हे आक्षेपक मानतात, त्या पुराण-ग्रंथांशीं पंतकाव्याची तुलना करून पाहिल्यास कोणाही रसिकास पंतांच्या अंगच्या स्वतंत्र काव्यशक्तीचा प्रभाव जाणवल्याशिवाय राहणार नाहीं. पंतांची काव्यरचना इतकी अवाढव्य व विविध आहे कीं, प्राचीन मराठी काव्यवाङ्मयांत दासोपंत व वामनपंडित हेच कायते दोघे, त्यांच्याशीं ग्रंथसंख्येंत बरोबरी करतील. पंत विद्वान नव्हते हें मत, केवळ त्यांची उत्तर-कालीन साधी व सोपी वाटणारी प्रासादिक काव्यनिर्मिति, 'नवनीता'च्या द्वारां जी कांहीं थोडी चाखावयास मिळाली, तिच्यावरूनच अधीर वृत्तीनें बनविलें गेलें आहे. पण त्यांच्या दीर्घकालीन वाङ्मयसेवेची उत्पत्ति उत्क्रांत्ति, व परिणति यांचें सूक्ष्म अवलोकन करणारांस त्यांच्या ठिकाणीं असणारे विद्वत्ता, शास्त्रपारंगतता, रसिकता व स्वतंत्रता, हे गुण पहावयास मिळाल्याशिवाय राहणार नाहींत.

मोरोपंतांचा जन्म पन्हाळगडावर शके १६५१ सौम्यनाम संवत्सरीं झाला. त्यांच्या वडिलांचें नांव रामाजीपंत व आईचें लक्ष्मीबाई. पंतांच्या पूर्वजांचें मूळ गांव सौंदळ असलें, तरी त्यांच्या जन्मापूर्वीच त्यांचे वडील पन्हाळगडीं स्थायिक झाले होते. तेथेंच केशव पाध्ये व गणेश पाध्ये या दोघां विद्वानांच्या हाताखालीं पंतांचें, संस्कृत काव्य-व्याकरणाचें शिक्षण झालें. हें शिक्षण चालू असतांच किंवा संपल्यावर, पंतांनीं आपली ग्रंथरचना सुरू केल्याचें दिसतें. ग्रंथकारानें किंवा कवीनें नुकत्याच संपविलेल्या अध्ययनाचा त्याच्या ग्रंथनिर्मितीवर विशेष परिणाम आपाततः झाल्याशिवाय रहात नाहीं. पंतांच्या कुशलवोपाख्यानांतील समासबद्ध,

रचना, अपरिचित संस्कृत शब्दयोजना, ओबडधोबड भाषा, अलंकारप्राचुर्य, विविध वृत्तांचा अवलंब, रघुवंशाचा प्रत्यक्ष संस्कार, इत्यादि गोष्टी पहिल्या म्हणजे, नुकत्याच झालेल्या पंचमहाकाव्यांच्या व विशेषतः रघुवंशाच्या अभ्यासानंतरच प्रस्तुत आख्यान त्यांनीं रचिलें असावें, असा तर्क होतो, व शके १६७२ च्या मार्गशीर्षांत त्यांनीं रघुवंश लिहून घेतल्याच्या उल्लेखावरून तर तो दृढ होतो. रघुवंशाच्या सूक्ष्म अभ्यासानेंच त्यांना 'कुशलवाख्यान' रचण्याची स्फूर्ति झाली असावी. म्हणून शके १६७२–७३ हें वर्ष, या आख्यानाच्या रचनेचें किंवा त्यांच्या काव्यरचनाप्रारंभाचेंच म्हणावयास प्रत्यवाय नाहीं.

पुढें बारामतीस बाबूजी नाईकाकडे कायमचें वास्तव्य करीपर्यंत पंतांनीं आपल्या वयाचीं २८।२९ वर्षें पन्हाळगडावरच अध्ययनांत व ग्रंथरचनेंत घालविलीं. या कालांत त्यांनीं कुशलवाख्यान, ब्रम्होत्तरखंड, कृष्णविजय ( पूर्वार्ध ), प्रल्हाद चरित्र, अशी काव्यरचना केली. पंतांना पन्हाळगड सोडून जाण्यास कोणतें राजकीय कारण घडलें, याबद्दल आज जरी निश्चित सांगतां आलें नाहीं, तरी बारामतींत केलेल्या ग्रंथलेखनाच्या मितीवरून शके १६८० च्या पुढें केव्हां तरी ते पन्हाळ्यास राम राम ठोकून बारामतीस कायमचे आले असावे. तेथें आल्यावर सीतागीत व रुक्मिणीगीत हीं गीतें, नाइकांच्या मुलीबाळींना झोपाळ्यावर म्हणण्यासाठीं जशी त्यांनीं रचलीं, तशींच आपल्या पुराणिकाच्या धंद्यास अनुसरून मदालसाचरित्र, हरिश्चंद्राख्यान व देवीमहात्म्य हीं प्रकरणें निरनिराळ्या पुराणांतील कथांच्या आधारें त्यांनीं आपल्या प्रौढ श्रोत्यांसाठीं रचलीं.

शके १६८३ ते १६९४ या सुमारें अकरा वर्षांच्या कालांत, बारमतीकरांच्या घरीं उत्तम स्वास्थ्य लाभल्यामुळें, पंतांच्या हातून विविध व विपुल अशी काव्य-रचना झाली. यांपैकीं पहिल्या पांच वर्षांतील रचना विशेषतः श्लोकबद्ध असून तिच्यांत कृष्णविजय ( अ. ५०–७९ ), सुदामचरित्र, भस्मासुरआख्यान, नद्यांचीं व देवतांचीं स्तोत्रें, यांचा समावेश होतो. पुढील सहा वर्षांत झालेल्या रचनेचें स्वरूप आर्याबद्ध असून, तिच्यांत कृष्णविजय ( संपूर्ण ), मंत्ररामायण, संशयरत्नावलि, आर्याकेकावलि, सन्मनोरथराजि इत्यादि प्रकरणें प्रामुख्यानें झळकतात. पंतांच्या प्रारंभींच्या काव्यरचनेचा भर विशेषतः पुराणग्रंथांवर होता, तर या व पुढील कालां-तील काव्यरचना बहुतांशी स्वतंत्र, अथवा भारत भागवत रामायणासारख्या राष्ट्रीय ग्रंथांवर आधारलेली आढळते. प्रारंभींचें त्यांच्या रचनेचें अनुवादात्मक स्वरूप

पालटून ती हळूहळू भावनामय व आत्मप्रवण बनूं लागली होती. कवीचा किंवा लेखकाचा आत्मप्रत्यय व अनुभव जसजसा वाढत जातो, तसतसा तो अधिक आत्मनिष्ठ होतो, याचें प्रत्यंतर मोरोपंतांच्या याच कालांत रचलेल्या संशयरत्नमाला किंवा आर्याकेकावलि या भक्तिमय प्रकरणांत उत्तम पहावयास सांपडतें.

यापुढील दहा वर्षांचा म्हणजे शके १६९४ ते १७०४ हा काल पंतांच्या परिणत प्रज्ञेचाच विलास होय. या कालांतील त्यांची प्रमुख रचना म्हणजे आर्याभारत ही असून 'आर्यापति' हें सार्थ नांव प्राप्त करून देण्यास ती विशेष कारणीभूत झाली आहे. 'आर्याभारत' हा काव्यग्रंथ जरी महाभारताच्या अठरा पर्वांच्या आधारें रचला असला, तरी पंतांनीं संक्षेप विस्ताराच्या अपूर्व योजनेनें आपलें औचित्य व रसिकता, तेथें उत्तम दाखविली आहे. यांतील स्वतंत्र उपमादिअलंकारांचा थाट व कोणताही प्रसंग मुळापेक्षांही अधिक सरस वठवण्याचें अपूर्व कौशल्य पाहिलें असतां, या ग्रंथास महाभारताचा अनुवाद असें म्हणण्याची कोणाची छाती होणार नाहीं. स्वतंत्र अशा दृष्टांत–अर्थांतरन्यासरूपानें पंतांनीं आपले व्यावहारिक अनुभवच येथें ग्रथित केल्यामुळें, पंतांसारख्या कुटुंबवत्सल गृहस्थाच्या अंतःकरणाचें प्रतिबिंब या ग्रंथांत सर्वत्र पडलेलें आढळतें. हृदयाला भिडणारीं साधीं सुटसुटीत संभाषणें, सत्प्रवृत्तीचा उपदेश करणारीं अनेक नीतिवचनें, प्रसंगांची सरसता व सहृदयता, कल्पनेची नवीनता व भाषेचा प्रसाद या अनेक गुणांमुळें, पंतांचें 'आर्याभारत' महाभारताच्या अनेक मराठी अवतारांत महाराष्ट्रीय वाचकांच्या आदरास विशेष पात्र ठरलें आहे. पंतांची प्रारंभींची समासघटित व संस्कृतशब्दप्रचुर रचना, व या ग्रंथाचें घरगुती व शुद्ध मराठी भाषेचें वळण, यांतील विरोध लक्षांत येऊन पंतांच्या रचनेचा व मनाचा होत आलेला आल्हादकारक विकास येथें कळसास पोंचल्याचें आढळतें.

पुढील शके १७०५ ते १७१० या सुमारें पांच वर्षांत पंतांनीं हरिवंश, मंत्रभागवत व मंत्ररामायण अशी थोडी निराळी रचना केली. भक्तीचे भुकेले असल्यामुळें, पंतांनीं हरिवंशाच्या मिषानें यदुवंशवर्णन करून आपली कृष्णभक्ति जशी व्यक्त केली आहे, तसेच निरनिराळ्या मंत्ररचनेचें बंधन मुद्दाम निर्माण करून, श्रीकृष्ण व श्रीराम यांचीं चरित्रें पुनःपुन्हा गाण्याची व वर्णन करण्याची संधि त्यांनीं साधली आहे. तथापि ही मंत्रात्मकरचना आर्याभारताच्या मानानें थोडी क्लिष्ट व कृत्रिम वाटते, यांत वाद नाहीं. कदाचित् निरंजनमाधवासारख्या आपल्या स्वकालीन

कवीनें केलेली निर्वोष्टरचना व मंत्रात्मकरचना पाहून आपणही तशीच पण त्याहून प्रदीर्घ रचना करून हें रचनाकौशल्य दाखवावें, असा मोह त्यांच्या-सारख्या शब्दप्रभूस होणें साहजिक होतें, व तशा मोहाला बळी पडूनच मंत्र साधण्याचीं बंधनें अंगावर घेतल्यामुळें, त्यांच्याकडून ही शब्दाच्या कसरतीची करामत झाली असावी. पण अशा नियमबद्ध रचनेंतही पंतांची बुद्धिमत्ता व श्रमसातत्य, विद्वान् वाचकाला कौतुकास्पद वाटेल.

'काशीस जावें नित्य वदावें' या म्हणींत व्यक्त झालेली, हिंदवासियाच्या मनाची काशीयात्रेस जाण्याची उत्सुकता पंतांच्यासारख्या अनुपमेय ईश्वरभक्तांत कशी नसेल? महाभागवत, महाभारत व रामायण या प्रदीर्घ ग्रंथांची रचना करून आपलें वाङ्मयध्येय साधल्यानंतर कृतकृत्य होत्सात्या पंतांनीं, शके १७१० त अमरसिंह जाधवाबरोबर काशीस जाण्याची चालून आलेली संधि साधली. यात्रेंत ते दोन वर्षें होते. पण या दोन वर्षांतही त्यांनीं काशीयात्राविषयक बरींच प्रकरणें रचलीं. गंगेंत स्नान घडल्यानें आपला उद्धार होत असतां, आपल्या गांवीं राहिलेल्या अठरापगड जातींच्या स्वकीयांचें, व आपल्या राजेरजवाड्यांचें व सरदारांचें स्मरण, प्रेमळ अंतःकरणाच्या मोरोपंतांना होऊन त्या सर्वांच्या उद्धारार्थ त्यांनीं गंगेजवळ केलेली तरफदारी, 'गंगावकिली' व 'विष्णुपदवकिली' या दोन अत्यंत भावनामय स्तोत्रांत मोठ्या जिव्हाळ्यानें व्यक्त झाली आहे. भावनाशील मनुष्य उतारवयांत, मृत्यु समीप आल्याची जाणीव झाल्यावर अधिकच भावनामय बनून ईश्वराकडे ओढला जातो. काशीयात्रेस जाण्यापूर्वीच पंतांच्या मनाची अशी स्थिति झाल्याचें, त्यांच्या अनेक मधुर व भक्तिभावानें ओथंबलेल्या देवतास्तोत्रांवरून स्पष्ट होतें. पंतांच्या मनाची ही विकल व कातर स्थिति काशीयात्रेंत व नंतरही बराच वेळ टिकून राहिली असावी. 'केकावली' या आपल्या शेवटच्या श्लोकबद्ध स्तोत्रांत त्यांनीं आपली असहायता मोठ्या कळवळ्यानें व्यक्त करून, स्वोद्धारार्थ परमेश्वराला मोठ्या आतुरतेनें पण आपुलीकीनें आळविलें आहे. केकावलीरचनेनंतर मोरोपंत फार दिवस इहलोकीं राहिले नसावे. ते शके १७१६ चैत्र शुद्ध पौर्णिमेस, हनुमज्जयंतीचे पुण्यदिवशींच कैलासवासी झाले.

प्राचीन मराठी काव्यलतिकेचे पंत हें शेंडेफळ होय. पण इतर अनेक कवींप्रमाणें मोरोपंत कोणत्याहि अध्यात्मिक सांप्रदायाचे अभिनिवेशी किंवा पुरस्कर्ते नव्हते. ते एक कुटुंबवत्सल विद्वान, रसिक व सहृदय पुराणिक होते. कवित्वशक्ति उपजतच

असल्यामुळें आपणास सांगावयास लागणारीं पुराणें, थोडक्यांत पण चटकदारपणें आपल्या श्रोत्यांपुढें मांडतां येण्यासाठीं त्यांनीं तीं मराठींत आणलीं. पुराणांतील लांबलचक वर्णनांनीं व भाकडकथांनीं कंटाळा न यावा म्हणून, मूळ कथेला आपल्या स्वतंत्र कल्पनेच्या त्यांनीं दिलेल्या उजाळ्यामुळें, पंतांचे सर्व ग्रंथ नाविन्यपूर्ण झाले आहेत. महाभारत–रामायणादि संस्कृत पौराणिक ग्रंथ, सामान्य मराठी वाचकालाही सुगम होऊन समाजांत सत्प्रवृत्ति वाढावी, हीच भूमिका आपल्या चाळीस वर्षांच्या दीर्घकालीन ग्रंथरचनेंत त्यांनीं स्वीकारली आहे. भक्तीच्या द्वारा कुटुंबवत्सल गृहस्थासही संसारसागर तरून जातां येतो, हेंच पंतांच्या शिकवणीचें रहस्य त्यांनीं स्वतःच्या उदाहरणानें उकलून दाखविलें आहे.

प्रस्तुत कुशलवाख्यान हें मोरोपंतांचें अगदीं पहिलें काव्य होय, हें वर सांगण्यांत आलेंच आहे. याला आधार म्हणून काव्यसंग्रहकारांनीं खालीलप्रमाणें मुद्दे दिले आहेत. "(१) या काव्याची रचना व वर्णनशैली यांत संस्कृत महाकाव्यपंचकाचें अनुकरण जितकें स्पष्ट दृष्टोत्पत्तीस येतें, तितकें इतरत्र येत नाहीं. (२) इतर मोठीं काव्यें पंतांनीं आपले गुरु, गुरुपुत्र, यजमानपुत्र, हरिदास इत्यादिकांच्या सांगण्यावरून रचिलीं आहेत व वारंवार त्यांत त्यांचें साह्य घेतलें होतें, असें पंतच आपल्या त्या त्या काव्यांतून लिहितात. प्रस्तुत प्रकरणांत त्यांनीं तसें कोठेंच लिहिलें नाहीं, व कोणाचा उल्लेखहि केला नाहीं. तेव्हां आपल्या काव्यशक्तीचा पुरा प्रत्यय आला नसल्यामुळें, पंतांनीं आपलें आद्यकाव्य त्याची स्फुटता न करतां लिहिलें, व हें जेव्हां सर्वांनीं पाहिलें, तेव्हां त्यांनीं पंतांच्या कवित्वशक्तीचें कौतुक केलें असलें पाहिजे व त्यानंतर पुढें त्यांची काव्यशक्ति पाहूनच कित्येकांनीं त्यांस नवीन काव्यविषय सुचविले असावेत. (३) तिसरा आधार भाषेचा. पंतांच्या इतर काव्यांच्या मानानें यांतील भाषा कमी सफाईदार दिसते. विशेषें करून या काव्यांतील कित्येक यमकें पाहण्यासारखीं आहेत. पंतांचें इतर कोणतेंही सयमक काव्य घेतलें, तर त्याचें यमकांत, निदान अंत्य अक्षर व उपांत्य स्वर इतकीं तरी जुळतात. उपांत्य स्वरांत भेद बहुधा कोठेंही आढळत नाहीं. परंतु प्रस्तुत काव्यांत 'पुसे-वसे' सिंधो-बंधो, अशीं यमकें आढळतात. (४) चवथा आधार मंगलाचरणाचा. यांत रामायणाचा कर्ता वाल्मीकि किंवा महाभारताचा व पुराणांचा कर्ता व्यास यांस वंदन मुळींच नाहीं. तेव्हां रामायण, भारत, भागवत व पुराणें लक्ष्यपूर्वक वाचण्याच्या पूर्वी व आपल्या काव्यशक्तीचा ओघ त्यांकडे वळविण्यापूर्वी हें

काव्य रचिलें असलें पाहिजे, असें वाटतें. तेव्हां प्रस्तुतचें काव्य पंतांनीं आपल्या ऐन उमेदींत म्हणजे २०–२१ वर्षांचें असतां पन्हाळगडीं, गुरुगृहीं इ. स. १७५० चे सुमारास लिहिलें असावें. यानंतरचें काव्य 'ब्रह्मोत्तरखंड' होय. तें गुरुपुत्र सदाशिवाच्या सांगण्यावरून पंतांनीं पन्हाळगडीं सन १७५१–५२ चे सुमारास रचिलें असावें. 'ब्रह्मोत्तरखंडा'ची भाषा प्रस्तुत काव्याच्या भाषेपेक्षां अधिक वळणशुद्ध आहे." काव्यसंग्रहकारांनीं काढलेले हे निष्कर्ष सयुक्तिक अतएव बहुधा मान्य होण्यासारखे आहेत. तथापि रचनेच्या बाबतींत किंवा वर्णनशैलींत संस्कृत पंचमहाकाव्याचें अनुकरण येथें स्पष्ट दृष्टोत्पत्तीस येतें असें जें ते म्हणतात, तें मात्र तितकेंसें पटण्यासारखें नाहीं. संस्कृत महाकाव्याला अवश्य असणारी सर्गबद्ध किंवा अध्यायात्मक रचना येथें दिसली तरी, नायक-नायिकांचीं स्वरूप-वर्णनें, नगरीचीं संपन्न वर्णनें व चंद्रोदयासारखीं आल्हाददायक वर्णनें, इत्यादिकांचा या आख्यानांत अभावच दिसत असल्यामुळें, पंतांनीं येथें महाकाव्याची धर्ती आपल्या नजरेपुढें धरली असेल असें म्हणवत नाहीं. रघुवंश वाचीत असतां त्यांतील १४।१५ सर्गांतील कुशलवकथाप्रसंगानें, मूळ जैमिनी अश्वमेध, पंतांनीं डोळ्याखालून घालून त्याचाच फक्त अनुवाद करण्याचें धोरण स्वीकारलें असावें, व ही रचना कर-तांना मात्र त्यांनीं नुकत्याच अभ्यासलेल्या संस्कृत काव्यांचा त्यांच्या भाषेवर व कल्पनेवर झालेला संस्कार त्यांस टाळतां आला नसावा, एवढेंच फार तर आज म्हणतां येईल. कुशलवाख्यानावरच प्रथमतः रचना करण्याची स्फूर्ति मोरोपंतांना कां झाली असावी, याची थोडी कारणमीमांसा करतांना, "यांत वर्णिलेल्या बालवीरांचे पराक्रम वाचून याच सुमारास उदगीरच्या लढाईचे वेळीं गाजवलेल्या सदाशिवराव-भाऊंच्या पराक्रमांची आठवण सहज होते. व एक मत असेंही वाटतें कीं, सदाशिव-रावभाऊंच्या पराक्रमाची कानावर आलेली हकीकत हातानें या काव्यांत उतरली असेल," असें कै. भाव्यांनीं[1] जें विधान केलें आहे, तें मात्र सर्वस्वी चुकीच्या अनुमानावर आधारलेलें आहे, असें म्हणावें लागतें. उदगीरची लढाई, सदाशिवराव-भाऊनें सन १७६० त जिंकली, व आमच्या पंतांनीं तर आपलें हें आख्यान सन १७५०–५१ त पुरें केलें होतें. मग त्यांत पुढें जवळ जवळ १० वर्षांनीं घडलेल्या उदगीरच्या वीराच्या पराक्रमाचें प्रतिबिंब कसें पडणार ? सदाशिवरावभाऊंच्या या लढाईपूर्वीच्या पराक्रमांना अनुलक्षून हें आख्यान पंतांनीं

---

१ महाराष्ट्र सारस्वत–भाग २, पृष्ठ २१२ (आ. ३)

रचलें असावें, असें मानण्यासही सबळ पुरावा नाहीं. कारण हें आख्यान रचतांना व तत्पूर्वी पंतांचें वास्तव्य पुण्यापासून बऱ्याच लांब अशा पन्हाळगडीं असल्यामुळें, अल्पवयी मोरोपंतांना, सदाशिवरावभाऊंचे पराक्रम नेमके ऐकण्याचें कुतूहल असेल असें वाटत नाहीं. शिवाय राजकारणाबद्दल किंवा ऐतिहासिक घडामोडींबद्दल पंतांनीं पुढें मोठेपणीं प्रत्यक्ष पानिपतसारखा रोमहर्षण प्रसंग घडला असतांही कधीं वास्तपूस्त केल्याचें दिसत नाहीं. असें राजकारणाचें ज्यांना वावडें, स्वास्थ्यांत व अलिप्ततेंत ज्यांचा जन्म गेला, निरंजनमाधवासारख्या आपल्या स्वकालीन योग्याचा व उत्तम कवीचा केवळ तो राजकारणी म्हणून आपल्या 'सन्मणिमालेंत' नामोल्लेखही करण्याचें ज्यांनीं टाळलें, त्या मोरोपंतांना आपल्या अल्पवयांत प्रस्तुत आख्यान रचतांना सदाशिवरावभाऊंच्या पराक्रमाची आठवण झाली असेल, असें म्हणणें निव्वळ धाष्टर्याचें आहे. रघुवंशासारखें महाकाव्य वाचतांना कथाप्रसंगानें जैमिनीच्या ग्रंथांतील कुशलवाख्यानाकडे गुरूंकडून कदाचित् लक्ष वेधलें गेल्यामुळें, पंतांना हें आख्यान मराठींत उतरण्याची इच्छा झाली असावी, हेंच अनुमान या आख्यानाच्या स्फूर्तीचा प्रश्न सोडवितांना अधिक सयुक्तिक ठरण्यासारखें आहे.

जैमिनी अश्वमेधाच्या २५-३६ या अध्यायांवर आपल्या कुशलवोपाख्यानाची त्रयोदशाध्यायी इमारत उभारल्याचें पंतांनीं या आख्यानाच्या प्रत्येक अध्यायाच्या शेवटच्या श्लोकांत सांगून टाकलेंच आहे. तथापि हें रचण्यापूर्वी लेखनांत व अध्ययनांत आलेल्या रघुवंशाचा स्पष्ट परिणाम या उपाख्यानावर ठिकठिकाणीं झालेला दिसतो. मोरोपंतांनीं जैमिनीच्या ग्रंथांतील पाल्हाळ गाळून व आपल्या कल्पनेचा ठिकठिकाणीं मीठमसाला घालून हा अनुवाद केला आहे. पण जेथें जैमिनीचाच कथाभाग, रघुवंशांत अधिक सरसतेनें वर्णिलेला आढळला तेथें, रघुवंशांतील त्या भागाचाही अनुवाद करून योजण्याचें धोरण त्यांनीं स्वीकारलें आहे. उदाहरणार्थ, कुशलवाख्यान अध्याय २, श्लोक २ व १८, यांत अनुक्रमें येणारें सीतेच्या दोहदलक्षणाचें, व सीतेशीं झालेल्या रामांच्या प्रेमालापांचें वर्णन, पंतांनीं रघुवंशाच्या चौदाव्या सर्गाच्या, २६।२७ श्लोकांवरून रचिलें आहे. सीतेनें लक्ष्मणाकरवीं रामास पाठविलेला निरोप जैमिनीकृतींत आहे. पण पंतांच्या कृतीवर या प्रसंगीं ( ४।५१-६८ ), रघुवंश सर्ग १४।६०-६६ या तत्सदृश प्रसंगाचीच ओझरती छाया पडली आहे. त्याचप्रमाणें असहाय अशा सीतेस वनांत पाहून वाल्मीकीनीं तिला दिलेलें आश्वासन, व तिच्या श्वशुराची व वडिलाची सांगितलेली

ओळख, जैमिनीच्या ग्रंथांत नाहीं असें नाहीं ( ५।६–१० ). पण सहृदय अशा पंतांनीं रघुवंशाच्या १४ सर्गातील हा कथाभाग देणाऱ्या ७२, ७३, ७४ व ८२ या श्लोकांच्या अनुवादाची भर घालून, मूळवर्णन उत्तम सजविलें आहे. यावरून कोणत्याही ग्रंथाचा अनुवाद करीत असतां, तो अगदीं शब्दशः करीत न बसतां जरूर तेथें रसनिष्पत्तीसाठीं, दुसऱ्या ग्रंथांतील उचित व मूळवर्णनाला उठाव देणारा कथाभाग योजण्याचें कौशल्य, पंतांच्या अंगीं अगदीं प्रथमपासूनच असल्याचें दिसून येतें.

आपलें कुशलवोपाख्यान रचतांना पंतांनीं ‘जैमिनी अश्वमेधा’च्या ज्या २५–३६ या अध्यायांचा अनुवाद केला आहे, त्यांतील हकीकत खालीं दिल्याप्रमाणें आहे. “ चवदा वर्षें वनवास भोगून व रावणाला मारून राम आपल्या पत्नीसह अयोध्येस परत आले. त्यांच्या आगमनानें राजघराण्यांतील आप्तस्वकीयांना व अयोध्येंतील प्रजाजनांना आनंद झाला. रामांनीं राज्याचा स्वीकार केल्यामुळें, पृथ्वीवर दुःखाचा लवलेश राहिला नाहीं, इतकेंच नव्हे तर प्रत्येक व्यक्तिमात्राची इच्छा परिपूर्ण झाली. वनवासाच्या कष्टदायक दुःखानंतर पत्नीच्या सुखद सान्निध्यांत रामांनाही आतां थोडें हायसें वाटत होतें. इतक्यांत एका परटानें पत्नीबद्दल काढलेल्या अनुचित उद्गारांची बातमी दूतांकडून त्यांच्या कानीं आली, व लोकांच्या आराधनाची सदैव काळजी वाहणाऱ्या रामांनीं आपल्या परमप्रिय पत्नीचा, ती गरोदर असतांनाही त्याग करण्याचें ठरवून, वनवासाचे तिला लागलेले डोहाळे पुरविण्याच्या मिषानें, लक्ष्मणा-बरोबर तिला वाल्मीकींच्या आश्रमास पाठवून दिली. या आश्रमांत काळ कंठीत असतांच सीतेनें दोन जुळ्या पुत्रांना जन्म दिला व त्यांचीं नांवें वाल्मीकींनीं ताप-साच्या नित्यक्रमाला अनुसरून अनुक्रमें कुश लव अशीं ठेवलीं. हें पुत्रद्वय वाल्मी-कींच्या देखरेखीखालीं धनुर्विद्येंत अत्यंत प्रवीण झालें.

इकडे रावणाच्या हननानें लागलेल्या ब्रह्महत्येच्या महापातकाचा परिहार कसा करावा या चिंतेंत राम असतांना, वसिष्ठादि ऋषींनीं अश्वमेध यज्ञ करण्याची त्यांना सल्ला दिली. रामांनीं त्याप्रमाणें जो कोणी आपल्या घोड्यास धरील त्यास युद्धाचें आव्हान देणारी स्वनामयुक्तपत्रिका घोड्याच्या कपाळावर बांधून घोडा सोडला, व तो फिरत फिरत अजिंक्यपत्रें घेत घेत वाल्मीकीआश्रमाजवळ आला असतां, ऋषिपुत्रांबरोबर खेळत असणाऱ्या लवानें त्यास धरलें. रामांच्या घोड्याबरोबर मोठ्या सेनेसह शत्रुघ्न चालत होता. त्याचें व लवाचें घनघोर युद्ध होऊन, लव

मूर्च्छित पडला, व शत्रुघ्नानें तशा स्थितींत त्यांस रथावर बांधून मोठ्या विजयानें अयोध्येचा मार्ग धरला.

लवानें घोडा धरल्याची व शत्रुघ्नाशीं त्याचें युद्ध होऊन तो बंदीवान झाल्याची वार्ता आश्रमस्थ सीतेला इतर ऋषिकुमारांकडून समजली. पण त्यावेळीं तिचा वडील पुत्र कुश, हा जवळच अरण्यांत व वाल्मीकीही समुद्रस्नानाला गेल्यामुळें, तिचा नाइलाज झाला. कुश संध्याकाळीं अरण्यांतून येतांच दुःखित मातेकडून त्यास लव शत्रूच्या हातीं सांपडल्याचें वृत्त कळलें. तात्काळ तो शत्रूसेनेवर चालून गेला व त्यांच्या सेनापतीला मारून व शत्रुघ्नाला जर्जर करून, लवाची त्यानें सुटका केली.

कोणा दोन ऋषिकुमारांकडून शत्रुघ्नासारख्या लढवय्याची त्रेधा उडाल्याचें रामांना कळतांच त्यांना सखेदाश्चर्य वाटून, या दोन कुमारांना पकडून आणण्यासाठीं त्यांनीं लक्ष्मणास पुन्हाः मोठ्या सेनेसह पाठविलें. पण कुशलवांच्या प्रभावापुढें लक्ष्मणाचीही तीच गत झाली. रामांना मोठी काळजी उत्पन्न झाली. इंद्रजिताचा वध करणाऱ्या लक्ष्मणालाही मूर्च्छित करणारे हे दोन ब्राह्मणकुमार कोण, हें समजून घेण्याची त्यांना उत्कंठा लागली. तशांतही ते आपल्याच तोंडावळ्याचे आहेत हें कळतांच त्यांचें कुतूहल विशेषच जागृत झालें. या ऋषिपुत्रांना धरून आणण्याच्या कामीं रामांनीं पुनः भरताची योजना केली. पण भरताचेंही कांहीं चाललें नाहीं. कुशलवांनीं आपल्या प्रमोहनास्त्रानें भरताला व नलनील, हनुमान् व जांबुवंत इत्यादि वीरांना मोहित केलें, इतकेंच नव्हे, तर नलनीलादि वानरांची कुमारांना मोठी मौज वाटून त्यांनीं त्यांना आपल्या आईस दाखविण्यासाठीं आश्रमास नेलें. सीतेनें सर्व वानरमुख्यांना ओळखलें.

आपण पाठविलेले आपले तीन पराक्रमी बंधु, दोन यःकश्चित् ब्राह्मणकुमारांकडून पराभूत झालेले पाहून राम स्वतःच युद्धासाठीं मोठ्या रागानें वाल्मीकी आश्रमास आले. रामांचें व कुशलवांचें मोठें युद्ध होऊन रामही मूर्च्छित केले गेले. हें वृत्त समुद्रस्नानाहून परत आलेल्या वाल्मीकींना कळतांच त्यांना फार वाईट वाटून, ते राम पडल्याजागीं कुमारांसह आले. रामांना त्यांनीं सावध करून कुमारांची खरी हकीकत सांगितली. विनापराध त्याग केलेल्या सीतेची व त्यांची भेट करविली. राम आपल्या पत्नीपुत्रांसह मोठ्या आनंदानें अयोध्येस परत आले, व पुढें रीतसर अश्वमेध यज्ञ झाला." या कथाभागांत व रघुवंशाच्या

याच प्रसंगाच्या कथाभागांत बरेंच अंतर आहे. जैमिनी: अश्वमेधांत सीतेबद्दलचा अपवाद, परटाच्या तोंडून ऐकून दूतानें रामास सांगितला. रघुवंशांत नागरिकांच्या तोंडून तो ऐकल्याचें दूत सांगतो. आपले डोहाळे पुरविण्याच्याच प्रामाणिक हेतूनें आपल्या पतीनें आपणांस वनांत धाडलें आहे, अशी सीतेची भोळी समजूत असून, पुढें वनांत गेल्यावर लक्ष्मणानें खरी स्थिति सांगितल्यावर तिच्या शोकास पारावार नाहींसा झाला, हें वर्णन जैमिनी व कालिदास या दोघांनीं केलें असलें, तरी कालिदासाच्या वर्णनांत सीतेच्या फसगतीची आकस्मिकता अधिक उत्कटतेनें वर्णिली असल्यामुळें, ती विशेष परिणामकारक वाटते. रामांच्या यज्ञीय अश्वाबरोबर शत्रुघ्न रक्षक म्हणून मोठ्या सेनेसह होता, व लवानें घोडा धरल्यामुळें त्याला वाल्मीकींच्या आश्रमांत युद्धासाठीं यावें लागलें, असे जैमिनीचा ग्रंथ म्हणतो, तर उलट लवणराक्षसाचें पारिपत्य करण्यासाठीं रामाज्ञेवरून जात असतां वाटेंत शत्रुघ्नाचा मुक्काम वाल्मीकाश्रमांत पडून तेथें त्याला कुशलवांचें दर्शन घडलें, व हे पुत्रद्वय रामांचे असें समजूनही वाल्मीकींच्या सूचनेवरून त्यानें हें वृत्त रामांना कळूं दिलें नाहीं, असें 'रघुवंश' या प्रसंगाचें वर्णन करतो. यज्ञीय अश्व सोडविण्यास एकामागून एक पाठविलेल्या शत्रुघ्न, लक्ष्मण, भरताचें कांहींच वृत्त न समजल्यामुळें दुःखित झालेला राम, आपल्या बंधूंना मूर्छित करणाऱ्या ब्राह्मणकुमारांचें पारिपत्य करण्यासाठीं वाल्मीकाश्रमास आल्याचा उल्लेख, जैमिनी आपल्या ग्रंथांत करतो, तर आपल्या किन्नर कंठानें रामायण गात, ठिकठिकाणीं हिंडणाऱ्या कुशलवाकडे आकृष्टचित्त होऊन रामानें त्यांना यज्ञमंडपांत आणलें, व त्यांनीं दिलेल्या माहितीवरून राम, बंधूसहवर्तमान वाल्मीकीकडे गेले व वाल्मीकीनीं सीतेची व रामांची भेट करविली, अशी कथा कालिदासानें वर्णिली आहे. कुशलवाख्यानाची कथा जैमिनीनें अश्वमेधवर्णनाच्या मर्यादित दृष्टीनें केली आहे, तर तीच कालिदासानें रामचरित्राच्या व्यापक दृष्टीनें केल्यामुळें, दोघांच्या दृष्टिकोणांत व धोरणांत असा फरक पडणें साहाजिक आहे.

जैमिनीचा ग्रंथ मराठींत आणतांना मोरोपंतांनीं त्यांतील कथाभागांत किंवा व्यक्तींच्या स्वभाववर्णनांत कांहींच फरक केला नाहीं. मात्र मूळचे पात्रांचे स्वभाव थोडे उठावदार करण्यासाठीं, त्यांना आपल्या स्वतंत्र कल्पनेची त्यांनीं जोड दिली आहे. अयोध्येस परत आलेल्या रामाची व कौसल्येची भेट (१।९) पंतांनीं आपल्या एकाच उत्प्रेक्षेनें अधिक हृदयस्पर्शी अशी वठविली आहे. रामांच्या

आज्ञेवरून सीतेला वनांत सोडतांना लक्ष्मणाच्या मनाची झालेली विकलता (४।२९-३१) वाचकांनाही क्षणभर विकल केल्याशिवाय रहात नाहीं. दोहदमिषानें सीतेची झालेली फसगत, तिनें रामांना पाठविलेला निरोप, व लक्ष्मण परत गेल्यावर तिनें केलेला विलाप, हे चवथ्या अध्यायांतील प्रसंग, निःसंशय करुणास्पद आहेत. पण रघुवंश पुढें असूनही

**वाच्यस्त्वया मद्वचनात्स राजा वन्हौ विशुद्धामपि यत्समक्षम् ।**
**मां लोकवादश्रवणादहासीः श्रुतस्य किं तत्सदृशं कुलस्य ॥**

असा जाब विचारणारी तेजस्विनी सीता, कालिदासाप्रमाणें पंतांना चित्रित करतां आलेली नाहीं. पंतांची सीता अत्यंत विनीत, पतीचें चुकीचें कृत्यही बरोबरच असें मानणारी व त्याच्या भेटीची इच्छा करणारी एक आर्यस्त्री आहे. यावरून पुढें आपल्या आर्याभारतांत

**अपराध लवहि नसतां कां हो साहील ती सती जाच ? ।**

असें सैरंध्रीबद्दल उद्गार काढणाऱ्या पंतांची स्वाभिमानी वृत्ति प्रारंभींच्या रचनेंत जागृत झाली नव्हती असें दिसतें. प्रस्तुत आख्यानांतील रामांच्या वर्तनानें मात्र त्यांच्याबद्दल वाचकांच्या साहानुभूतीला व आदराला थोडा तरी धक्का बसल्याशिवाय राहणार नाहीं. केवळ एका यःकश्चित् दारुड्या परटाच्या बरळण्यावर विश्वास ठेवून त्यांनीं आपली एक वेळ अग्नींतून शुद्ध होऊन आलेली पतिव्रता पत्नी गरोदर असतां वनांत टाकण्याचें धाडस करावें, हें सर्वथा दूषणीय होय. आपणास अत्यंत प्रिय असणाऱ्या पत्नीला "आराधनाय लोकस्य मुंचतो नास्ति मे व्यथा" असें म्हणून टाकणाऱ्या रामांची कर्तव्यनिष्ठुरता कितोही वाखाणण्यासारखी असली, तरी त्यांच्या अव्यवहारी वर्तनानें कोणाही दाक्षिण्यशील माणसास उद्वेग वाटल्यावांचून राहणार नाहीं. आपल्या अविवेकी वर्तनानें स्वतःस व दुसऱ्यांस दुःखीकष्टी करणारीं जीं माणसें जगांत वावरत असतात, त्यांचें राम हें एक प्रतीक आहे. विशेषतः आपले वनवासाचे डोहाळे पुरविण्यासाठींच आपणास वनांत पाठविण्यांत येत आहे, अशा प्रामाणिक पण सुखद कल्पनेंत स्वतःची पत्नी असतांना, तिला विश्वासघातानें वनांत सोडण्यांत रामांचा छद्मीपणा व कमकुवतपणाच व्यक्त होतो. लक्ष्मण-भरत-शत्रुघ्न हे रामाचे बंधु जसे शूर तसे विचारी असून त्यांनीं सीतात्यागा-पासून रामांना परावृत्त करण्याचा पुष्कळ प्रयत्न केला आहे. कुशलव हे मातृभक्त, व शूर वीर आहेत. अल्पवयांतील त्यांचें धाडस व पराक्रम कौतुकास्पद आहे.

राहतां राहिले वाल्मीकि. हे तर दयेचे व वात्सल्याचे केवळ सागर आहेत. असहाय सीतेस आश्रमांत आश्रय देऊन तिच्या जुळ्या मुलांना धनुर्वेदाचें व इतर योग्य शिक्षण देऊन त्यांनीं त्यांचें पुत्रनिर्विशेष पालन केलें. शेवटीं रामांची गांठ पडल्यावर आपल्या निष्पाप पत्नीचा त्याग केल्याबद्दल, त्यांचीही कानउघाडणी करण्यास ते भ्याले नाहींत, यावरून रामांचें वर्तन त्यांच्यासारख्या रामभक्ताच्याही दृष्टीला गर्हणीय वाटलें, हें स्पष्ट आहे.

कुशलवोपाख्यानाचा काव्यदृष्टीनें विचार केल्यास भावनेपेक्षां कल्पनेचा, किंवा रसापेक्षां अलंकारांचाच प्रकर्ष येथें झालेला दिसतो. जैमिनीचा मूळग्रंथ धावत्या स्वरूपाचा असल्यामुळें, भावनापरिपोषास किंवा अलंकारांच्या विलासास तेथें जागा मिळणें कठीण होतें. पण या ग्रंथाचा अनुवाद करतांना पंतांच्या मनावर पंचमहाकाव्यांचें दडपण असल्यामुळें म्हणा, किंवा मूळची त्यांची कल्पनाशक्ति जागृत झाली म्हणून म्हणा, त्यांची स्वतंत्र प्रतिभा येथें चमकली आहे. संस्कृताध्ययनाच्या पहिल्या वयांत काव्यांतील अलंकारप्राचुर्य पंतांच्या बुद्धीला विशेष आन्हादक वाटून आपलें पहिलें काव्य रचतांना, अवसर सांपडला तेथें त्यांच्या स्वतंत्र कल्पनाशक्तीनें उचल खाल्ली आहे. उत्प्रेक्षा हा अलंकार बुद्धीचा जसा नवनवोन्मेष दाखविणारा आहे, तसे अपह्नुति, व्यतिरेक व प्रतीप हे वर्ण्यविषयाचें आधिक्य वाढविणारे आहेत. पंतांच्या उत्प्रेक्षेची[1] अथवा हेतूत्प्रेक्षांचीं व अपह्नुति व्यतिरेक[4] प्रतीपांचीं[5] उत्तम उदाहरणें या काव्यांत पहावयास सांपडतात. यावरून निव्वळ भाषांतर करून समाधान मानीत न बसतां स्वतःच्या कल्पनाविलासाचा आनंद त्यांनीं वाचकांस लुटावयास लावला आहे. कुशलवाख्यान हें काव्य, व्यक्ति, स्थल व गुण यांसारख्या बाह्यवर्णनावर अधिष्ठित झाल्यामुळें, परंपरितरूपक,[6] परिकर[7] व पर्यायोक्त[8] यांसारख्या थोड्या शब्दांत अधिक अर्थ सुचविणाऱ्या अलंकारांची योजना पंतांनीं येथें सर्वांत अधिक प्रमाणांत केली आहे. स्वभावोक्तीनें[9] वर्ण्यव्यक्ति ठळक स्वरूपांत वाचकांच्या डोळ्यापुढें उभी रहाते, तर चेतनोक्तीनें[10]

---

१ कुशलवा. १।९, ३।१९, ४।१०, ४।७९. २ कुशलवा. १२।३२, १३।२. ३ कुशलवा. १।६, २।२३. ४ कुशलवा. ६।११. ५ कुशलवा. ५।२३, १२।३३. ६ कुशलवा. ३।३०, ४।२६, ५।३५, ८।७. ७ कुशलवा. ४।१५, ४।२९, ६।५. ८ कुशलवा. ९।१८, १८।५२. ९ कुशलवा. ८।३४, ३।४, ४।७०, १०।१४. १० कुशलवा. ३।२०, ७।१.

जडवस्तूंनांही चेतना येऊन वर्ण्यरसाला अधिक पुष्टि मिळते, हें महाकाव्यांतील तंत्र पंतांनीं येथें पुष्कळ वेळां अनुसरलें आहे. खरें म्हणावयाचें तर पंतांच्या उत्तरकालीन ग्रंथांतील भावनानिष्ठतेचा अजून उदय व्हावयाचा होता. त्यांच्या प्रतिभेला आत्मविश्वासाचा, अनुभवाचा व आत्मनिष्ठतेचा सुवास लागावयाचा होता. त्यांची बुद्धि अजून संस्कृत ग्रंथकारांच्या आधारानें चालत होती. त्यामुळें परिणतप्रज्ञेचें शिखर अशा त्यांच्या "आर्याभारत" या ग्रंथांत दिसून येणारा, उपमाअर्थांतरन्यासांचा झगझगाट येथें पहावयास सांपडत नाहीं. कुशलवोपाख्यानांत जागजागीं दिसणाऱ्या त्यांच्या कांहीं नीतिसृष्टींतल्या उपमांना[1] जसें जैमिनीच्या आधाराचें गालबोट लागलें आहे, तसेंच त्यांचे कांहीं अर्थांतरन्यास[2] वास्तवतेच्या अथवा अनुभवांच्या ओलाव्याच्या अभावीं, सूक्ष्मदृष्टीला पारखे झाले आहेत. सारांश, पंत अजून संस्कृत ग्रंथकारांच्या ठराविक संकेतांची कोंडी फोडून बाहेर पडलेले नव्हते.

पण वर अर्थालंकारांच्या बाबतींत जो अनुभव तोच शब्दालंकाराविषयीं वाचकांस आल्याशिवाय रहात नाहीं. पंतांनीं यापूर्वी किरात, शिशुपाल व नैषध या चित्रकाव्यात्मक महाकाव्यांचा अभ्यास केल्यामुळें, त्यांच्या श्लेषयमकानुप्रासात्मक रचनेचा पगडा त्यांच्या मनावर ताजा होता. पंतांनीं आपल्या रचनेंत संक्षेप आणण्यासाठीं क्रियादीपकें व कारकदीपकें[4] योजलीं, तर शब्दांची कसरत संस्कृत कवीप्रमाणेंच आपणासही वेळप्रसंगीं करतां येते हें दाखविण्यासाठीं श्लेष,[5] दामयमकें[6], आद्ययमकें[7] आद्यंतयमकें[8], छेकानुप्रास[9] इत्यादिकांची कोठें कोठें पेरणी केली आहे. या शब्दालंकारांनीं व परिकर, पर्यायोक्त, परंपरितरूपकासारख्या प्रदीर्घ समासान्वित विशेषणांची अपेक्षा असणाऱ्या अर्थालंकारांनीं, पंतांचें अलंकारांचें ज्ञान व शब्दप्रभुत्व हें व्यक्त होत असलें, तरी यामुळें काव्याला प्राणभूत असणाऱ्या प्रसादगुणाची सर्वत्र हानि झालेली आहे, याकडे दुर्लक्ष करून भागणार नाहीं.

तथापि या कुशलवचरित्रांतील पूर्वार्धाचें, व उत्तरार्धाचें थोडें सूक्ष्म अवलोकन केल्यास करुण व वीर या दोन रसांचा, उत्कट नसला तरी इतरांपेक्षां

---

१ कुशलवो. २।४४, १०।१०,१५,१७, १३।४. २ कुशलवो. ३।३०, ४।५४, ६१. ३ कुशलवा. १।८, ८।२९. ४ कुशलवा. ७।१४, ९।१. ५ कुशलवा. ५।३५, १३।६४. ६ कुशलवा. २।२, २।२०, ४।८५. ७ कुशलवा. ४।१६. ८ कुशलव. ४।२३, ४।७०. ९ कुशलवा. २।४५, ४।३, ४।६८

थोडा अधिक परिणाम वाचकांच्या मनावर होतो. पहिल्या नऊ अध्यायांत, अयोध्येंतील रामराज्याचें वर्णन, सीतेचे डोहाळे, लक्ष्मणाकरवीं तिचा त्याग, सीतेचा वनांतील शोक, तपोवनांतील पशुपक्ष्यादिकांनीं तिच्याबद्दल दाखविलेली सहानुभूति, वाल्मीकीनीं सीतेस दिलेलें आश्वासन व त्यांच्या आश्रमांत झालेला तिचा सत्कार, कुशलवाचे जन्म व त्यांचें शिक्षण, लवानें रामांचा यज्ञाश्व धरणें, व युद्धांत तो शत्रुघ्नाचा बंदीवान् होणें, सीतेचा लवाबद्दल शोक व कुशानें केलेलं तिचें सांत्वन, इतके प्रसंग जैमिनीच्या आधारेंच पंतांनीं रचिले असले, तरी सीतेनें दोन वेळ ( सर्ग ४ व ९ ) केलेला शोक, व कुशानें वियोगिनी वृत्तांत केलेलें तिचें सांत्वन ( ८।१५, १६ ), हे प्रसंग करुणरमणीय वठले आहेत. मात्र यांत सीतेच्या तोंडीं घातलेलीं कांहीं परंपरितरूपकें अशा दुःखाच्या वेळीं थोडीं रसहानिकारक झालीं आहेत. काव्याच्या उत्तरार्धांत म्हणजे शेवटच्या चार अध्यायांत, कुश व लव यांचें, शत्रुघ्न, लक्ष्मण, भरत व राम यांशीं झालेल्या युद्धाचें वर्णन आलें आहे. पण त्यांतहि, युद्धांत परस्पर मदतीस धांवणाऱ्या कुशलवांना अनुक्रमें वायु व अग्नि यांची उपमा देणें, रक्ताच्या नद्या वाहणें, मुंडक्यांचे ढीग पडणें, शत्रूला यमराजधानीला धाडणें, अथवा 'तुझ्या मांसानें कोल्हे गिधाडे तर्पितों' असें वीरांनीं परस्परांना म्हणणें, इत्यादि कायम ठशाच्या वर्णनांनीं, वीररसाची जाज्वल्यता यावी तशी प्रत्ययास येत नाहीं. पंतांची सर्व भिस्त, संस्कृत पंचमहाकाव्यांसारख्या पुस्तकी ज्ञानावर असल्यामुळें अलंकारांचीं कारंजीं आपल्या काव्यांत त्यांस सर्वत्र उडवितां आलीं. पण उत्कट भावनेच्या, अनुभवाच्या, व सूक्ष्मावलोकनाच्या अभावीं कोणत्याही रसाचा जिवंत झरा त्यांना आणून सोडतां आला नाहीं. स्वतः पंतांना मात्र हें आपलें काव्य विशेष आवडलें होतें, असें 'नामरसायनां'त त्यांनीं, 'बा हे रीति पहावी मज तों वाटे सुधानदी वाहे,' या काढलेल्या उद्गारावरून उघड दिसतें. पण पंतांचे हे बोल आत्मविश्वासाचे न मानतां, प्रथमकाव्यनिर्मितीच्या उल्हासाचेच निदर्शक मानणें, अधिक सयुक्तिक होईल.

आतां हें आख्यान काळजीपूर्वक समग्र वाचल्यावर पंतांच्या विद्वत्तेबद्दल मात्र कोणी शंका घेईल असें वाटत नाहीं. तसेंच रघुवंशांतील कांहीं भागांचा अनुवाद करून त्यांनीं योजल्यानें, त्यांच्या अशा काव्यांच्या परिचयाबद्दलचाही प्रश्न कायमचा सुटला आहे. नित्याचेच नव्हे, तर क्षय, उपांशु, विश्वंभर, कपर्दि, घोटक, उत्कर

असे अपरिचित संस्कृत शब्द, 'स्वनामरसपानाभिलाषपरलोकव्रजासि' अथवा 'नंदनवनभ्रमागतशक्राश्वभ्रांत्यधिष्टितस्वांते' असे अनेक प्रदीर्घ समास, घोडे[१], हत्ति,[२] बाण[३] व समुदाय[४] इत्यादि एकाच अर्थी अनेक शब्द योजण्याचें शब्दप्रभुत्व, या गोष्टी त्यांचें समासचक्र—अमरकोशादि ग्रंथांचें गाढें अध्ययनच दर्शवितात. प्रस्तुत आख्यानांत पंतांनीं विविध शब्दार्थालंकारांची जी यथेच्छ पखरण केली आहे, त्यावरून त्यांच्या संस्कृत काव्यवाचनाबरोबरच साहित्यशास्त्राच्या सूक्ष्म व दृढ अभ्यासाचा प्रत्यय वाचकांना येतोच. छंदःशास्त्रांतील नैपुण्य तर निरनिराळ्या चाळीस वृत्तांच्या योजनेंत दिसतेंच. मोरोपंतांनीं पुढें आर्यावृत्तांत नांव मिळविलें असलें, तरी संस्कृत महाकाव्यांची व वामनादि पूर्वकवींची प्रथा पाहून, अनेक वृत्तांत रचना करणें, प्रारंभीं तरी त्यांना मानाचें वाटलें असावें. आपली नवरसात्मक काव्यरचना एकच एक वृत्तांत गुंफून दाखविण्यांत कवीचें वृत्तकौशल्य अधिक कीं, ती विविध वृत्तांत ग्रथित करण्यांत अधिक, याबद्दल कांहीं विद्वानांत मतभेद आहे. पण अनेक वृत्तात्मक रचनेंत अक्षर-मात्रांच्या ठराविक संख्येचें व वर्णांच्या ऱ्हस्वदीर्घाचें जें बंधन कवीस पाळावें लागतें, तें त्यांस एकवृत्तात्मक रचनेंत वारंवार पाळावें लागत नाहीं. शिवाय अनेक वृत्तांत रचना करतांना व वरील बंधनें पाळतांना कवीच्या वर्णनौघांत वेळोवेळीं खंड पडत असतो. हा खंड पडून रचना कृत्रिम होऊं नये, व वृत्तांच्या मर्यादा तर पाळल्या जाव्या, यासाठीं अशा कवीच्या गांठीं विपुल शब्दसंपत्ती असावी लागते. शृंगारादि निरनिराळ्या रसांना अधिक वाव मिळावा म्हणूनच अनुकूल अशा शब्दरचनेसाठीं, नियमित अक्षर मात्रात्मक विविध वृत्तांचा उगम झाला असावा. असें आहे तर इतकीं बंधनें पाळून इष्ट रसाचा उठाव करणारा अनेक वृत्तव्यवसायी कवीच वृत्तप्रभु म्हटला पाहिजे, व संस्कृत महाकाव्यांतही अनेक वृत्तांचा अवलंब ज्याअर्थी केलेला आढळतो त्याअर्थी वृत्तप्रभुत्वाचें हेंच गमक त्यांनाही मान्य असावें.

आर्या या एकाच वृत्तांत आपलें आर्याभारत पंतांनीं रचलें म्हणून ते वृत्तप्रभु ठरत नसून प्रस्तुत आख्यानांत निरनिराळ्या ४० गण-मात्रा वृत्तांचा खेळ,

---

१ हय, हरि, वाजी, घोटक, अश्व. २ हस्ति, स्तंबेरम, द्विप, अनेकपपक, वारण, इभ. ३ शर, नाराच, शिलीमुख, बाण, सायक, विशिख, आशुग. ४ स्तोम, व्रज, निकर, उत्कर, गण, व्रात, वृंद, समूह, पक्ष.

त्यांनीं फारशी रसहानि होऊं न देतां, सर्व बंधनें पाळून मांडला असल्यानेंच ते वृत्तप्रभु ठरतात, व त्या गुणास त्यांचें शब्दप्रभुत्वहि तितकेंच कारणीभूत झालें आहे. एकार्थी अनेक शब्द त्यांच्याजवळ जसे सज्ज होते, तसेंच ऱ्हस्वदीर्घ अक्षरांचें निबंधन पाळण्यासाठीं, एकाच शब्दाला अनेक प्रतिशब्द निर्माण करण्याचें सामर्थ्यही त्यांच्या ठिकाणीं होतें. ठराविक वृत्तांत बसण्यासाठीं, 'लक्ष्मण' या एका शब्दाऐवजीं 'हरिजिदरि' घनरवांतक, शक्रजिदंतक, 'राम' या अर्थी हरिसैन्यराजराजा, दशवदनेभसिंह, 'सुग्रीव' याबद्दल सुकंठ, सुगळ, 'दशरथा'बद्दल पंक्तिरथ व 'चवदा वर्षें' यासाठीं उदधिउडुपहायनें, असे सामासिक शब्द त्यांनीं बनविले आहेत. एक दोन यतिभंगाची[1], वृत्तसुखार्थ संधि पाहिजे तेथें करण्याचें टाळल्यामुळें विसंधीचें[2] एकादें, व मूळशब्दांतील ऱ्हस्व स्वर दीर्घ केल्याचें एकादें,[3] अशीं अपवाद स्थलें सोडल्यास, प्रचलित वृत्तांहून रमा, दोहा, अमृतध्वनि, सारंग, विबुधप्रिया, रुक्मिणी, चंद्रिका, उत्पलिनी, जलोद्धतगति, लीलाकरदंडक, मयूरी, अशीं कांहीं आडवळणी वृत्तेंही त्यांनीं ज्याअर्थी लीलया व शुद्धरितीनें हाताळलीं आहेत, त्याअर्थी वृत्तशास्त्राचा त्यांचा व्यासंग व सराव मोठाच असला पाहिजे.

संस्कृत काव्यवाङ्मयाच्या व अमरकोशादि ग्रंथांच्या अभ्यासाच्या दडपणाखालीं या आख्यानाची रचना झाली असल्यामुळें, याची भाषा समासघटित व संस्कृतशब्दप्रचुर अतएव थोडी अवघड व क्लिष्ट अशी उतरली आहे. या कालांत पंतांकडून अजून प्राचीन मराठी काव्यवाङ्मय वाचून झालें नसल्यामुळें, मराठी भाषेचें साधें कसलेलें शुद्ध वळण येथें आपणास अगदीं पहावयास मिळत नाहीं. पतांच्या 'आर्याभारतादि' उत्तरवयांत रचलेल्या ग्रंथांत, वाक्प्रचार, म्हणी व घरगुती शब्द इतके आले आहेत कीं, कित्येकांना त्यांच्या या ग्रंथांत ग्राम्यतेचा दोषही काढण्यास अवसर सांपडला आहे. पण असा दोषही एकवेळ पुरवला, पण पंतांच्या इतर ग्रंथांतील तो प्रसाद, तो जिव्हाळा व तें कौटुंबिक वातावरण येथेंही अनुभवास मिळतें तर बरें असें, येथील लांब समासांच्या मालगाड्या व अपरिचित संस्कृत शब्द पाहून वाटूं लागतें. संस्कृताच्या इतकें आहारीं जाण्यानें, पंतांकडून 'तवागमनें' (३।११), सहावाध्याय, विध्युक्त (६।३), असे चुकीचे संधि, स्वात्मघर (४।३८),

---

१ कुशलवो. ३।२३, ८।१८, १३।३०. २ कुशलवो. ८।१०. ३ कुशलवो. १३।३३.

स्वात्मकानें, असे धेडगुजरी समास, ममाश्वोत्तमा ( १२।१४ ), स्वबंधु ( १३।१५ ) यांतील अनवधानता, दंडापासुनि भीतीनें ( २।३० ), यांतील भयदर्शक शब्दाचा पंचमीबरोबर प्रयोग, इत्यादि बारीकसारीक दोष घडले आहेत. पंतांची मराठी भाषा ऐन पेशवाईतली असल्यामुळें आजच्या प्रचलित मराठीहून ती अगदींच भिन्न नाहीं. तथापि तातादेशेंकरूनि, आनंदाश्रूकरूनि ( १।९ ), तिहीं ( १।११ ), अशीं तृतीयेचीं रूपें, 'म्हणून' बद्दल 'म्हणउनि' (२।३६) असे अगदीं तुरळक प्रकार येथें आहेतच. मोरोपंतांची भाषेच्या शुद्धतेबद्दल प्रसिद्धी आहे. पण 'मातें'बद्दल 'मतें' ( ४।४२ ) व 'दोघे' 'बदल' 'दोघ' ( ५।३६ ) असे एक दोन ग्राम्य शब्दही येथें नाहींत असें नाहीं. पंतांबद्दलचे अनेक दुर्ग्रह व गैरसमज त्यांच्या आमूलाग्र काव्यवाचनानेंच नष्ट होणार आहेत, पण बुद्धीच्या व मनाच्या विकासाबरोबरच त्यांच्या काव्य-वाङ्मयाचाही कसा विकास होत गेला हें पहावयाचें झाल्यास, कुशलवोपाख्यानासारख्या त्यांच्या प्रथमकृतीपासूनच रसिकांनीं आरंभ केला पाहिजे.

प्रस्तुत प्रत 'काव्येतिहाससंग्रह,' महाराष्ट्रकविवर्य मोरोपंतकृत कविता भाग २ ( १८८७ ) व 'काव्यसंग्रह' ५३, महाराष्ट्रकविवर्य मोरोपंतकृत स्फुटकाव्यें ( १९०५ ), यांतील 'कुशलवोपाख्यान' या प्रकरणाच्या प्रतींवरून तयार केली आहे. 'काव्येतिहाससंग्रह' प्रत बरीच अशुद्ध असून तेथें कित्येक ठिकाणीं समास चुकीनें तोडण्यांत आले आहेत. 'काव्यसंग्रहा' ची प्रत बरीच शुद्ध आहे. पाठभेद मुक्रर करतांना या दोन प्रतींतील पाठभेदांचें, अर्थाच्या व संदर्भाच्या दृष्टीनें तारतम्य पाहिलें असून, संशयस्थलीं मोरोपंतांनीं ज्या जैमिनीच्या ग्रंथाचा अनुवाद केला आहे, तेथील मूळ श्लोकावरूनच पाठनिश्चिति केली आहे. पाठभेदांचें विवरण, टीपा व स्पष्टीकरणांत केलें असून, एकंदर ग्रंथ अभ्यासकांना उपयुक्त व्हावा याकडे लक्ष पुरविलें आहे.

शेवटीं ही आवृत्ति सुंदर स्वरूपांत प्रकाशित केल्याबद्दल, श्री. मंगेशराव कुळकर्णी यांचा मी शतशः आभारी आहें.

कोल्हापूर,<br>ता. १२।६।४१.

**दत्तात्रय सीताराम पंगु.**

# अनुक्रमणिका




| | पृष्ठ |
|---|---|
| प्रास्ताविक ... ... ... ... ... | १–१७ |
| अध्याय १ ला ... ... ... ... ... | १ |
| अध्याय २ रा ... ... ... ... ... | ४ |
| अध्याय ३ रा ... ... ... ... ... | १० |
| अध्याय ४ था ... ... ... ... ... | १६ |
| अध्याय ५ वा ... ... ... ... ... | २९ |
| अध्याय ६ वा ... ... ... ... ... | ३४ |
| अध्याय ७ वा ... ... ... ... ... | ३७ |
| अध्याय ८ वा ... ... ... ... ... | ४१ |
| अध्याय ९ वा ... ... ... ... ... | ४७ |
| अध्याय १० वा ... ... ... ... ... | ५० |
| अध्याय ११ वा ... ... ... ... ... | ५३ |
| अध्याय १२ वा ... ... ... ... ... | ५६ |
| अध्याय १३ वा ... ... ... ... ... | ६१ |
| टीपा व स्पष्टीकरण ... ... ... ... ... | ७७ |
| कठीण शब्दांचा कोश ... ... ... ... ... | १५१ |

मोरोपंतकृत

# कुशलवोपाख्यान

## अध्याय पहिला



( गीतिछंद )

गणपति, गुरु, गुह, गौरी, गिरीश, गंगा, गुणाढ्य गीर्देवी ॥
यांसि नमुनि, रामात्मज कुशलवचरितामृतासि संसेवी. ॥ १ ॥

( शार्दूलविक्रीडित )

श्रीमद्राघव तो त्यजी वसुमतीकन्येसि निंदाभयें;
वाल्मीकिद्विजनायकाश्रमपदीं राहे महीजा स्वयें।
तेजस्वी यम जन्मले सुत, तिहीं यज्ञाश्व नेला, तथा
युद्धीं तातहि जिंकिला; अशि वरा गावी मनोज्ञा कथा ॥ २ ॥

( मंदाक्रांता )

तातादेशेंकरुनि विपिनीं राघवें वास केला,
तेथें चौर्यें दशमुख हरी मेदिनीकन्यकेला।
सुग्रीवाख्य प्लवगपतिशीं सख्य साधूनि, वाळी
त्याचा भ्राता वधुनि विशिखें, दाविली त्या दिवाळी ॥ ३ ॥

( शार्दूलविक्रीडित )

पश्चाद्राम दशाननासि ससुतामात्यासि युद्धीं वधी,
दे लंकेसि बिभीषणाप्रति धरा सिंध्वर्कसोमावधी।
स्वाहेशास्यविशुद्धमैथिलसुतासंयुक्त रम्याकृती,
साकेतासि सुपुष्पकीं मग सुखें बैसोनि आला कृती ॥ ४ ॥

जे सुग्रीवबिभीषणांगदमरुत्पुत्रादि आले, सुखें
सेनासंयुत जानकीपतिगुणस्तोमासि गाती मुखें ।
श्रीरामागमनप्रहृष्ट सकळायोध्या पुढें धांवली,
पानीयासि जशी तृषार्त सुरभी तैशी क्षणें पावली ॥ ५ ॥

गेल्यापासुनियां चतुर्दश समां कष्टीचि जाला वनीं,
सीतालक्ष्मणयुक्त राघव, असें भावूनियां तो मनीं ।
सक्ष्मादेव, कृपापयोधर, तदा त्याचा पुरोधा मुनी,
आशीर्वादमिषें सुधेसि भगवान् वर्षे पुढें जाउनी ॥ ६ ॥

कैकेयीसुत, वल्कलाजिनजटाधारी, प्रधानासवें
सामोरा रघुनायकाप्रति पुढें गेला प्रभूतोत्सवें ।
जाला सन्नत राघवेंद्रचरणीं, रामें समालिंगिला;
तत्प्रेमाश्रुकणें भिजे, रघुवरें जेव्हां शिरीं हुंगिला ॥ ७ ॥

जाला तो नगरीं प्रविष्ट सकळक्ष्मानाथचूडामणी,
लोकांच्या हृदयांबुजीं बहु दिसां आनंदही त्या क्षणीं; ।
कौशल्या घननादशत्रुजननी, कांतारवासप्रदा
कैकेयीहि, रघूत्तमें नमुनियां केली प्रमोदास्पदा ॥ ८ ॥

कौशल्या मलिना, कृशा, स्वतनयाश्लेषें तदा हर्षली,
आनंदाश्रुकरूनि, राघवशिरीं हुंगूनियां, वर्षली ।
पूर्वीच्या परि विघ्न होईल, असें मानूनियां क्षिप्र ती,
कोणातेंहि न पूसतां करि जणों राज्याभिषेकाप्रती. ॥ ९ ॥

'हा अच्छेद्य, अभेद्य नंदन तुझा अक्लेद्य, वत्से!' असें
मातें संकथिती वसिष्ठमुख हे भूदेव, मिथ्या कसे ? ।
जालासि प्रखरेषुभिन्नतनु तूं, बोलोनि ऐसें, करें
स्पर्शे, लक्ष्मण राम हीं[1] स्वहृदयीं आलिंगुनी लेंकरें, ॥ १० ॥

श्वश्रूतें क्षितिजा नमी, तंव तिहीं आलिंगिली आदरें,
कौशल्या मग ते वदे, सुचुबुकीं स्पर्शोनि तीतें करें, ।

---

१ ही—काव्येतिहाससंग्रहप्रत.

'रामाशीं चिरकाळ सर्वसुखसंपूर्णा स्वपत्या रहा,
पातिव्रत्यबळें तुझ्याचि तरला दुःखाब्धिला वत्स हा. ॥ ११ ॥

वत्से ! तूं रघुवंशभूषणमणी, स्तुत्या सतींच्या गणीं,
चारित्रासि तुझ्या सुरेंद्ररमणी गाती सुखें स्वांगणीं, ।
त्वत्कोपेंचि दशास्य दुर्मति कथाशेष त्रिलोकांत या
झाला, कोण असा असे त्रिभुवनीं मारावयाला तया' ? ॥ १२ ॥

( स्रग्धरा )

कौशल्या यापरी ते प्रमुदित हृदया बोलिली मैथिलीला,
वर्णी हर्षेकरूनी स्फुरदधरमुखें रामसौमित्रिलीला. ।
केला राज्याभिषेक क्षितिसुरतिलकें श्रीवसिष्ठें स्वतोषें,
विप्रांचे संघ तेव्हां परम शुभदिनीं गर्जती मंत्रघोषें. ॥ १३ ॥

( शार्दूलविक्रीडित )

राज्यातें अज तो करीत असतां, जाले दरिद्री धनी,
रोगी रोगविहीन, बालिश रत ज्ञानाचिया साधनीं, ।
गाई त्या घटदोहनी, बहुरसा सस्यावृता मेदिनी,
यूपस्तंभसमन्विताहि सरयू लोकत्रयाल्हादिनी. ॥ १४ ॥

दिव्यास्वादुफळाढ्य भूरुह,[1] लता संशोभती पुष्पिता;
आत्मापत्यमृतिप्रति क्षितितळीं पाहे न मातापिता; ।
वंध्या लब्धबहुप्रजा सकलही वर्ण स्वधर्मी रत,
श्रीरामाख्यसुधेसि कर्णचषकें पीती सुखें संतत. ॥ १५ ॥

पापातें न वसावया स्थळ दिसे, कोण श्रमाला पुसे ?
नाहीं आश्रय, यास्तव क्षितितळीं चिंता सचिंता बसे, ।
विघ्नातें बहु विघ्न होति, रुसली भीति त्रिलोकीं बरी;
साकेतीं रघुनाथ सानुजसुहृद् राज्यासि जेव्हां करी. ॥ १६ ॥

---

१ भूरुहलता–काव्येतिहाससंग्रहप्रत.

( उद्गीतिछंद )

जैमिनिकृतभारतगतहयमेधीं कुशलवाख्यानीं, ।
हा पहिला अध्याय श्रवण करावा रसज्ञमुख्यांनीं. ॥ १७ ॥

## अध्याय दुसरा



( द्रुतविलंबित )

नव सहस्र समा क्रमिल्या भल्या,
प्रकृति त्या सुख फारचि लाभल्या, ।
नृपतितें वश नित्य असे प्रजा,
रघुवरासि परंतु नसे प्रजा ॥ १ ॥

( मंदाक्रांता )

मोठ्या काळेंकरुनि मग ती गर्भिणी होय रामा;
रामातें ते बहु सुख करी पांडुवक्त्राभिरामा; ।
ज्याची दृष्टी स्वसुतवदनप्रेक्षणातें भुकेली,
केली क्षीरीं दशरथसुतें त्या चतुर्मास केली ॥ २ ॥

( गीतिछंद )

तदनंतर रघुकुलवर पाहे स्वप्नास[1] पांचवे मासीं ।
प्रात:काळीं सांगे करुनि नमस्कार तें गुरूपाशीं. ॥ ३ ॥

( मंदाक्रांता )

'गंगातीरीं जनकतनया त्यागिली देवरानें,
शोकग्रस्ता घडिघडि रडे फार उच्चस्वरानें. ।
कोमेलेसें वदन, सुटला मूर्धजांचा कलाप,
दीना वाणी, करि [2]परिपरि काननांतीं विलाप. ॥ ४ ॥

---

१ 'स्वप्नांत'—काव्यसंग्रहानें सुचविलेला दुसरा पाठभेद. २ परि परी—काव्येतिहाससंग्रहप्रत.

( गीतिछंद )

अशि जनकनृपसुतेची स्वप्नांतीं पाहिली अवस्था मी, ।
मज सुख तीळ नच वाटे, चिंतेनें व्यापिलें मन स्वामी ! ' ॥ ५ ॥

( अनुष्टुपछंद )

ऐसें भाषण रामाचें ऐकोनि ऋषिसत्तम ।
बोलता जाहला त्याशीं हरिता शिष्यहृत्तम. ॥ ६ ॥
' श्रीरामा ! जलदश्यामा ! देवर्षिनिकरप्रिया ! ।
गर्भशांत्यर्थ सीतेची कर पुंसवनक्रिया. ॥ ७ ॥
कृष्णपक्ष सरे तावत् करावें विप्रतर्पण; ।
इहामुत्रहि कल्याण देतें होय द्विजार्पण ' ॥ ८ ॥

( रमावृत्त )

नृपति तदा, नमुनि करें कुशासनातें,
कुलगुरुच्या करि बहुमान्य शासनातें ।
हरिजिदरिप्रति हरिसैन्यराजराजा,
मग ' जनकक्षितिपतिच्या ' म्हणे ' घरा जा '. ॥ ९ ॥

( पुष्पिताग्रा )

जनकनृपवरासि सांग आदौ नमन करूनि मदीय वंदनातें. ।
मग वद, ' तव दर्शनैकवांछा बहुत असे अजसूनुनंदनातें.' ॥ १० ॥
धरुनि बहुतशी विनम्र मुद्रा, कुशिकसुतासि महातपःसमुद्रा ।
विनवुनि बहुपुण्यसंघराशी, ऋषिजनवेष्टित आणिजे घराशीं. ॥ ११ ॥
अशी दशवदनेभसिंहवाणी परिसुनि, लक्ष्मणवीर बद्धपाणी ।
म्हणुनि, 'बहु बरे,' सुबुद्धिखाणी, सजनक कौशिकविप्र शीघ्र आणी ॥ १२ ॥
नमन करुनि लक्ष्मण स्वहातें, मृदुचि वदे सुरवंद्यविग्रहातें; ।
' सजनक मुनि येतसे पुराला, झडकरि पूजुनि आणिजे घराला.' ॥ १३ ॥
करुनि अनुजवाक्य मान्य, राम त्वरित उठे त्रिजगन्मनोभिराम, ।
ऋषिजनयुत जाय त्या समोर प्रमुदितचित्त, जसा घनास मोर. ॥ १४ ॥

नमुनि, करुनि पूजन स्वहातें, हरि मुनिच्या प्रभु तो पथश्रमाला, ।
विनवुनि बहु पुण्यसंग्रहातें, प्रमुदित घेऊनि ये निजाश्रमाला. ॥ १५ ॥
मग कुलगुरुसर्वविद्वसिष्ठप्रभृति महीसुर, कौशिकादि शिष्ट, ।
करुनि सुखि महर्षिसत्तमास, प्रभु करि पुंसवनासि तो समास. ॥ १६ ॥

( अनुष्टुप् )

तदनंतर गंधाढ्य दिव्यकेलीगृहांतरीं ।
कोणा एका दिशीं रात्रौ तोषवूनि मधूत्तरीं, ॥ १७ ॥

( गीतिछंद )

घेऊनि निज अंकावरि जनकसुता गर्भिणी नवी रमणी, ।
तीस पुसे लंकावरकाल, क्षितिपाल, सर्ववीरमणी; ॥ १८ ॥

( पंचचामर )

'कृशांगि ! पांडुराननें ! प्रजाफलोद्भवे लते !
त्रपा त्यजूनि सांग, जे मनीं स्पृहा असेल, ते. ।
विदेहराजनंदिनि ! प्रिये ! पवित्रमानसे !
तुला अदेय वस्तु राज्यमंडळांत या नसे.' ॥ १९ ॥

( अनुष्टुप् )

म्हणे श्रीरामरमणी, रमणीयवपुर्धरा, ।
धराकन्या, जगत्पद्मा, पद्माक्षी, कंबुकंधरा. ॥ २० ॥

( प्रहर्षिणी )

ऐकावें मुनिवदनोद्गतश्रुतीचें[1] सद्ध्वान[2] श्रमहर सर्वसंसृतीचें; ।
देखाव्या मृगकुलसंकुला, विशाला, विप्रांच्या परम पवित्र पर्णशाला; ॥ २१ ॥
देखाव्या ऋषिवनिता भल्या, कुलीना, निर्लोभा, निजहृदयेशभक्तिलीना, ।
नीवारच्छदफलकंदनीरमूळें सेवूनि, प्रमुदित ज्या समाधिमूळें ॥ २२ ॥

---

१ 'मुनिवचनोद्गतश्रुतीचें'—काव्यसंग्रह. २ 'सध्वान'—काव्येतिहाससंग्रह. 'सुधान'—असा अन्यपाठ, काव्यसंग्रहपरिशिष्टांत दिला आहे.

देखावी सुरतटिनी लसत्तरंगा, पापौघश्रमशमनी, शिवांतरंगा, ।
जे वाहे सलिलमिषें सुधाचि सारी, आलोकेंकरुनचि जन्ममृत्यु सारी' ॥ २३ ॥

( दंडक )

जनकनृवरनंदिनीचा[1] असा ऐकतां दोहद,
करुनि सरस हास्य, तीतें म्हणे शर्मसंदोहद. ।
'उदधिउडुपहायनें त्वां जऱ्ही सेविलें दंडक,
तरि हि न तव तृप्ति चित्तीं कशी? काय हा दंडक? ॥ २४ ॥

( अनुष्टुप् )

जा सकाळीं वरारोहे ! देखायास्तव पावनें, ।
शांतसत्त्वगणाकीर्णें, गंगातीरतपोवनें. ॥ २५ ॥

( अमृतध्वनि )

ऐसें म्हणोनि रघुवंशावतंस मग सीतेसवें प्रमुदित
केलीगृहीं जडितमंचीं निजे स्वजनरक्षार्थ जो समुदित. ।
निद्रा तदा नयनमार्गेंकरूनचि शरीरांतरीं प्रसरली;
राहोनिया प्रहर दोन स्वयेंचि[2] मग सोडूनि दूर सरली. ॥ २६ ॥

( मालिनी )

मग निशिचर, चार, प्राज्ञ, विश्वासराशी,
नमन करुनि रात्रौ श्रीअयोध्यावरासी ।
म्हणति, 'मरणजन्मच्छेदका ! भूसुतापा !
जन सकळहि गातो त्वत्सुकीर्तिप्रतापा.' ॥ २७ ॥

( इंद्रवंशा )

पृथक् पृथक् चारजनाननें अशी, लोकश्रुती ऐकुनियां, तदा वशी ।
तयास आज्ञा मग मर्त्यदेव दे; त्यांतील एकासह तो असें वदे; ॥ २८ ॥

---

१ जनकनृपवरनंदिनीचा–काव्येतिहाससंग्रहप्रत. २ स्वयें च–काव्येतिहाससंग्रहप्रत.

( अनुष्टुप् )

'माझें, वा मम भार्येचें, बंधुचें, जरि दुष्कृत, ।
जालें असेल तुजला प्रकृतीच्या मुखें श्रुत, ॥ २९ ॥
तरि सत्य वदें, चारा ! कैशी स्थिति असे जनीं; ।
दंडापासुनि भीतीतें कदापि न धरि मनीं.' ॥ ३० ॥
ऐसें ऐकोनि, नमुनी, चार तो राघवाप्रति ।
कथिता जाहला ज्यातें, ऐका त्यातेंचि संप्रति. ॥ ३१ ॥

( गीतिछंद )

"काचित् खळरजकाची गृहिणी कलहार्तमानसा होती,
न विचारुनी धवातें, पळोनि गेली पितृक्षया हो ! ती. ॥ ३२ ॥
अनुचित जाणुनि कन्या जामातृगृहासि आणिली तातें, ।
हातीं देतां जाला, त्यातें जोडूनियां स्वहातातें. ॥ ३३ ॥
बहुविध सांत्वन केलें, परि तत्क्रोधाग्नि लेश न विजाला, ।
रोषारुणदृक्, दष्टाधर, ऐसें रजक बोलता जाला. ॥ ३४ ॥
'पुनरपि दशवदनसदनगता घरीं नांदवीतसे रामा, ।
तो काय मी'? म्हणउनी बाहु उभारूनियां वदे, रामा ! ॥ ३५ ॥
'राजा म्हणउनि सरलें त्यातें, परि मी तसें कदा न करीं.' ।
आयकिलें इतुकें, हें बोलत होता असें सुहृन्निकरीं. ॥ ३६ ॥
स्वर्गंगेच्या सलिलीं आयकिला पाहिला नसे पंक; ।
त्रिजगद्गेयचरित्रा तद्वत् कैंचा तुला असे पंक ? ॥ ३७ ॥
सकृदुच्चारणमात्रें तरती दुरिताार्णवीं महापापी, ।
निरत शिवहि मग तव गुणसुधेसि जन कोण कीं न बापा ! पी ? ॥ ३८ ॥
पितृवचन सत्य केलें, खळ वधिले, त्रिदशविप्र तोषविले, ।
निजगुणमुक्तादामें दिव्यस्त्रीकंबुकंठ भूषविले ॥ ३९ ॥
जन दुर्वार तथापि, स्वैर सुधापानमत्त बोलतसे. ।
सकलकलुषतिमिररवे[1] ! प्रामाण्यचि युक्त हेहि बोल तसे." ॥ ४० ॥

---

[1] 'सकलकलुषिततिमिररावें'—काव्येतिहाससंग्रह.

( अनुष्टुप् )

ऐसें ऐकोनियां, राम चिंतेला मानसीं धरी. ।
लोकापवादवित्रस्त विचारातें मनीं करी. ॥ ४१ ॥

'जाली वन्हिमुखीं शुद्धि, तथापि जन निंदिती; ।
टाकावी, कीं न टाकावी हे शुद्धचरिता सती ? ॥ ४२ ॥

( गीतिछंद )

कैशी हे त्यागावी सद्वृत्ता, साधुसंमता, प्रमदा ? ।
श्रोत्रीयमुखें जैशी त्याज्या स्वाचारपद्धती न कदा. ॥ ४३ ॥

त्यागीन अवश्य इला, विप्र जसे कलियुगीं निज श्रुतिला.' ।
ऐसें हृदयीं चिंती, वारंवार स्मरोनि साश्रु तिला. ॥ ४४ ॥

'जलजलसद्रम्यमुखी नवनवनीतापरीस मृदुला हे, ।
शिव ! शिव ! मजविण भीरु न वनवसतिदुःख भोगणें [1]लाहे' ॥ ४५ ॥

एवं चिंताव्याकुल दीनास्य न तो वदे, निजे हाले. ।
सेवार्थ भरत, लक्ष्मण, शत्रुघ्न, तया समीप तों आले ॥ ४६ ॥

अतिदीनमानसातें रामातें पाहतांचि, ते सुमती, ।
शत्रुघ्न, भरत, लक्ष्मण परस्पर उपांशु यापरी वदती. ॥ ४७ ॥

'जाला उशीर, यास्तव आला कीं कोप रामचंद्राला ? ।
दानें द्विजांसि न दिलीं, हें गमलें कीं क्रियावितंद्राला ? ॥ ४८ ॥

एवं दुःखाकुल ते, वंदुनि, म्हणती पवित्रवृत्तातें; ।
'कां न सुखविशी आम्हां, भृत्यांतें त्वत्पदस्थचित्तातें.' ॥ ४९ ॥

( आर्या )

ऐसें वदोनि, वंदिति ते सारे रामपादपद्मातें,
भक्तमयूरेश्वरकृतिचित्ताच्या केलिसद्मातें. ॥ ५० ॥

---

१ 'साहे' असा मूळचा पाठ असावा–काव्यसंग्रह.

( उद्गीतिछंद )

जैमिनिकृतभारतगतहयमेधीं कुशलवाख्यानीं, ।
हा दुसरा अध्याय श्रवण करावा रसज्ञमुख्यांनीं. ॥ ५१ ॥

## अध्याय तिसरा



( रमावृत्त )

अथ भरतप्रभृतिनिजानुजांसि सारें कळवितसे निशि कथिलें, जसें स्वचारें. ।
चरणरजेंकरूनचि नाशिता अघातें, स्वमत असें कथित असे तदा तिघांतें. ॥ १ ॥

( अनुष्टुप् )

'श्रुतीतें निंदितो जैसा पाखांडी पापभाजन, ।
रक्षोगृहीता यासाठीं मैथिलीतें तसा जन ॥ २ ॥

( गीतिछंद )

योगी जैसा त्यजितो संसारभयास्तव स्वममतेला, ।
अपवादभयास्तव मी कीर्तिप्रतिपालनार्थ सीतेला '॥ ३ ॥

( अनुष्टुप् )

असें आकर्णितां, त्यांच्या नीर नेत्रांतूनी गळे; ।
रोमांच उठले देहीं, दुःखानें दाटले गळे. ॥ ४ ॥
पुसूनियां शोकपाणी, पाणी जोडूनियां नयें, ।
रामापुढें दीनवाणी[1] वाणी भरत हें स्वयें. ॥ ५ ॥

( गीतिवृत्त )

" अंत्यजसदनापासुनि पूर्वीं जे आणिली बळें गाय, ।
संसर्गपातकास्तव पुनरपि ते धेनु टाकीजे काय ? ॥ ६ ॥
शुद्धि दिली वन्हिमुखीं, प्रविशवुनीयां विशंक निज काय; ।
त्या दिव्याचें रामा ! स्मरण नसे सांग, आज तुज काय ? ॥ ७ ॥

---

१ दीन वाणी – काव्यसंग्रहप्रत.

( स्रग्धरा )

'जाला ज्या मानवाला मरणद वनितापुत्रवित्तादिशोक,
त्याला नाहींच कांहीं बुधजन म्हणती, पुण्यलभ्योच्चलोक.'।
'सीता हे सून माझी, सुविमळचरिता; यामुळें देवलोकीं,
रे वत्सा! वर्ततों मी प्रमुदित, मजला ऊर्ध्वनेत्रें विलोकीं.' ॥ ८ ॥

( गीतिवृत्त )

एवं तदेव गगनीं विमानगत तात बोलिला वदनें,।
त्याचें स्मरण करावें रामा! त्वां ज्ञानिलोकहृत्सदनें ॥ ९ ॥
स्मरण करीं, पूर्वी जें वदला व्योमस्थ देवसंघात.।
करुणाब्धे! सीतेसह न करावा आत्मकीर्तिचा घात." ॥ १० ॥

( अनुष्टुप् )

एवं वदोनि, भरतें केलें रामासि वंदन,।
जाला अश्रुजलभ्रष्टहृदयालिप्तचंदन. ॥ ११ ॥

( सारंगवृत्त )

ऐकोनि ऐसें, वदे जानकीजानि; 'लोकापवादेचि होते यशोहानि.।
ज्याच्या नसे कीर्तिचा जाहला नाश, त्याला न मारावया दक्ष कीनाश. ॥ १२ ॥
मेले हरिश्चंद्रवैन्यादि जे संत, ते या जनामाजि आहेत जीवंत.।
ज्या बंधुगोषित्सुताहीं[1] यशोभंग, स्वप्नांतरींही तयासी नसो संग. ॥ १३ ॥

( अनुष्टुप् )

कित्येकांहीं देहदानें रक्षिलें स्वयशोधन,।
म्हणोनि सीतात्यागें मी करितों कीर्तिशोधन. ॥ १४ ॥
म्यां वांचावें असें चित्तीं असेल तुझिया जरी,
सीतात्यागनिषेधार्थ शब्द बोलों नको तरी' ॥ १५ ॥

---

१ बंधुयोषित्सुता ही—काव्येतिहाससंग्रहपाठ.

( स्रग्धरा )

सौमित्रि क्रोधतप्त[1] क्षितिपतिसि म्हणे, ' प्रार्थना ऐक, रामा !
मिथ्या लोकापवादें करुनि विकलुषा त्वां त्यजावी न रामा; ।
म्लेच्छांहीं निंदिजेते श्रुति म्हणउनियां काय ते विप्रलोकीं.
टाकावी ? हें विचारें करुनि बुधपते ! शास्त्रनेत्रें विलोकीं ॥ १६ ॥

( दोहावृत्त )

सांग मला हें सत्य तूं दोषज्ञांचा राय ।
स्त्रीकलहास्तव पंडितें माय त्यजावी काय ?' ॥ १७ ॥

( मंदाक्रांता )

शत्रुघ्नेंही बहु विनविला राम सामप्रकारें, ।
तेंही जालें विपिनरुदितासारखें व्यर्थ सारें; ।
अप्रस्तावीं विफळचि असे काम, ऐसेंचि आहे;
मेघापायीं न तिळभरिही नीर सारंग लाहे ॥ १८ ॥

सीतात्यागद्विजपजननीं वाढला दुःखसिंधू;
शोकाश्रूंहीं भिजविति तदा भूमितें रामबंधू; ।
कन्यात्यागश्रवणजनितक्लेशमूर्च्छेसि गेली,
शिंपोनीयां म्हणउनि जणों जीवनें शांत केली. ॥ १९ ॥

( पृथ्वीवृत्त )

स्वबंधु करितातिं हे करुण मंजु शब्दें स्तव,
कलंक परि लागतो निजकुळासि सीतेस्तव ।
असा करुनियां बरा दृढ विचार लंकापति—
कुळांतक असें वदे कठिन, कीं श्रुती कांपती; ॥ २० ॥

( गीतिवृत्त )

अपवादभयास्तव मी स्वतनूतेंही तुम्हांसवें,[2] देखा, ।
त्यागिन सहसा, मग या सीतेचा कायसा असे लेखा ? ॥ २१ ॥

---

१ क्रोधतप्ता क्षितिपतिसि—काव्येतिहाससंग्रह. २ ' तुम्हांसि हे '—काव्येतिहाससंग्रहपाठ. ' तुम्हांसही ' असा अन्यपाठ – काव्यसंग्रहप्रत-परिशिष्ट.

( हरिणी )

रघुपतिमुखें कैकेयीचा सुत, श्रवणीं अशीं
कठिन वचनें स्वांतोद्वेगप्रदें शिरलीं जशीं, ।
हळु हळु रडे; गेलें सर्व स्वधैर्य तदा लया;
अनुजयुत तो जाता जाला त्यजूनि तदालया. ॥ २२ ॥

( अमृतध्वनि )

दुःखाभिभूत नृप जाणोनि शिंपित धरेतें स्वनेत्रकमळें,
होता निबद्धकर सौमित्रि, पूजित दृगब्जें तदंघ्रिकमळें. ।
जो न स्वनामरसपानाभिलाषपरलोकव्रजासि भव दे,
तो, लक्ष्मणासि नयनांहीं विलोकुनि, असें भूमिवल्लभ वदे. ॥ २३ ॥

( माल्यभारा )

'मम शब्द करूनि मान्य, टाकीं, क्षितिकन्येप्रति जान्हवीतटाकीं ।
अथवा स्वकरेंचि मार मातें, जरि सीतेस्तव पावसी श्रमातें. ॥ २४ ॥

( उपजाति )

भागीरथीच्याचि तटाकरानीं टाकीं, तुला मी नमितों करांनीं. ।
सीतापरित्यागज दोष माते असो, नसो तूज गुणोत्तमातें' ॥ २५ ॥

( मालिनी )

अशि परिसुनि वाणी, बंधुला हात जोडी;
अवनतमुखपद्मे दीर्घ निःश्वास सोडी. ।
तुरगसह रथातें आणवी सूतहातें;
पुसुनि गुरुसि, गेला क्षिप्र सीतागृहातें. ॥ २६ ॥

( माल्यभारा )

उतरूनि रथावरूनि, जाला विनत क्ष्मातनयापदांबुजाला. ।
मग तोषविलें तयास तीनें, पुसुनि स्वागत आदरें, सतीनें ॥ २७ ॥

( रथोद्धता )

लक्ष्मणागमनकारणास ती तत्क्षणींच समजे महासती. ।
रावणप्रमुखराक्षसांतदा देवरासह असें वदे तदा. ॥ २८ ॥

( स्रग्धरा )

सौमित्रे ! म्यां विनोदेंकरुनि निशि जगत्कामकल्पद्रुमातें
रामातें याचिलें जें, रघुकुलतिलकें अर्पिलें तेंचि मातें; ।
ऐसें मानीत होतें परि निज हृदयीं, कीं खरें होत नाहीं,
यावत् सस्यंदनातें तुज न निरखिलें आपुल्या लोचनाहीं ॥ २९ ॥

( स्वागता )

जाहलासि हरिजिच्छमना ! तूं रामशब्दसहकारवसंत, ।
बोलिलें वचन सिद्धिसि नेती सत्यसंध, मनुसंभव, संत.' ॥ ३० ॥

( उपजाति )

बोलोनि ऐसें द्रविणें दुकूलें घे देवराच्या स्वमतानुकूलें. ।
'श्रेयोभिवृद्ध्यर्थ' म्हणे अजा ती, 'पूजीन हस्तें सवधू द्विजाती' ॥ ३१ ॥

( शार्दूलविक्रीडित )

स्वर्णाच्या मणिचित्रिता स्वपतिच्या वंदूनिया पादुका,
सीता ठेवितसे रथीं मुनिमनोरत्नांचिया संदुका ।
तो धन्य क्षितिपाल मैथिल जनीं, लोकत्रयाल्हादिनी
ऐशी कांतपदांबुजैकनिरता ज्याची सती नंदिनी, ॥ ३२ ॥

( पृथ्वीवृत्त )

सुरद्विरदगामिनी जनकनंदिनी क्षिप्र ती,
निघे मग पुसावया हृदयनाथमातेप्रती ।
स्वभालगतकुंकुमांकित करूनि तीचीं पदें
असें वदतसे मुखें निजवरप्रमोदास्पदें ॥ ३३ ॥

( माल्याभारा )

'मज दोहद जाहला असे कीं, निरखावें नयनें सुरापगेला. ।
सगरात्मजदोषपंक जीच्या जलयोगें सकल क्षयासि गेला ॥ ३४ ॥
सुरमानवनागलोककांता बहु माहात्म्य जिचें सदैव गाती, ।
जरि होइल आपुली अनुज्ञा, तरि पाहीन सुखें सुरापगा ती. ॥ ३५ ॥

( उपजातिवृत्त )

नेला जयानें हरिजित् क्षयाला, तो अग्रजाज्ञेस्तव मत्क्षयाला, ।
करावया पूर्ण मनोरथातें, आला असे घेउनियां रथातें' ॥ ३६ ॥

( विबुधप्रिया )

ते म्हणे तिजला, नवीनशिरीषपुष्पसुकोमले !
[ मद् ] गृहागमनेंचि[1] हे तव पादपल्लव कोमले; ।
जासि सांग कशी वनाप्रति ? वृक्ष कंटक तीव्र ते.
वक्त्रकांति सुकेल, होइल ओष्ट शुष्क; पतिव्रते !' ॥ ३७ ॥

( शालिनी )

कौसल्येची स्नेहसद्रत्नखाणी वाणी ऐशी आयके रामराणी. ।
पाणी तीतें जोडुनी, लोकगीता सीता बोले भारती हे विनीता. ॥ ३८ ॥

( मालिनी )

'मम वर वनवासीं कंटकध्वंसकारी,
मरणजलधिमग्न स्वप्लवंगांसि तारी, ।
विमलगुणसुधेचा सिंधु हा रामराजा,
अनुदिन जपतां, कां ओष्ट वाळेल माजा ? ॥ ३९ ॥

( अनुष्टुप् )

असे भवत्कृपाछत्रच्छाया मन्मस्तकीं सदा; ।
कसे क्लेशार्ककिरण स्पर्शतील मला वदा ? '॥ ४० ॥
पीती स्वकर्णांजलिंहीं एवं वागमृता[2] सत्या, ।
देती आशीर्वादयुक्त आज्ञापाथेय तीस त्या. ॥ ४१ ॥
कैकेयी, रामजननी सुमित्रा, या तीघींस[3] ती, ।
कृतप्रदक्षिणा वंदी, पुसे, मग निघे सती. ॥ ४२ ॥

---

१ 'अत्र आगमनें' असा अन्यपाठ – काव्यसंग्रहप्रतपरिशिष्ट. 'म हा गमनें चि' – काव्येतिहाससंग्रहपाठ. २ 'वागस्मृता'–काव्येतिहाससंग्रहप्रत. ३ 'तिघेस' असा मूळपाठ असावा, असें यमकावरून वाटतें–काव्यसंग्रहप्रतपरिशिष्ट. 'तिघी सती'–काव्येतिहाससंग्रहप्रत.

( प्रमाणिका )

रघूत्तमांघ्रिसारसा, स्मरे प्रहृष्टमानसा, ।
बसोनियां[1] रथावरी, प्रयाण तूर्ण ते करी. ॥ ४३ ॥

( उद्गीतिछंद )

जैमिनिकृतभारतगतहयमेधीं कुशलवाख्यानीं, ।
हा तिसरा अध्याय श्रवण करावा रसज्ञमुख्यांनीं. ॥ ४४ ॥

## अध्याय चवथा



( पृथ्वीवृत्त )

वनाप्रति विनागसा दवडिली धरानंदिनी,
म्हणूनि बहु दुःखिता स्वपटहस्वनाक्रंदिनी, ।
निवारित असे तदा सकरुणा अयोध्या सती
समीरणचलांकुशध्वजकरें जणों तीस ती. ॥ १ ॥

( गीतिवृत्त )

मार्गी चालत असतां, दीरासह ते बसोनि रम्य रथीं, ।
ऐशा दुश्चिन्हातें पाहे क्षितिकन्यका अरण्यपथीं. ॥ २ ॥

( अनुष्टुप्छंद )

पुढें येउनियां भीमा बोले वागशिवा शिवा; ।
लवे लोचनही तीचें त्या काळीं उजवें जवें; ॥ ३ ॥
धांवती, मार्ग लंघूनी, मृगांची व्याकुळें कुळें. ।
पाहुनी दुर्निमित्तांतें, म्हणे दीरास ती सती. ॥ ४ ॥
' दुश्चिन्हांतें स्वनेत्रांहीं रक्षोवृंदापहा ! पहा, ।
भयसंसूचका भल्लू रडते भैरवें रवें. ॥ ५ ॥

---

१ ' सोनिया '–काव्येतिहाससंग्रहप्रत.

( वसंततिलका )

गोमायु आणिक मृगें रडताति वाटे
व्यापूनि, यास्तव मला भय फार वाटे. ।
लोकैकपालक मदीय मनोविसावा,
श्रीराम बंधुसह नित्य सुखी असावा. ॥ ६ ॥

( शिखरिणी )

जनस्थानीं आले खरमुखमहाराक्षस रणीं,
तयांतें दावी जो शमननगरद्वारसरणी; ।
उदार प्रत्यर्थीप्रति शरघनाच्या वितरणीं,
असो तद्बाहूंचें बळ खळबळध्वांततरणी. ॥ ७ ॥

( शार्दूलविक्रीडित )

साक्षात्पातकमूर्ति रावण जगत्तोषांबुजाचा करी,
पाषाणीं जलराशि बांधुनि तया काळातिथी जो करी. ।
विद्याश्रीमदमद्यमूढहृदयस्वर्द्विण्मरुद्वासुकी,
माझा प्राणसखा, निरंतर असो श्रीरामराजा सुखी.' ॥ ८ ॥

एवं गौतमदारतारणधनुर्भंगादिलीलांस ती,
मार्गीतें क्रमितां, स्मरोनि पतिला कल्याण भाकी सती. ।
सर्वांचाहि असाच दंडक असे, प्रीतिप्रकर्षास्तव
होतो व्यर्थचि नित्य इष्ट विरहें चित्तांत चिंतोद्भव. ॥ ९ ॥

नेत्रांहीं अवलोकुनी स्मृतिभवद्विण्मौलिमालाकृति,
चिंताकुंचितचित्तवृत्तिस 'पहा माते !' म्हणे तो कृती; ।
'हे हंसस्वरभाषिणी तुजकडे पद्मेक्षणें पाहते
स्वर्गंगा लहरीभुजा उचलुनी भेटावया बाहते. ॥ १० ॥

( प्रमिताक्षरावृत्त )

फलपुष्पपल्लवभरें लवले तरुराज तूज करिती नमनें; ।
विहगारवें कुशल हे पुसती; सुख फार यांसहि तवागमनें. ॥ ११ ॥

( पुष्पिताग्रा )

सकरुणहृदयें पवित्र केलें, अवचित देउनि दर्शन स्वरानीं, ।
म्हणउनि मधुपांगना प्रहर्षें, तव गुण वर्णिति मंजुळ स्वरांनीं. ॥ १२ ॥

( प्रहर्षिणी )

आली की बहु दिवसीं स्वकाननातें, देखाया दशमुखजिन्मनोभिरामा, ।
या येती क्षितिपति[1] [ पत्नि ! ] शुभ्रवर्णा, सामोऱ्या म्हणुनि तुला
मराळरामा. ॥ १३ ॥

( उपजाति )

ऐकोनियां देवरभारतीतें, संतोष झाला मग फार तीतें.
विलोकितां त्या अमरापगेला, संताप तीचा विलयास गेला. ॥ १४ ॥

( अनुष्टुप्छंद )

सीतेसि पाहतां हर्षे देवी गौरपयोधरा; ।
गंगावलोकनें तोषे देवी गौरपयोधरा. ॥ १५ ॥

( गीतिवृत्त )

तरणिवर बसुनि, झडकर तरणिकुलवरक्षमाभृदनुकूला, ।
देवरतिकरनदीच्या देवरसह जाय शीघ्र परकूला. ॥ १६ ॥

( वंशस्थ )

करूनिया मज्जन विश्वपावनीं वनीं, प्रवेशे मग जानकी वनीं. ।
सचिंत पाहे मग देवरास ती सती, म्हणे ' आश्रम कां न दीसती ? ॥ १७ ॥

( वसंततिलका )

शार्दूल पंचमुखऋक्षवृकादि सेना
पादोत्थधूलिपटलें दिनकृत् दिसेना. ।

---

१ या चरणांत मुळांत एक शब्द सुटला होता; म्हणून ' काव्यतिहाससंग्रहकारां'नीं ' पत्नि ' हा शब्द स्वकल्पनेनें घातला. ' काव्यसंग्रहकार ' येथें ' कीर्ति ' हा शब्द सुचवितात. पण ही ओळ सीतेलाच अनुलक्षून असल्यामुळें, ' क्षितिपतिपत्नि ! ' असा संबोधनार्थी पाठच घेणें युक्त वाटतें. स्पष्टीकरण पहा.

पंचास्यदारितगजेंद्र शिरोविमुक्ता
सर्वत्र भूमिवर त्या दिसताति मुक्ता. ॥ १८ ॥

सिंहाहतद्विरदशोणितसिक्त पृथ्वी,
तद्दंतसंघपटला बहुसाल वाटे, ।
शुभ्रप्रसूनमयदाम्रविभूषितांगी
स्त्री रक्तचंदनविलेपितमूर्ति वाटे. ॥ १९ ॥

शार्दूलहस्तगतकंठमृगांगनांची
वाणी भयास्तव जणों शिरते स्वकानीं, ।
निर्दग्धभूमिरुह हे नयनीं विलोकीं,
क्रूरद्विजिव्हगणफूत्कृतिपावकांनीं. ॥ २० ॥

( द्रुतविलंबित )

घनरवांतकरा! खणतो पहा, वनबिडाल महोस कसे वनीं,
बहु भयंकर कर्कश हे महा, परम सस्पृह मूषकसेवनीं. ॥ २१ ॥

( शार्दूलविक्रीडित )

दावग्रस्तवनोत्थधूमनिकरीं पक्षी न ते दीसती;
निर्दग्धांडशिशुप्रलापनरवें आहेतसे भासती. ।
पंचास्याहतसांद्रकज्जलनिभस्तबेरमांची शवें,
मातें दूरुनि गंडशैल गमती संदेहबुद्ध्युद्भवें ॥ २२ ॥

क्षमासमाना क्षांत्यर्थीं, रूपीं प्रत्यक्ष मासमा[१], ।
न दीसती कां आजूनि पुण्यनीरनदी सती ? ॥ २३ ॥

होमधूमारुणाकर्णशोणाब्जच्छदलोचना, ।
न दीसती आजुनी[२] कां साध्वी संतापमोचना. ॥ २४ ॥

ब्रह्मचारी, दंडमौंजीहरिणाजिनमंडित, ।
न दीसती कां अद्यापि सद्विद्यासक्त पंडित. ॥ २५ ॥

---

१ ‘मास सा’—काव्येतिहाससंग्रहप्रत. २ ‘अजुनि’—काव्येतिहाससंग्रहप्रत.

( शार्दूलविक्रीडित )

आम्नायप्रतिपाद्यधर्मसरणीपांथ, प्रसन्नाकृती,
संसारांबुनिधानपानकरणीं कुंभात्मजन्मे, कृती, ।
शापानुग्रहदक्ष, कां न दिसती भूदेव अद्यापि ते,
चिंता लक्ष्मण ! सर्पिणी म्हणुनियां, तोषामृतातें पिते. ॥ २६ ॥

( माल्यभारा )

रघुवीरपदाब्जसेवनातें करुनी अंतर, धावलें वनातें. ।
अशि मी अविवेकलब्धपापा; सुकृती लोक कसा दिसेल बापा ? ॥ २७ ॥

( अनुष्टुप्छंद )

पवित्राश्रमवासी ते पवित्रासिच दीसती, ।
लक्षीजे[1] तो न नेत्रांहीं कौशिकीं पद्मिनीपती.[1] ॥ २८ ॥

( उपजाति )

प्रजावतीची अशि दीन वाणी आणी दिराच्या नयनांसि पाणी,
असें वदे रावणपुत्रहंता, संतापसंतप्तमनोनियंता. ॥ २९ ॥

( वसंततिलका )

' ते पावनाश्रम पहा दिसताति दूर,
व्योमासि चुंबित असे द्विजहोमधूर, ।
जावें इतःपर हळूहळु धूमराजी
लक्षी[2] करूनि, दिसते विजितांबरा जी. ॥ ३० ॥

( उपजाति )

लोकप्रवादें त्यजिलें वनांतीं तुला जगद्वंद्यपदें वरानें.' ।
प्रशोकबाष्पाकुलकंधरानें. सांगीतलें हें तिस देवरानें. ॥ ३१ ॥

---

१ ' लक्षीजे तो ' असा अन्यपाठ—काव्यसंग्रहपरिशिष्ट. २ 'लक्ष्मी करूनि—' काव्येतिहाससंग्रहपाठ.

( सारंगवृत्त )

'मातर्नमस्ते क्षमस्वापराधी न, मानी मला, सर्वथा मी पराधीन.' ।
बोलोनि हें नम्र झाला रडे फार; अस्त्रालि ते मौक्तिकांचा जणों हार. ॥ ३२ ॥

( अनुष्टुप् )

ऐसें ऐकोनि वाणीतें, शोकें दीर्घ स्वरें रडे. ।
मूर्च्छावातविनिर्धूता सीतारंभा धरे पडे. ॥ ३३ ॥
करूनि वामहस्ताचें छत्र शक्रजिदंतक, ।
सांशुकातें दक्षिणातें करी सत्तालवृंतक. ॥ ३४ ॥

( पृथ्वी )

तिच्या तनुसि शिंपुनी स्वनयनोदकें, 'लेखनी,'
म्हणे 'तव जळो विधे ! सुविषमाक्षरांची खनी. ।
असेल घडली जरी रघुवरांघ्रिसेवा मला,
प्रशोकभरमूर्च्छिता त्वरित हे उठो कोमला.' ॥ ३५ ॥

( वसंततिलका )

अंतर्बहिस्थित रघूत्तमसूनुधाकें[1],
प्राणासि धैर्य तिळमात्र न होय जाया. ।
मोहांधकारपतिता विधिच्या विपाकें,
नेत्रें हळूच उघडी रघुवीरजाया ॥ ३६ ॥

( इंद्रवंशा )

निघूनियां[2] कश्मलसिंधुच्या कडे, पाहे दिराच्या मुखनिरजाकडे; ।
बोले, 'मला त्यागुनि काननीं कसा जाशील वत्सा ! स्वपुरासि लोकसा ? ॥ ३७ ॥

( शिखरिणी )

मदर्थ स्नेहानें सदयहृदया ! त्वां निजकरें
जनस्थानीं केलीं छदनसदनें हृत्सुखकरें,

---

१ 'अंतर्बहिस्थित रघूत्तमसूनु धाकें'—काव्येतिहाससंग्रह. २ 'जाऊनिया' काव्ययसंग्रहपरिशिष्टांत दिलेला पाठ.

फलें पुष्पें मूळें प्रतिदिवस आणूनी सुरसें,
वनातेंही केलें श्रम न गणुनी, स्वात्मघरसें. ॥ ३८ ॥

( वसंततिलका )

आतां मदर्थ वद, कोण तशा विशाळा,
येथें करील तुजवांचुनि पर्णशाळा ? ।
जातोसि टाकुनि कसा मज एकलीला ?
हा ! दारुणा परमपापविपाकलीला[1]. ॥ ३९ ॥

पूर्वीं पुढें सतत रक्षित राम होता,
काळानळीं सुरसपत्नघृतासि होता. ।
मागें तसाची, मज मानुनियां सुमित्रा,
केलेंचि रक्षण सदैवहि तूं सुमित्रा ! ॥ ४० ॥

( शार्दूलविक्रीडित ).

माथां रत्नकिरीट, कुंडलयुग श्रोत्रीं विराजे बरें,
बाहू अंगदभूषणें विलसती, सन्मध्य पीतांबरें; ।
कंठीं मौक्तिकहार, चंदनउटी अंगीं, घनश्यामला
ऐशी राघवमूर्ति यावर कधीं भेटेल वत्सा ! मला ? ॥ ४१ ॥

सांद्रानंदसुधानिधि, स्मितजितप्रद्युम्नराकापती, ।
ज्यातें पाहुनि देवलोकवनिता कामज्वरें कांपती; ।
कस्तूरीतिलकाभिराम ममहृन्नेत्रैकविश्राम तें,
रम्य श्मश्रुल राघवानन कधीं भेटेल वत्सा ! मतें ? ॥ ४२ ॥

( वसंततिलका )

अंतर्बहिर् भवरवि स्वकरें सदाही
मिथ्याप्रपंचपथिकास नरास दाही. ।
तत्तापसंततिस जो स्मरणेंच नाशी,
रामांघ्रि देइल कधीं सुख लोचनांशीं ? ॥ ४३ ॥

१ ‘ विपाककीला ’—काव्यसंग्रह.

( मंदाक्रांता )

'सीते ! सीते !' म्हणवुनि वनीं शोधितां नित्य मातें,
जो आलिंगी निजभुजयुगीं[1] घट्ट वल्लीद्रुमातें, ।
मत्प्राप्त्यर्थ द्विजवरसखा[2], मुख्य भर्ता जगाचा,
पूर्वी झाला विरहविमना मित्र शाखामृगांचा. ॥ ४४ ॥

( उपजाति )

जाणोनियां क्षिप्र मदाशयाला, म्हणें धरावें प्रमदाशयाला; ।
येऊनि पूर्वी मम तातपूर्ते, केला धनुर्भंग नितांत पूर्ते. ॥ ४५ ॥

( गीतिछंद )

मद्विधिकलशभवानें रामकृपासिंधु शोषिला सारा; ।
आतां मज शफरीला कैंचा अन्यत्र वांसरा ! थारा ? ॥ ४६ ॥

( उपजाति )

स्वभ्रातृघातोद्यमभीषणातें, व्यापार हा योग्य बिभीषणातें; ।
वत्सा ! तुझी केवळ नम्र मुद्रा; कां धाडिलें तूज दयासमुद्रा ? ॥ ४७ ॥

( रुक्मिणीवृत्त )

त्यजावया मज जनहीन काननातें, प्रयोजिला अदय सुकंठ का न नाथें ? ।
कुकर्म हें विहित तया वलीमुखाला, तुझ्या मलीमसरुचि पावली मुखाला.॥ ४८ ॥

( गीतिवृत्त )

श्वश्रूजनासि माझें नमन निवेदूनि, सर्वविदितनया ! ।
स्मरण धरुनि, सांगावा निरोप हा त्यास पंक्तिरथतनया. ॥ ४९ ॥
सांगुनि[3] असें दिराला, निरोप हा पाठवी क्षितिवराला.
दृढ करुनि हृदय, कानें तो ऐकावा समस्त रसिकानें. ॥ ५० ॥

---

१ 'युगभुजयुगीं'—काव्येतिहाससंग्रहपाठ. २ 'द्विजवर सख्या'—काव्येतिहाससंग्रहपाठ. ३ सीतेनें रामास पाठवावयाचा निरोप येथून सांगण्यास सुरवात केली आहे; व त्याची प्रस्तावना पंतांनीं या गीतींत केली आहे. 'काव्येतिहाससंग्रहांत ही गीति ५४ वी दिली आहे, ती चूक आहे,' हें काव्यसंग्रहकारांचें म्हणणें बरोबर

( वसंततिलका )

ध्यानेक्षणेंकरुनिया हृदयाख्यधामीं
पायासि लक्षित असें तुमच्या सदा मी. ।
प्रत्यक्ष लागुनि परी मम मस्तकाला,
देतील यावर कधीं न कळे सुखाला. ॥ ५१ ॥

( उपजाति )

हृत्कायवाक्कर्मजदोष मातें नसे, कसें हें न कळे[1] वराला ? ।
सत्वक्षयें पातक; अन्यथा मी, न वाहतें हीन कलेवराला. ॥ ५२ ॥

( अनुष्टुप् )

आहे मी सत्वसंपन्ना, कृपात्याग नका करूं;
असाधु अथवा साधु परंत्वत्याज्य लेंकरूं. ॥ ५३ ॥

( गीतिवृत्त )

अपराधवियुक्ता मी, परि मज त्यजिलें वनांत भूमिवरें. ।
बुध म्हणति, 'दैव दुस्त्यज' तें आलें प्रत्ययासि आजि बरें. ॥ ५४ ॥

( वसंततिलका )

दोषज्ञ ! सेव्य ! सुचरित्रसुधैकसिंधो !
सर्वैकवंद्य ! नृपसत्तम ! दीनबंधो !
कां त्यागिलें मज वनीं ? करुणांबुवाहा !
त्वद्विप्रयोग बहु दारुण राघवा ! हा. ॥ ५५ ॥

त्वत्पादपद्मभजनाविण भारभूतें
या जीवितें करुनि केवळ भार भूतें. ।
टाकूं जरि त्वरित निंद्य कलेवराला,
विघ्नस्वरूप तव वीर्यनिषेक झाला ॥ ५६ ॥

दिसतें. ५१–६१ या दहा श्लोकांत सीतेचा रामाला निरोप आहे. ६२ व्या श्लोकांत हा निरोप संपल्याचा स्पष्ट उल्लेख आहे. या गीतींत निरोपाची प्रस्तावना आहे. तेव्हां ही गीति ५१ श्लोकाच्या पूर्वी काव्यसंग्रहकारांनीं घातली आहे ती योग्य आहे.

१ 'कळलें'—काव्येतिहाससंग्रह.

( उपजाति )

वियोगभीतिस्तव विग्रहातें न लाविला चंदनलेप हातें;
मध्यें नदीपर्वतवृक्षलक्ष येउनि,[1] झालासि कसा अलक्ष ? ॥ ५७ ॥
प्रसूति झाल्यावरि, देहनाथा ! करीन मी तीव्र तपःप्रयोगा; ।
जन्मांतरीं होउनीयां तुझी स्त्री, जेणें न पावे क्षण विप्रयोगा. ॥ ५८ ॥

( गीतिवृत्त )

स्वहृदय अशनिहुनि कठिण, हें तथ्यचि या क्षणीं मला कळलें. ।
विरहघनपतनविदलित आजुनि शतचूर्ण होइना जळलें. ॥ ५९ ॥
अंतर्वत्नी पत्नी त्यजिली त्वां, जेंवि पांसुला रामा. ।
हें काय विहित तुझिया कुळास, शीळास ? पंडिता ! रामा ! ॥ ६० ॥

( वसंततिलका )

त्वत्पादनीररुहलंपट चित्त माझें;
त्याणेंहि आजि मजला त्यजिलें सखा जें. ।
होतां सदैव विपरीत, निजाप्तमित्रें
होताति, केवळचि हेतुविना, अमित्रें.' ॥ ६१ ॥

( उपजाति )

निरोप हा सांगुनि देवराला, सीता तयाला मग दे वराला. ।
म्हणे, 'तुतें क्षेम असो अशातें; सदा सुबुद्धे ! बहु पाव शातें. ॥ ६२ ॥
एवं कथावा रघुनंदनातें, निरोप हा, सांगुनि वंदनातें. ।
कळेल जैसें तुजला, कृपाळा ! जाऊनि तैसें विनवीं, नृपाळा.' ॥ ६३ ॥

( अनुष्टुप् )

ओकआत्मधनस्त्रीतें, ओक मानूनि मानसें, ।
तोकवद् रोदन तदा तो करी, ऐकतां असें. ॥ ६४ ॥

( वियोगिनी )

' विपिनीं वनदेवता सदा तुज रक्षूत, न दुःख हो कदा. ' ।
मृदु बोलुनियां असें, तिला नमुनी, लक्ष्मण वीर चालीला. ॥ ६५ ॥

---

१ 'जाऊनि'—काव्येतिहाससंग्रह.

( शिखरिणी )

अयोध्येला जातां, त्यजुनि तिजला, तो बहु रडे,
तनू नेली कष्टें, परि मन तयाचें न मुरडे. ।
जसा वत्स स्वांबाविरहभवतापें तळमळे,
तसा हाही ज्याचें वदन रडतां केवळ मळे. ॥ ६६ ॥

( गीतिवृत्त )

नयनागोचर देवर झाल्यावर, ती पडे धरेवरती. ।
तळमळ करि, पळभरि कळ न पडे, करपद तिला न आंवरती ॥ ६७ ॥

( अनुष्टुप् )

जनहीन वनस्थानीं दीना, जनकनंदिनी, ।
राजरामा, रजोरिक्ता, रुचिराक्षी रवें रडे ॥ ६८ ॥

( सारंगवृत्त )

झाला दिसेना असा जे क्षणीं दीर, गेला तिचा तीस सोडूनियां धीर; ।
हृच्छोकवल्मीकभूकश्मलव्याळ चावे, धरी घट्ट मातेसि तत्काळ. ॥ ६९ ॥

( प्रमिताक्षरावृत्त )

गळतीसमान नयनें गळती; लपनें न येति घड आलपनें; ।
निजविग्रहासि उठवी निजवी; जनकात्मजा स्मरतसे जनका. ॥ ७० ॥

( विबुधप्रिया )

शोक लास्य करी हृदंगणिं कंठ केवळ शोकला
कोमलाननपूर्णचंद्र तिचा तदा बहु कोमला ।
'कां पती रुसला ? म्हणे, सकलेंद्रियें बहु कांपती ।
भार तीस निजांग होय; वदे अशी मग भारती ॥ ७१ ॥

( गीतिवृत्त )

'जनकाची मी कन्या, रघुपतिची स्त्री, त्रिविष्टपीं मान्या,
तदपि अशी मदवस्था; शिव ! शिव ! लिहिलेंसि काय कमळस्था ! ॥७२॥

( वसंततिलका )

येईल लक्ष्मण फिरोनि न दूर गेला,
मद्वैर्यलोकविषयींच विनोद केला ।
कीं स्वप्न हा क्षणिक दुःखसुखप्रदाता ?
किंवा स्वकर्मफळ भोंगवितो विधाता ? ॥ ७३ ॥

( चंद्रिका )

रघुकुळतिळका ! मेदिनीपाळका !
सुहृदयपद्का ! पापपंकोदका
सुहृदलिकमला ! नीरदश्यामला !
अतुलभुजबळा ! भम्ररक्षोबळा ! ॥ ७४ ॥

( भुजंगप्रयात )

प्रवर्तोनियां सर्वथा आग्रहाते, त्यजावें जरी येक्षणीं विग्रहातें, ।
तरी भ्रूणहत्येमुळें उग्र हातें करील स्वयें धर्म तो विग्रहातें ' ॥ ७५ ॥

( गीतिवृत्त )

तोषधनाचे तस्कर, त्या सीतेचे असे विलाप वनीं ।
शिरले जेव्हां सत्वर दुःखप्रद ते चढोनियां पवनीं; ॥ ७६ ॥

शुक पिक सकल कलकलस्वरेंकरुनि भोंवतींच आरडती, ।
विविध पतगनिकररवच्छलेंकरुनि भूमिभूलता रडती ॥ ७७ ॥

टाकुनि नाव्यरसातें धांवुनि आले तिच्या समीप शिखी ।
शिंपुनि निज नेत्रजळें म्हणति, ' सतीचा विझो प्रकोपशिखी ' ॥ ७८ ॥

शिंपिति नेत्रजळांहीं स्वल्प शिवति भूमि धांवतां हरिणें; ।
स्वदुहितृशुगग्नितप्ता क्षिति म्हणउनि पोळती जणों चरणें ॥ ७९ ॥

शीतळकमळजळांहीं वर्षति तीच्या तनूवरि भ्रमरी. ।
निजवालधिचमरांहीं वीजिति तिस किंकरीपरी चमरी. ॥ ८० ॥

सुमुदालसा, जलार्द्रा, ज्यांच्या सजळें करीं, शिरीं कमळें, ।
ऐशा करिणी सेविति तिस कर्णव्यजनमारुतें विमळें. ॥ ८१ ॥

उदकस्थखगगणांहीं धांवुनि ते शिंपिली जलकणांहीं. ।
करिति शकुंतद्विजवर पक्षच्छायेसि शीघ्र तीजवर. ॥ ८२ ॥
झालें हंसांचें कुळ तें व्याकुळ तेथ जानकीशोकें, ।
ज्यांच्या मुखनयनांहुनि गळति मृणालें जळें तदवलोकें ॥ ८३ ॥

( स्रग्धरा )

पंचास्यव्याघ्रऋक्षप्रभृतिवनचरें केवळ क्रूर सत्त्वें,
तींही तत्काळ झालीं सकरुणहृदयें भूसुताशुद्धसत्वें ।
जें सन्मार्गप्रचारेंकरुनचि असतें संग्रहीं पुण्य हो ! तें
सर्वव्यापन्महीध्रप्रशमनविषयीं वज्रवद् दक्ष होतें ॥ ८४ ॥

( तोटकवृत्त )

कुश, कंटक, गोक्षुर, संचरणीं चरणीं क्षतद[1] स्वमुखें शिवती, ।
शिव[2] ती परि भूपतिची रमणी रमणीयपदांसि जपे पतिच्या. ॥ ८५ ॥

( गीतिवृत्त )

निजजननी क्षिति, हेही क्षितिजा, जाणूनियां असें नातें, ।
आलिंगुनि समजाविति म्हणउनि धूलिस्वसा जणों तीतें. ॥ ८६ ॥
हृद्गत मी परि कांहीं इचा श्रमाचा नव्हेचि परिहार, ।
म्हणुनि जणों अश्रूतें गाळी मुक्ताफळच्छळें हार ! ॥ ८७ ॥

( शार्दूलविक्रीडित ).

संगे घेऊनि वेदशास्त्रनिपुण च्छात्रांसि त्या काननीं
यूपार्थ भ्रमतां, क्रतुस्तव विलापातें तिच्या ऐकुनी
साक्षाद्भस्मजटाभृदीश्वर जणों मूर्ती जगत्पावनी
आला तेथ दयानिधान भगवान् वाल्मीकिनामा मुनी. ॥ ८८ ॥

( उद्गीतिछंद )

जैमिनिकृतभारतगतहयमेधीं कुशलवाख्यानीं ।
हा चवथा अध्याय श्रवण करावा रसज्ञमुख्यांनीं. ॥ ८९ ॥

---

१ 'क्षतदस्थ मुखे' — काव्येतिहाससंग्रह. २ 'शिवति' — काव्येतिहाससंग्रह.

# अध्याय पांचवा

—:❀:—

( उपजाति )

समीप येऊनि कळेवराशी पाहे, तदा त्यासि कळे वरांशी. ।
जेणे न राहे श्रमभार तीचा, केला मृदूपक्रम भारतीचा ॥ १ ॥

( शार्दूलविक्रीडित )

' वत्से ! काय तवाभिधान ? रडसी कां काननीं निर्जनीं ?
कोणाच्या सुकृतैकनीरनिधिच्या वंशांत झाली जनी ? ।
कोण त्वत्पति ? टाकिलें अकरुणें आणोनि येथें तुला
कोणीं ? सर्वहि सांग तूं मज निज क्लेशाचिया हेतुला.' ॥ २ ॥

( अनुष्टुप् )

वाणीतें ऐकतां, तीचें चित्त संतोष पावलें. ।
बोले, वंदूनि शिरसा मुनिचीं दिव्य पावलें. ॥ ३ ॥

( उपजाति )

महामुने ! मैथिल तात माझा; मन्नाम सीता; पति रामराजा; ।
भूवल्लभाज्ञाप्रियमंदिरानें आणूनि येथें, त्यजिलें दिरानें. ' ॥ ४ ॥

( अनुष्टुप् )

ऐसें ऐकूनि, वाल्मीकि वदता जाहला मुखें. ।
आकर्णावें रसज्ञांहीं स्वस्थ होऊनिया सुखें. ॥ ५ ॥

( शार्दूलविक्रीडित )

' सर्वज्ञानिजनासि संमत असा श्रीमैथिल त्वत्पिता,
वत्से ! तूंही पतिव्रताजनशिरोभूता जगत्पूजिता, ।
माझा केवळ तो सखा दशरथ क्षोणीशचूडामणी,
या वेळेसि कशी न होशील दयापात्र, क्षितिस्वामिणी ! ॥ ६ ॥
केलें दुष्कर देवकार्य सकल क्ष्मादेव केले सुखी;
न्यायें भूपती पाळितो निजजनकेशाटवीचा शिखी; ।
माझा क्रोध तथापि मैथिलसुते ! आहेचि रामावरी,
दोषावांचुनि टाकिली अकरुणें सत्वोदरी सुंदरी. ॥ ७ ॥

( मालिनी )

रिपुयमयमपुत्रप्राप्तिला पावसी, ते
करितिल सुख तूतें; टाकिं चिंतेसि, सीते !।
मुलि ! उठ चल माझ्या पुण्यपुंजाश्रमाला;
शिव ! शिव ! बहु रानीं पावलीस श्रमाला. ॥ ८ ॥

( पृथ्वी )

मदाश्रमपदाश्रितस्थिरचरासहि व्यापदा
कदापि न शिवे, सुखी विगतवैर सारे सदा. ।
उदास हृदयीं न हो, द्विजवधूसुता शर्मदा
न दावितिल भिन्नता तुज महानुकंपास्पदा. ॥ ९ ॥

( गीतिवृत्त )

होइल सुखप्रसूती, अपत्यसंस्कारविधिहि भूतनये !।
वत्से ! मदाश्रमाला मानुनियां स्वगुरुचें निकेतन, ये.' ॥ १० ॥

( सारंग )

एवं तदा ऐकता विप्रवाणीस, झाला महातोष काकुत्स्थराणीस. ।
चित्तीं म्हणे, 'हा मुनि स्तुत्य विश्वास, ठेवी तयाच्या पदीं घट्ट विश्वास.'॥ ११ ॥

( जलोद्धतगति )

पुशी अवनिजा निजाश्रुसलिलालिला सुविकला कलानिधिमुखी. ।
उठूनि, नमुनी मुनीस, मग ती गती करि तदा तदाश्रमपदा. ॥ १२ ॥

( स्रग्धरा )

सद्विद्यासक्तशिष्यव्रजतनयसुतास्त्रीयुत ब्रम्हमाला
सामोऱ्या तीस आल्या परिसुनि सहसा रामरामागमाला.
आशीर्वादामृतानें मुनिवरघन ते तीवरी वर्षती; तें ।
पाहुनि ब्राम्हणांचें सदयपण, महा जाहला हर्ष तीतें. ॥ १३ ॥

( गीतिवृत्त )

म्हणति ऋषिस्त्री, हातें स्पर्श करुनियां तदीय देहातें ।
'आम्हीं सर्व तवाश्रित, आलिस तूं आपुल्याचि गेहातें. ॥ १४ ॥

( विबुधप्रिया )

फार तूं श्रमलीस हिंस्त्रगणाचिया भवनीं वनीं,
दुःखभीतिस[1] यावरि क्षितिकन्यके न ! मनीं मनीं.' ।
प्रार्थिली असि, पूजिली मग तापसीनिकरें करें,
अर्पिलीं तिस कंदमूळफळें मुनिप्रवरें वरें. ॥ १५ ॥

( गीतिवृत्त )

मग शिष्यप्रकारानें, पावुनि वाल्मीकिच्या निदेशाला, ।
निर्मुनियां स्वकरानें दिधली भूनंदिनीस दलशाला. ॥ १६ ॥

( शार्दूलविक्रीडित )

पूजी राघवपादुकांप्रति; नमी वाल्मीकिला ते सती;
सेवी तद्वदनोद्गतोत्तमकथापीयूषधारेस ती; ।
सिंपी श्रीतुलसीवनासि [2]तमसाविश्वंभराकारणें,
अर्पी वेंचुनियां सुमांसि मुनिच्या देवार्चनाकारणें. ॥ १७ ॥

वन्याहारपरा, कृशा, सुमलिना, संवीतवल्कांबरा,
कांतध्यानधरा, सदैव तमसास्नानैकबद्धादरा, ।
ऐसी रामवियोगतप्तहृदया सीता मुनींद्राश्रमीं,
कल्पव्यायतवासरांसि परम क्लेशेंकरूनि क्रमी. ॥ १८ ॥

गर्भाचे नवमास पुण्यविपिनीं संपूर्ण झाल्यावरी
वृद्धस्त्रीसमुपासिता, जसि महासिध्यासिता शांकरी, ।
सलग्नग्रहयुङ्‌निशीथसमयीं पुत्रद्वयातें सुखें
वैदेही प्रसवे, सती प्रमुदिता गीतासि गाती मुखें. ॥ १९ ॥

( गीतिवृत्त )

शोभे प्रदक्षिणार्चि स्वधेश, होतां सती प्रसूता हे, ।
झाल्या विमला काष्ठा, शीतळ सौरभ सदागती वाहे. ॥ २० ॥

---

१ 'दुःखभीतिसमयावरि क्षिति क्षितिकन्यके न मनीं मनीं.'—काव्येतिहाससंग्रह.
२ 'पयसा'—काव्यसंग्रहपरिशिष्ट.

द्युतिकरपुत्रयुगाला तदा प्रसवली विदेहकुलभूषा, ।
मुग्धांस पर्णशाळा वाटे तेजःसमूहमंजूषा. ॥ २१ ॥

ज्या दलशालेमध्यें होता श्रुतिशास्त्रतत्वलीन मुनी, ।
तेथें धांवत जाउनि बद्धांजलि शिष्य बोलती नमुनी. ॥ २२ ॥

'ब्रह्मन् ! भवत्प्रसादें सीता व्याली किशोरयुगळाला, ।
त्याच्या तेजःप्रसरें दीपाचा गर्व सर्वहि गळाला. ॥ २३ ॥

भास्करविधू म्हणावें, तरि तापकलंकसंवियोजित कीं; ।
दिसताति साधुचिन्हें, सामुद्रिकशास्त्रसंमतें जितकीं. ॥ २४ ॥

( पुष्पिताग्रा )

कुशल वचन ऐकतांचि ऐसें, कुशलवमुष्टिधर द्विजेंद्र गेला; ।
रुचिरवदनबालकद्वयाच्या रुचिरवसंग्रहणें प्रहृष्ट झाला. ॥ २५ ॥

( शार्दूलविक्रीडित )

होते जे करपंकजीं कुशलव क्ष्मानिर्जरें रक्षिले,
त्यांहीं ते शिशु मंत्रपूततमसापाथःकणें प्रोक्षिले. ।
नामें तींच सुजातकर्मसमयीं चित्तांतरी भाविलीं,
बाराव्या दिवसांत नामकरणीं अत्यादरें ठेविलीं. ॥ २६ ॥

( अनुष्टुप् )

द्वादशाब्दीं कुमारांचीं केलीं मौंजीनिबंधनें, ।
तपःशिखिमुखक्षिप्तस्वपूतवपुरिंधनें. ॥ २७ ॥

( अमृतध्वनि )

मागोन आणवि तदा जो वसिष्टमुनिच्या नंदिनीप्रति मुनी
प्रार्थी कवींद्र तिस पूजूनि विप्रजनसंभोजनार्थ नमुनी. ।
त्या कामधेनुतनुपासून दिव्य विविधान्नें बहु प्रकटलीं;
तत्सेवनें विपिनवासिद्विजेंद्ररसनाग्रें मुखांत नटलीं. ॥ २८ ॥

( गीतिवृत्त )

विधृतचतुःषष्टिकला, मुक्ताहारा, मनोहरा, विमळा, ।
वरिति चतुर्दश विद्यास्वयंवरवधू तयास मग सकळा. ॥ २९ ॥

अध्यापिली मुनीनें त्यातें रामायणाभिधा स्वकृती, ।
गाती वीणातालस्वरमिश्रितमंजु ते कुमार कृती. ॥ ३० ॥

कुशलवगानावसरीं गीतरसें मृगकुळें न तीं चरती, ।
अष्टौ सात्विक भाव श्रोतृगणीं एकदाची संचरती. ॥ ३१ ॥

कुशलवगानावसरीं[1] तच्छ्रवणें भुजगलोचनें निवती, ।
शून्या होय सुधर्मा, पवनाचे दार फार मानवती. ॥ ३२ ॥

कोणीं कृपाण, कोणीं सुचर्म, कोणीं समर्पिले बाण; ।
कोणीं किरीट, कोणीं कार्मुक, कोणीं दिलें तनुत्राण. ॥ ३३ ॥

एवं त्यांच्या गानें झाला नाहीं कधीं चमत्कार ? ।
कोणीं पण विप्रांहीं केला नाहीं तयांसि सत्कार ? ॥ ३४ ॥

( अनुष्टुप् )

दुष्टहृत्पद्मसारातें पीती त्यांचे शिलीमुख, ।
सज्जनांच्या पदांभोजीं हेचि होती शिलीमुख. ॥ ३५ ॥

( स्रग्धरा )

एवं वाल्मीकिसेवानिरत कुशलव स्वप्रसूच्या सतीच्या
आज्ञेतें सेवनातें क्षणहि न चळती, साधु जैसे श्रुतीच्या. ।
वन्याहारी, परंतु प्रमुदितचि सदा ते महाधैर्यसिंधू
भिन्ना मूर्तीच त्यांच्या, न मन, निवसती यापरी दोघ बंधू. ॥ ३६ ॥

( उद्गीतिवृत्त )

जैमिनिकृतभारतगतहयमेधीं कुशलवाख्यानीं ।
अध्याय पांचवा हा श्रवण करावा रसज्ञमुख्यांनीं ॥ ३७ ॥

---

१ 'लवकुशगानावसरीं'—काव्येतिहाससंग्रह.

## अध्याय सहावा

( स्रग्धरा )

साकेतीं श्रीवसिष्ठप्रभृतिमुनिंस तो राम सन्मार्गचारी,
'क्षाळावा ब्रह्महत्यामळ सुकृतजळें कोणत्या ?' हें विचारी, ।
ते लंकेशांतकाला द्विजवर म्हणती, 'हे जगच्छक्र ! तूतें
नाहीं दुःसाध्य कांहीं, पण कर विधिवद्वाजिराजक्रतूतें; ॥ १ ॥

आम्नायाच्या मतें स्त्रीरहित नर नव्हे यज्ञकर्माधिकारी;'
जाला या हेतुसाठीं कनकजनकजाकांत तो ताटकारी;
दीक्षास्वीकार केला मुनिजनवचनप्रेरितें विश्वतातें,
योजूनी त्राणकर्मीं मखहयपतिच्या त्या सुमित्रासुतातें. ॥ २ ॥

'कौसल्या एकवीरा, तदुदरभव जो राम काकुत्स्थ वीर,
हा तन्मुक्ताश्व; यातें[1] धरु समरबळी, ज्यासि होईल धीर.' ।
एवं सौवर्णपत्रीं लिहुनि रघुवरें बांधिलें वाजिभाळीं,
सोडी विध्युक्त त्यातें, निजकरकमळें पूजुनी साधु काळीं ॥ ३ ॥

( वसंततिलका )

अक्षौहिणीत्रयपति, व्यथितारिनारी,
शत्रुघ्न सत्वर निघे तुरगानुसारी; ।
सोत्साहसैनिककराहतपीनभेरि-
ध्वान, प्रतीपनृपतोषधनापहारी ॥ ४ ॥

( शार्दूलविक्रीडित )

शत्रुघ्नध्वजिनीपदाहतरजःस्तोम स्वयें अंबरीं,
त्या यात्रासमयीं उडोनि शिरला नीरात्मबिंबांतरीं; ।
झाला चिक्कणपंक घट्ट जडला स्वच्छेंदुदेहास, तो
धौतस्फाटिकभांडकज्जल तसा आजूनिही दीसतो. ॥ ५ ॥

---

१ 'या ते'—काव्यसंग्रहपाठ.

वाजींच्या मुखफेनघर्मसलिलें दंतिव्रजाच्या मदें,
झाला पंकिल मार्ग; पत्तिस पदें होतीं विलंबप्रदें.
नानावाद्यनिनाद सज्जनमनःश्रोत्रांसि झाला सुधा,
दुष्टांच्या तर चित्तमोहकरणीं व्यालास्यजन्मा सुधा. ॥ ६ ॥
रत्नस्वर्णविभूषिता, गजघटाघंटारणन्नूपुरा
वाजिस्यंदनवाहना, शुभयशोहास्या, सुवाद्यस्वरा, ।
नानाभूपशिरःकिरीटमणिदीपा ह्या रिपुघ्नाप्रती,
ओंवाळूनि, अनेकमानववरश्री घन्न आलिंगिती. ॥ ७ ॥

( विबुधप्रिया )

संगरीं मखवाजिहारिधराधिपव्रज[1] मर्दिला,
तच्चिताभसितें सितें बहु पूजणार कपर्दिला, ।
जो तृणानन भूप तो न दिनेशसूनुकरीं दिला;
आत्मनामगतार्थ [2]सार्थ पराक्रमें प्रतिपादिला. ॥ ८ ॥

( शिखरिणी )

महामानी होते, परि परिभवें दास्यपर ते
पुर स्वांगें जाले; मग विजयिशत्रुघ्न परते, ।
कविश्रीवल्मीकप्रभवमुनिसंस्थानवसुधा
पथीं झाली सेनानयननिकरातें नव सुधा. ॥ ९ ॥

( गीतिवृत्त )

त्या मुनिवराश्रमाच्या नंदनवनगर्वतस्करोपवनीं ।
अवनीशवाह शिरला, स्वजवें लज्जेसि निर्मिता पवनीं. ॥ १० ॥
त्या गहनींच्या दूर्वा, मरकतमणिपुंजदीप्तिच्या सवती, ।
हरिच्या हरिति मनातें, तरुणनराच्या जशा विलासवती. ॥ ११ ॥

---

१ 'मखवाजिहरधराधिपव्रज'–काव्येतिहाससंग्रह. २ 'बाहु'–काव्यसंग्रहपरिशिष्ट. 'बहु'–काव्येतिहाससंग्रह.

वनरक्षणार्थ तेथें करवाली विप्रपुत्रगणशाली, ।
होता लव वीर, जसा ग्रहसंधानप्रयुक्त करमाली. ॥ १२ ॥
तेणें वनीं अकस्माद् दूर्वांकुरसेवनानुरक्त हरी ।
अवलोकितांचि त्याची श्री तन्मानससरोरुहासि हरी. ॥ १३ ॥
नंदनवनभ्रमागतशक्राश्वभ्रांत्यधिष्ठितस्वांतें ।
कांतें वीरश्रीच्या धरिला वाजी लवें रुषाक्रांतें. ॥ १४ ॥
हयभालबद्धकांचनदललिखितार्थग्रहप्रदीप्तमदें ।
दलीस बांधिला हय कुशानुजें निजकरें खळश्रमदें ॥ १५ ॥

( स्रग्धरा )

कौसल्या एकवीरा, मम जननि नव्हे वीरसू ? काय वंध्या ?'
ऐसें बोलोनि केली क्षितिदुहितृसुतें दृग्द्वयें तुच्छ संध्या, ।
तेव्हां मित्रें तयातें म्हणति, ' हय वृथा बांधिला सोड याला,
भूपाश्वत्राणकारी दवडतिल तुला श्राद्धदेवालयाला.' ॥ १६ ॥

( गीतिवृत्त )

एवं सभयसुहृज्जनलपितातें आयकोनि, धीरमणी ।
तो लव वदे कुलोचित, ठेवुनि मतिला द्विषद्बलाक्रमणीं. ॥ १७ ॥

( स्रग्धरा )

'विप्रस्त्रीकुक्षिजन्मे भयविकळ तुम्ही, क्षत्रियादेहभू मी,
सोडूं वाजीस धाकें, तरि मज न हंसे काय हे सर्व भूमी ? ।
मृत्युः श्रेयः कथंचित्, जरि हरिकरितां अर्पिला दुर्जनांहीं,
लोकामध्यें परंतु क्षितितनुजनिला लाज होणार नाहीं.' ॥ १८ ॥

( उद्गीतिवृत्त )

जैमिनिकृतभारतगतहयमेधीं कुशलवाख्यानीं ।
साहावा अध्याय[1] श्रवण करावा रसज्ञमुख्यांनीं. ॥ १९ ॥

---

१ 'हा साहावाध्याय'—काव्येतिहाससंग्रह.

# अध्याय सातवा



( उपजाति )

अशांत आली चतुरंग सेना, जीच्या रजें भानुसि भू दिसेना ।
अन्योन्यशब्दग्रहणीं स्व[1] भेरी वृंदस्वनें घे लटिकेंचि भेरी. ॥ १ ॥

( गीतिवृत्त )

'कोठें हय ? कोठें हय ?' असें म्हणत धांवले पुढें सादी, ।
रंभास्तंभनिबद्धस्वहयासि तदीय दृष्टी आसादी. ॥ २ ॥

निकटस्थ लववयस्यस्तोमातें म्हणति वीर ते, 'कोणी ।
हरिरंभासंबंधें केली अमरावती तशी क्षोणी ?' ॥ ३ ॥

( अनुष्टुप् )

ऐसें ऐकोनि, म्हणती विप्रांचीं त्यांस लेंकरें, ।
'हयरत्न लवें वीरें रंभेशीं बांधिलें करें.' ॥ ४ ॥

( स्रग्धरा )

एवं पूर्वाश्रमस्थद्विजवचन तिहीं सेविलें स्वात्मकानें,
हांसोनी वीर तेव्हां म्हणति, 'न कळतां, बांधिला अर्भकानें, ।
रंभेपासूनि आतां, उशिर न करितां, रामयज्ञीयवाजी
सोडा, सोडा, अयोध्यानगरगतपथीं चालवा, चालवा; जी' ! ॥ ५ ॥

( पृथ्वी )

धनू[2] धरुनियां करीं तुरगमोचनोपक्रमीं,
लव त्वरित धांवला विगतभी महाविक्रमी, ।
म्हणे 'रणधुरीण हो ! धरुनि गर्व निःसार हा,
वृथा मज न जिंकितां, हरिस सोडितां कां ? रहा.' ॥ ६ ॥

---

१ 'स्वभेरी । वृंदस्वनें जें लटिकें चि भें री '—काव्येतिहाससंग्रहपाठ.
२ 'धनुर्धरुनियां '—काव्येतिहाससंग्रहपाठ.

( हरिणी )

अशि परिशिली वाणी त्याची तिहीं जरि त्या क्षणीं,
तदपि भट ते झाले सिद्ध स्वघोटकमोक्षणीं. ।
मग लव तदा त्या वीरांच्या करांसि शरें हरी,
धरणिधरपक्षांतें वज्रेंकरूनि जसा हरी. ॥ ७ ॥

( वसंततिलका )

विच्छिन्नहस्त भट ते म्हणती 'धरा हो !
पाडा किशोर धरणीवरि, हा न राहो' ।
कोपेंकरूनि मग सैनिक त्या प्रधानीं
एकावरी बहुत वर्षति आयुधांनीं. ॥ ८ ॥

( अनुष्टुप् )

न स्पर्शती लवांगाला तीं शस्त्रें देहघातकें, ।
जैसीं श्रीगौतमीतोयस्नातमर्त्यास पातकें. ॥ ९ ॥

( शार्दूलविक्रीडित )

त्यांच्या शस्त्रगणासि, ओढुनि धनुर्वल्लीस वेगें करें,
योगी संसृतिबंधनाप्रति, तसा छेदी स्वबाणोत्करें; ।
सादी, पत्ति, रथी, अनेकपपक, श्रांतोनि भूमंचकीं,
गृध्रव्रातवितानुसावलिस ते घेती निजेलाच कीं ॥ १० ॥
केले स्यंदन चूर्ण बाणनिकरें, वाजी द्विधा छेदिले,
वीरांचे शुभ देह वांटुनि शिवागृध्रादिकांसी दिले; ।
शुंडादंडविहीन भूमिपतित व्याक्रोशती वारण,
कोणाच्याहि शरेंकरूनि न घडे त्याचें रणीं वारण. ॥ ११ ॥

( स्रग्धरा )

हातीं कोदंड, देहीं दृढ कवच बरें, अक्षयी दोन भाते,
रक्षोवृंदस्थरामस्मृतिस उपजवी जानकीसूनुभा ते. ।
पाचां पाचां शरांहींकरुनि न हृदयीं भेदिलें कोणत्याला ?
एवं युद्धप्रसंगीं बहु बळ वधिलें; वारितो कोण त्याला ? ॥ १२ ॥

( शार्दूलविक्रीडित )

केलें यापरि बालकें निज बळीं शार्दूलविक्रीडित,
जाला याकरितां रिपुघ्न परम क्रोधानळें पीडित. ।
आला बैसुनियां रथीं शरधनुष्पाणी, कृपाणी, रणीं; ।
त्यातें 'तिष्ठ' म्हणे, स्वकीय मतिला ठेवूनि तन्मारणीं. ॥ १३ ॥

शत्रुघ्न क्षितिजासुतें खर शरें भाळीं उरीं ताडिला;
चारीही हय वेधिले, ध्वज मग च्छेदूनियां पाडिला; ।
होते जे रथचक्ररक्षक भट, स्वर्गासि ते धाडिले;
चापज्या हरिली; शिलीमुख असे बारा लवें सोडिले. ॥ १४ ॥

( गीतिवृत्त )

सज्य करुनि चापातें, शत्रुघ्न म्हणे लवासि, 'सांभाळीं.' ।
मग खरनाराचत्रय खदिरानळनिभ समर्पिले भाळीं. ॥ १५ ॥

( वसंततिलका )

तो तेधवां स्मितजितौषधिपास्य मानी
त्या सायकासि बिसतंतुसमान मानी. ।
त्यातें म्हणें लव, 'विगर्वित बाहुसारें,
वीरा ! तुझें बळ दिसें इतुकेंचि सारें ! ॥ १६ ॥

( शार्दूलविक्रीडित )

ऐसें बोलुनियां, लवें निरखिला शत्रुघ्न रौद्रेक्षणें;
केला चाप तुरंगसारथिरथध्वंसाकुलात्मा क्षणें. ।
तो बोले शरयुक्त कार्मुक करीं घेऊनियां दूसरें,
'जा बाळा ! तुज जीवदान दिधलें, दे पाठ, मागें सरें,' ॥ १७ ॥

ऐसें बोलुनि, राघवें खरशर क्रोधें तदा सोडिला,
तो बाण स्वशिलीमुखें लवभटें मध्यें द्विधा तोडिला; ।
होता सद्गतिमान्, अधःपतन तैं जालेंचि त्याला परी,
वादी जे नर कूटसाक्ष वदती, तत्पूर्वजांच्या परी. ॥ १८ ॥

शत्रुघ्नें दुसरा शिलीमुख तदा बाणासनीं जोडिला,
तोही चापसमेत भूमितनयापुत्रें शरें तोडिला. ।
पूर्वीं ज्या विशिखें द्विजारिलवणायुःप्राशिलें भूवरी,
त्यातें, त्याच धनुर्लतेप्रति, तदा सौमित्रि हातीं धरी. ॥ १९ ॥

सोडी वन्हिनिभाशुगाप्रति, वदे 'मेलाशि रे! या क्षणीं.'
तेव्हां बाण अमोघ हें समजला, आलोकितां स्वेक्षणीं. ।
'यातें अग्रज भंगिता, परि नसे; मी जानकीच्या महा-
पातिव्रत्यबळेंचि खंडिन;' म्हणे, 'आला असो भीम हा.' ॥ २० ॥

( गीतिवृत्त )

ऐसें वदोनि, केले दोन तयाचे निजाशुगें तुकडे; ।
आले तत्पूर्वार्ध च्छिन्नाहिनिभ स्वभंगहेतुकडे. ॥ २१ ॥

( स्रग्धरा )

आधीं चापासि खंडी, मग जनकसुतासूनुवक्षस्थळाला,
त्या काळीं मोहभारें क्षितिवरि सहसा देह त्याचा गळाला. ।
झाली नेत्रांबुजाला रजनि, न समजे युद्धभू, गेह वा हे.
त्या बाळाला सचैल स्नपनचि घडलें, शोणिताच्या प्रवाहें. ॥ २२ ॥

( शार्दूलविक्रीडित )

आली मृत्युसमा यदा अशि रणीं मूर्च्छा महामानिला,
त्या काळीं हतशेषवीरनिकरें आनंदसा मानिला. ।
भेरींच्या प्रकरासि ताडिति, मुखें शंखासि ते फुंकिती;
त्यांचा हर्ष न सांठवे त्रिभुवनीं, तो म्यां वदावा किती ? ॥ २३ ॥

झाला, त्यासि विलोकितां सदय तो शत्रुघ्ननामा कृती
'शिंपा यासि,' म्हणे भटांसि, 'दिसतो हा बाळ रामाकृती.'
छायावायुजलोपचारित लव स्वस्यंदनीं स्थापिला,
सेनायुक्त, हयासि सोडुनि, निजायोध्यापथें चालिला. ॥ २४ ॥

( उद्गीतिछंद )

जैमिनिकृतभारतगतहयमेधीं कुशलवाख्यानीं ।
अध्याय सातवा हा श्रवण करावा गुणज्ञमुख्यांनीं ॥ २५ ॥

## अध्याय आठवा



( स्रग्धरा )

एवं जैसें निघालें कटक, धरुनियां मूर्च्छितातें लवातें,
तेव्हां त्याचे सखे ते त्यजिति उपवनीं लोचनांभोलवांतें. ।
हस्तापासोन पुस्तें गळति सटसटां, धीर गेला लयाला[1],
जाती सांगावयाला मग बहुत जवें भूमिकन्यालयाला. ॥ १ ॥

( लीलाकर दंडक )

म्हणति पृथुक, जानकि ! स्वाश्रमीं मेध्य दूर्वांकुरासक्त
कश्चित् नृपाचा हरी पाहिला त्वत्सुतें दिव्यलीलाकरें ।
' नरवरहय हा, सख्या ! यासि बांधों नको, ' यापरी वारिला
फार आम्ही, परी [ तन्[2] ] निषेधासि सोडूनियां बद्ध केला करें. ।
प्रबळ कटक तेथ आलें, तदा युद्ध आरंभिलें,
बाणनिर्भिन्नपत्यश्वमातंगवीरांगरक्तोदकें निर्मिल्या वाहिनी.
तदुपरि भट एक झाला पुढें; तच्छरें मूर्च्छिताते लवातें
निजस्यंदनीं स्थापुनी, स्वात्मदेशाकडे जातसे वाहिनी.' ॥ २ ॥

( वसंततिलका )

हें वर्तमान परिसोनि म्हणे क्षमाजा,
'गेला असेल जरि धर्म वृथा न माजा, ।
यावत् कुशागमन होय, लव स्वहातें,
तावत् करू नतिस न स्वपितामहातें. ॥ ३ ॥

---

१ 'तयाला'–काव्येतिहाससंग्रह. २ हें अक्षर काव्येतिहाससंग्रहप्रतींत नाहीं.

( पुष्पिताग्रा )

अकरुणभटबाणभिन्नवत्सा ! तुजविण मी तशि, गौ जशी विवत्सा. ।
करुनि खळजनासवें कलीला, अहह ! मला त्यजिलेंसि एकलीला ॥ ४ ॥

( वसंततिलका )

वांछा वृथा धरुनि अन्यमहीपवाहीं,
कां त्यागिली स्वतनु दुःखनदीप्रवाहीं ? ।
वाहूं किती तरि असे बहु दुःखराशी ?
कां दैवसृष्ट मजला न वधी खरासी ? ॥ ५ ॥

( शार्दूलविक्रीडित )

झालीं जीं उटजांगणीं उमटलीं आतांचि जातां पदें,
*तीं माझ्या हृदयास हाय ! गमतीं अत्यंत संतापदें,
नानावृक्षलतालवालरचनाकौशल्य हें भाजितें
मच्चित्ताप्रति, जें करें विरचिलें त्वां पद्मशोभाजितें ॥ ६ ॥

( आर्यागीतिवृत्त )

उडुपनिभ त्वद्वदन, स्मृतिगत होऊनियां मुला ! तापवितें. ।
होइल केव्हां शोकक्षितिध्रभेदार्ह जेंवि धरिता पवितें ? ॥ ७ ॥

( गीतिवृत्त )

वाल्मीकि जवळ नाहीं, कुशही गेला असे अरण्यातें, ।
सैनिकचोरापासुनि सोडवितें कोण लवहिरण्यातें ? ॥ ८ ॥

( उपजाति )

धरूनियां यापरि शोकदीक्षा, सीता करी पुत्रपथप्रतीक्षा. ।
वत्सें वियुक्ता जसि होय गृष्टी, तीहूनि ते कोटिगुणेंहि कष्टी. ॥ ९ ॥
अशांत घेऊन समित्फळांला, आला वनाहूनि कुश क्षयाला.
समीप येऊन, मनांत तर्क असा करी मातृदृगब्जअर्क ॥ १० ॥

---

* ही ओळ काव्येतिहाससंग्रहप्रतींत गळलेली आहे, म्हणून ही नवीन रचली आहे.

( उपेंद्रवज्रा )

'सकाळ येतां मजशीं दवाला, निवारिलें म्या स्वमुखें लवाला. ।
पुढें नये क्रुद्ध म्हणोनि काय ? कधीं न कीं आजि असें निकाय.' ॥ ११ ॥

( अनुष्टुप् )

वनीं, देहीं दुर्निमित्यें पाहिलीं, त्यांसि आठवी. ।
चिंतानदी विवेकार्ककिरणौघेंचि आटवी. ॥ १२ ॥

( उपेंद्रवज्रा )

निजोटजांतीं द्विडिभांकुशानें विलोकिली भूमिसुता कुशानें ।
स्वपुत्रतापोन्मथितांगवल्ली, जशी अरण्याग्निविमृष्ट मल्ली. ॥ १३ ॥

( उपजाति )

अश्रुप्रवाहस्नपितांगयष्टी विलोकितां, तो कुश होय कष्टी. ।
अर्पूनि मातेप्रति वायुवारी मूर्छेसि तीच्या अतिशीघ्र वारी. ॥ १४ ॥

( वियोगिनी )

'वद रोदनमोहहेतुला, उचिता अंब ! दशा न हे तुला. ।
तव दुःख न नाशिलें जरि, तरि लोकीं व्यसुताचि साजिरी. ॥ १५ ॥
अहह ! श्रम जाहला तुला, न दिसे यासि जगत्त्रयीं तुला. ।
तव वक्त्रनिशीन कोमला, मग तें जीवितही नको मला. ॥ १६ ॥

( उपजाति )

वाल्मीकिपादांबुजयुग्मलीन, त्वदंघ्रिसेवाकमलिन्यलीन, ।
कोठें असे तो लव ? सांग, मी न विलोकिला वेदपयोधिमीन' ॥ १७ ॥

( हरिणी )

तदुपरि म्हणे सीता, स्पर्शोनि हृत्करपल्लवें,
'तुरग धरिला कोणा एका धरापतिचा लवें, ।
समरसमयीं त्यांहीं वक्षःस्थलीं दृढ भेदिला,
धरुनि नगरा नेला, दुःखक्षमाध्र मला दिला. ॥ १८ ॥

सदय, भगवान्, श्रीमान्, वाल्मीकिही जवळी नसे.
तुजविण कुशा! आतां त्राता जनीं न दुजा दिसे. ।
मम भुज नको छेदूं दैवा! त्यजीं बहुकोप हा;
अहह! करुणापांगें मातें सकृत् तरि तूं पहा.' ॥ १९ ॥

( अनुष्टुप् )

प्रलापबीज सीतेच्या मुखें आकर्णितां असें, ।
म्हणे कुश, 'स्वस्थ चित्तें, मातः! स्वसदनीं असें. ॥ २० ॥

( स्रग्धरा )

त्यातें होऊत शक्रप्रभृतिसुर रणीं साह्य माते! तथापि
दुष्टातें आहवीं त्या मम निशित शर व्यापितील प्रतापी. ।
सिंहासीं काय कोल्हे करितिल समर? व्यर्थ चिंता तुला हे.
जिंकूनि त्वत्सुतातें कवण जयधन ब्रम्हगोळांत लाहे? ॥ २१ ॥

( पुष्पिताग्रा )

जननि! मज निषंग, चाप, वर्म, त्वरित समर्प किरीट खड्ग, चर्म. ।
लव लवकरिच स्वआश्रमातें तव सुत आणिल; तूं त्यज श्रमातें.' ॥ २२ ॥

( पंचचामर )

असे स्वसूनुचे सुशब्द ऐकतां महासती
त्यजूनि शोक, लोचनें पुसुनि, होय हांसती. ।
किरीट, सन्निषंग, चर्म, वर्म, खड्ग, चाप ती
कुशासि दे, दशाननासि मर्दिता जिचा पति. ॥ २३ ॥

( मंदाक्रांता )

'हा जातों मी' म्हणुनि, नमुनी क्ष्मासुतेच्या पदातें
जाता झाला रिपुदळ वधूं, ओष्ट चावीत दातें, ।
जैसा सिंहीतनय विदळूं जाय मातंगजातें;
बाहू ताडी भयरहित तो, क्रूरही भीति ज्यातें. ॥ २४ ॥

( मयूरीवृत्त )

तो जाऊनि श्रीरामाची सेना, पाहे, चित्तीं भी त्याला भासेना. ।
बोले त्यासी वीरश्रीचा कांत, क्ष्मापुत्रीचा संहर्ता आकांत. ॥ २५ ॥

( उपजाति )

'उभे, उभे,' हो भट ! युद्धकामी आलों असें हो ! कुशनाम हा मी. ।
मला पराभूत जरी कराल, ममानुजातासि तरी हराल. ॥ २६ ॥
असेल सामर्थ्य, तरीच चापीं मौर्वीसि जोडा, विशिखासि सोडा; ।
नसेल सामर्थ्य तथापि, सारे हस्तासि जोडा, मम बंधु सोडा. ॥ २७ ॥

( उपगीति )

पृथ्वीवरि चापातें, स्वशिरातें[1] तऱ्हि [ तुम्ही ] लववा, ।
तुम्हीं द्रुत सोडावा निज जीवितकाम, तो लव वा. ॥ २८ ॥

( स्रग्धरा )

एवं प्रोद्दाम शब्द ग्रहण करुनियां, त्यांस तो काळ वाटे.
उद्यद्वायूत्थधूलिव्रज तिमिरसम व्योमगर्भांत दाटे. ।
वातोद्धूत प्रभूत ध्वज खणखणती, शीर्ण झाल्या पताका.
झालें शांत क्षणें तें रज, मग शमनीं ऱ्हेषितें आणि हाका. ॥ २९ ॥
तेव्हां शत्रुघ्न सेनापतिस मग म्हणे, ' तूं निवारीं कुशातें,
सेनाव्यूहास मीही दृढतर रचितों, आज रक्षूं यशातें. ' ।
तें ऐकूनी वदे तो बळरमण, ' शिशो ! तिष्ट तिष्टे'ति गर्वें,
अर्पी दिग्बाण, ज्यांचीं खरतर वदनें आततें सर्व पर्वें. ॥ ३० ॥
तेव्हां त्याच्या शरांचें कुशळ कुश शरें भूतळीं चूर्ण पाडी,
पार्ष्णिग्राहाश्वसूतांप्रति भटपति तो मृत्युलोकासी धाडी. ।
चापांगत्राणतूणासिरथवरकिरीटादिकांतें स्वबाणें
छेदूनि, क्रोधरक्तेक्षण मग घडवी त्यासि नाकासि जाणें. ॥ ३१ ॥

( शार्दूलविक्रीडित )

'हा ! हा !' शब्द तदा बळीं प्रगटला तद्बंधु नागाभिध,
क्रोधोग्रेक्षण हस्तिमस्तकग तो आला द्विषत्सन्निध. ।
क्षेपी शक्तिस, तत्क्षणीं कुश करी तीचें शरें वारण,
क्रूरेषुप्रकरें करें करुनियां छिन्नांघ्रि तद्वारण. ॥ ३२ ॥

---

१ 'स्वशिरातें [ वा ] तऱ्ही लववा '–काव्यसंग्रह.

नागापासुनि नाग भूमि उतरे, हस्तीं गदेला धरी;
तीतें तत्करपंकजासहित तो पाडी शरें भूवरी. ।
त्याचा वामहि चक्रयुक् शय शरें तोडी तदा, तो पदें.
येतां धावत, पादयुग्महि हरी बाणद्वयें तापदें. ॥ ३३ ॥

धूलीधूसरशोणितार्द्रतनु तो चित्तांत कोपें कढे,
धांवे, राहु जसा रविप्रति, तसा क्ष्मायोनिपुत्राकडे. ।
तद्वीर्यें बहु तोषला कुश करी स्वांतीं तयाचा स्तव,
छेदी तीव्र शरें शिरासि, मखहा घे मुंड[1] मालेस्तव. ॥ ३४ ॥

एवं मारुनियां तयासि, मग तो शत्रुघ्नसेनेप्रती
छेदी तीक्ष्ण शरें, तदा म्हणति ते, 'कल्पांत कीं संप्रति!'
पादाताश्वतुरंगपर्वतनिभेभ क्ष्मातळीं लोळती,
सद्यःशोणितपानतत्परशिवागृध्राननें पोळती. ॥ ३५ ॥

जे होते मदमत्तवारणशिरीं जे अश्वपृष्ठावरी,
जे कार्तस्वररत्नभूषितरथीं जैसे[2] विमानांतरीं, ।
तद्बाणाहत ते अधःपतनभाक् झाले महासंगरीं
जो कन्याद्रविणें स्वजीवन करी तत्पूर्वजांचे परी. ॥ ३६ ॥

(शालिनी)

एवं त्यांचें सैन्य तेव्हां कुशानें, केलें तीक्ष्ण द्विण्महेभांकुशानें, ।
लोकामध्यें वेदशास्त्रोक्तधर्में होती क्षीण क्षिप्र तैसीं कुकर्में. ॥ ३७ ॥

(उद्गीतिछंद)

जैमिनिकृतभारतगतहयमेधीं कुशलवाख्यानीं, ।
अध्याय आठवा हा श्रवण करावा कवींद्रमुख्यांनीं ॥ ३८ ॥

---

१ 'मुंडमालेस्तव'–काव्यसंग्रहपरिशिष्ट. २ येथें 'जे वा' असा खरा पाठ असावा असें काव्यसंग्रहकार म्हणतात, तें बरोबर दिसतें.

# अध्याय नववा



( स्रग्धरा )

शत्रुघ्न क्रुद्ध तेव्हां नवशरनिकरें शत्रुला क्षिप्र ताडी,
तो त्याचें, तद्रथाचें, रज अनिलकरें स्वर्गलोकासि धाडी. ।
सौमित्रीच्या हृदब्जीं क्षत करुनि, रथोपस्थदेशींच पाडी.
तत्सेनामांसखंडें बककरटशिवागृध्रयूथासि वाढी. ॥ १ ॥

( प्रहर्षिणी )

त्याकाळीं बहुतचि तत्करें गळाले जे होते मग हतशेष, ते पळाले. ।
दैवानें लवहि तदा विमोह जाला; आलिंगी,[1] नमन करून अग्रजाला. ॥ २ ॥
'बंधो ! त्वां बहु अनवद्य कर्म केलें, दुष्टाचें कटक बरें क्षयासि नेलें. ।
त्वद्योगें लवहि न शत्रुभीति मातें, तूं आज्ञा कर, धरितों तुरंगमातें. ॥ ३ ॥

( मयूरी )

आज्ञा होतां सीतापुत्राची, हातें वृक्षीं बांधी श्रीरामाच्या वाहातें. ।
युद्धाकांक्षी वाय्वग्नीसे ते बंधू एके जागीं झाले शौर्याचे सिंधू. ॥ ४ ॥

( शार्दूलविक्रीडित )

गेले जे हतशेष सैनिक, तिहीं साकेत आसादिलें.
स्वस्वांतीं म्हणती, ' अहो ! बहु बरें सत्कार्य हें साधिलें !'
झाले सावध, यज्ञमंडपमहाद्वारासि ते पावले.
तद्दग्भृंग रघूत्तमांघ्रिकमलामोदार्थ झेपावले.[2] ॥ ५ ॥

( विबुधप्रिया )

मेखलारुरुचर्मपिप्पलदंडशृंगसभाजित,
स्वर्णभूतनयासमन्वित भूमिदेवसभाजित, ।
होमधूमविलोहितेक्षण, सानुकंपनिरीक्षित,
प्रेक्षिला भरताद्युपासितपाद, राघव दीक्षित. ॥ ६ ॥

---

१ ' आलिंगन '–काव्येतिहाससंग्रह. २ ' रघूत्तमांघ्रिकमलामोदार्थसे पावले '–काव्येतिहाससंग्रह.

( प्रहर्षिणी )

ते सारे म्हणती, नमून 'पूर्णकामा ! श्रीरामा ! रघुतिलका ! पवित्रनामा !।
त्वद्वाजी क्षितिवर हिंडतां, तयाला पूजूनी सकळहि लोक पूत झाला.॥ ७ ॥

( गीतिवृत्त )

धरिला तुरंग ज्यांहीं रविनंदनलोकमार्गही त्यांहीं. ।
एवं स्वामी ! पाहीं, विजयचि झाला तव प्रतापांहीं. ॥ ८ ॥

( शार्दूलविक्रीडित )

एवं तो हय रक्षिला, नृपजनें शत्रुघ्न वाखाणिला,
वाल्मीक्याश्रमसन्निध त्वदनुजें वीरेश्वरे आणिला. ।
कोणेक द्विजबाळ विघ्न करिता झाला पथीं, त्याप्रती
येतां जिंकुनिया, तदग्रज दुजा आला महादुर्मती. ॥ ९ ॥

तेणें सानुज सैन्यपाळ वधिला, शत्रुघ्नही ताडिला
हृपद्मीं बहु तिक्ष्णबाणनिकरें, निर्जीव तो पाडिला, ।
केलें त्या शिशुनें असें तव बळीं शार्दूलविक्रीडित,
आलों त्वच्चरणासमीप नृपते ! तत्साध्वसें पीडित.' ॥ १० ॥

( हरिणी )

परिसुनि म्हणे त्यांतें सीतापति, 'भ्रमलां कसे ?
शिव ! शिव ! पिशाचाविष्टोक्तासमान मला दिसे. ।
हर ! हर ! नसो यज्ञस्थानीं प्रजल्प. उगे रहा.
मदनुजनिला ताडी ऐसा न विष्णु, न वृत्रहा.' ॥ ११ ॥

( शार्दूलविक्रीडित )

ऐसें ऐकुनि, त्यासि वंदुनि शिरीं, ते बोलती सन्मती,
'देते ज्ञान, अनादि मोह हरुनि, त्वन्नामधेयस्मृति. ।
पैशाचभ्रमजन्म होईल विभो ! आम्हासि कां ? शर्मदा !
तूझे सेवक, तूज गाउनि, तुला संप्रेक्षितां सर्वदा. ॥ १२ ॥

( अनुष्टुप् )

ऐसें ऐकूनियां, राम पावला हृदयीं श्रम. ।
मग बोले लोककामकल्पद्रुम मनोरम. ॥ १३ ॥
'जंबुकें वधिला सिंह, बुडाला गोष्पदीं करी, ।
झाली कशी कालगत्या विपरीताचि हे परी ? ॥ १४ ॥

( स्रग्धरा )

रे वत्सा ! लक्ष्मणा ! तूं लवणरिपुचिया मृत्युपाशासि खंडीं,
वाजीतें सोडवूनि द्विजशिशुसि बरें मद्यशोष्मासि दंडीं. ।
वीरा ? तूं मेघनादांतक, मजहुनिही कीर्ति तूझी विचित्रा,
त्वां पुत्रें लोकवंद्या, अदिति जसि, तशी माय माझी सुमित्रा. ॥ १५ ॥

( शार्दूलविक्रीडित )

आज्ञा वाहुनि मस्तकीं, नमुनियां सौमित्र तेव्हां निघे
तत्सेनाहतदुंदुभिस्वन तदा स्वर्गासि पाहूं रिघे. ।
एकस्त्रीव्रतपूत सर्व भट ते प्रोद्दामवीर्यास्पद
स्वांतीं मानिति जीवितासि तृणवत् सिंधूसिंही गोष्पद. ॥१६॥

वाजींच्या खुरकुट्टणेंकरुनियां पाषाण झाले चुरा,
सांगायास्तव रेणुदूत बहुधा गेला सुरांच्या पुरा. ।
भूभृत्कल्पमतंगजोद्भटघटाभाराकुलांगी धरा,
कन्यापुत्रविनाश मानुनि जणों, झाला तिला कापरा. ॥ १७ ॥

गेल्या शत्रुजनांगनाक्षियुगुलीं तत्सैन्यधाकें धुनी,
होतें जें तृण तेंहि रामरिपुचीं तुंडें बळें शोधुनी. ।
होतां हीन लताद्रुमें न मग तीं संशोभती काननें,
जैशीं रामसुरद्रुतद्गुणलतासंत्यक्त लोकाननें. ॥ १८ ॥

( अनुष्टुप् )

एवं सौमित्रि जाऊनी रणभूमीस पावला. ।
जीवशेष, धरासंस्थ, निजानुज विलोकिला. ॥ १९ ॥

( उद्गीतिछंद )

जैमिनिकृतभारतगतहयमेधीं कुशलव्याख्यानीं ।
हा नववा अध्याय श्रवण करावा रसज्ञमुख्यांनीं. ॥ २० ॥

## अध्याय दहावा



( शार्दूलविक्रीडित )

त्या सेनेसि विलोकितां कुश म्हणे, 'आतां करावें कसें ?
आहे फारचि दुष्प्रधर्ष बळ हें, देवाधिपाचें जसें.' ।
तेव्हां त्यासि कथी लव, 'क्षितितळीं या सैनिकांचीं शिरें
कोहाळ्यापरी फोडिजे फटफटां क्रूरें शरें, कीं करें. ॥ १ ॥
नाहीं योग्य तुझ्या बळासि बळ हें कुंभोद्भवाला जसा
अंभोराशि, तसा तृणासम गमे सैन्यौघ मन्मानसा. ।
मातें चाप नसे, रणांत रिपुनें केलें शरें तूकडे'.
पाहे, बोलुनियां असें, लव तदा तो लोकबंधूकडे . ॥ २ ॥

( गीतिवृत्त )

त्रिभुवनरक्षादक्षा ! नमितों तुजला, स्वभक्तसुरवृक्षा ! ।
तिमिरद्विपहर्यक्षा ! तेजःपक्षा ! क्षतामरविपक्षा ! ॥ ३ ॥
स्वजनभवांबुधितरणे ! त्रिजगद्भूषणमहामणे ! तरणे ! ।
दे मज चापास रणीं, दाविन दुष्टासि काळगृहसरणी ' ॥ ४ ॥

( शार्दूलविक्रीडित )

एवं संस्तवितां, दिनेश भगवान् श्रीमान् दयासागर
स्नेहें दे शिशुला धनुर्वततिला देखावया संगर ।
हातीं घेउनियां, म्हणे लव कुशा, 'स्वोत्कर्ष मातें गमे.
श्रीविघ्नेश्वर ! ते नमः, कुरु कृपां, निर्विघ्नमस्त्वद्य मे !' ॥ ५ ॥

जैसे वायुविभावसू कुश लव क्रोधें तसे धावले.
विस्फारूनि धनुर्लतासि, सहसा सैन्यांतरीं पावले ।
केलें मर्दन, मांसकर्दमपटें रक्तस्रवंती किती
तेथें वाहति; पाहती भट, मनीं कल्पांतसे तर्किती. ॥ ६ ॥

( स्रग्धरा )

सेनानी लक्ष्मणाचा प्रकटबळयशा काळजिन्नाम, त्याला
संगें घेऊनि, रामानुज घनरवहा तो पुढें शीघ्र झाला. ।
दोघेही बाणजाळेंकरुनि मग रणीं रोधिती त्या कुशाला,
तेव्हां एका लवानें द्रुततर वरिली सर्वसेना विशाला. ॥ ७ ॥

( शिखरिणी )

फिरे सेनेमध्यें अभय, विपिनांतों अनळसा,
जयाची दोर्वल्ली सतत शरदानीं अनळसा. !
रथेभांच्या पंक्ती तुरगवरपादातसहिता,
लवातें वेष्टूनी, बहुत वसती वीरविहिता. ॥ ८ ॥

( पृथ्वी )

कितेक रथ मोडिले, ध्वज कितेकही तोडिले,
कितेक शर सोडिले, गज कितेकही झोडिले, ।
असंख्य भट तोडिले, यमपुराकडे धाडिले,
शिरःप्रकर पाडिले, बहुत यापरी नाडिले. ॥ ९ ॥

( शार्दूलविक्रीडित )

तेव्हां शूलगदापरश्वसिलताशक्त्यृष्टिचक्रायुधें
कुंतप्रासभुशुंडिमुद्गरमहापाशादि नानाविधें ।
सर्वांहीं त्यजिलीं लवावर; तदा तो त्यांस खंडी शरें,
मूर्खांच्या वचनासि पंडित जसा निःशंक युक्त्युत्तरें ॥ १० ॥

( स्रग्धरा )

तेव्हां मागें फिरोनि, क्षततनु लव तो अग्रजालागिं पाहे,
तों, तो कोठें दिसेना, मग निज हृदयीं फार चिंतेसि वाहे, ।

प्रावण्मेघापरी ते सुभट भटशिरीं वर्षती आयुधांहीं,
जैसा भूमिध्र, तैसा तिळभरि न चळे; वर्णिला तैं बुधांहीं. ॥ ११ ॥

( शार्दूलविक्रीडित )

शत्रुघ्नें लवणासुर प्रमथिला पूर्वींच, तन्मातुळ
आला जो रुधिराक्षनाम शरण श्रीरामभीत्याकुळ, ।
त्या दुष्टें हरिलें शरासन, तदा वेगें रिघे तो नभीं,
तेव्हां तो लव, चक्र घेउनि, उडे व्योमीं तयाला न भी. ॥ १२ ॥

( गीतिवृत्त )

जैसा आमिषलुब्ध श्येन व्योमीं शिरे, तसा शोभे. ।
चक्रें शक्रानुजसा, देवस्त्रीवृंद पाहतां लोभे. ॥ १३ ॥

( शार्दूलविक्रीडित )

भूमीसंस्थित सर्व वीरवर, 'हा [1]माथा पडेल स्वयें,
किंवा काय करील तेंचि न कळे' हे बोलती तद्भयें. ।
कोणी भ्याड रथाबुडींच दडती, कोणी मृतेंभांतरीं,
कोणी ऊर्ध्व शरांसि योजिति, किती चर्मांसि घेती शिरीं. ॥ १४ ॥

मंत्र्याचेहि जितश्रमादि सुत जे दिक्स्यंदनाच्या दहा,
त्यांहीं चक्र विखंडितां रुडनळें जाला लवाचा दहा. ।
सारेही पडती सुतीक्ष्ण परिघें संताडितां ते तसे,
अंतीं नास्तिक वेदबाह्य नरकीं दुःशास्त्रवेत्ते जसे. ॥ १५ ॥

तेव्हां तो रुधिराक्ष राक्षस गदा हाणी लवाच्या शिरीं.
मूर्च्छा पावुनियां उठे पुनरपि क्रोधें मुहूर्तांतरीं.
केशीं त्यासि धरूनि, मस्तक तदा कुंतायुधानें हरी.
भास्वद्दत्त धनू करीं धरुनियां, गर्जे हरीच्या परी. ॥ १६ ॥

१ 'माया'—अन्य पाठ, काव्यसंग्रह.

( आर्यागीति )

पुनरपि तो लव तेव्हां क्षणमात्रें वेष्टिला महासेनांहीं. ।
गर्भापासुनि बाहिर पडल्यावर जेंवि जंतु अज्ञानांहीं. ॥ १७ ॥

( उपजाति )

तृणेंधनाच्छादित[1] आश्रयाश जसा तयाचाचि करी विनाश, ।
सेनागणीं वेष्टित तो शरांहीं मर्दी तयालाचि भयंकरांहीं ॥ १८ ॥

( उद्गीतिछंद )

जैमिनिकृतभारतगतहयमेधीं कुशलवाख्यानीं, ।
अध्याय दहावा हा श्रवण करावा रसज्ञमुख्यांनीं ॥ १९ ॥

---

## अध्याय अकरावा



( स्रग्धरा )

सौमित्रीशीं कुशाशीं प्रखरतररणीं ज्या क्षणीं योग जाला,
सीतेचा सूनु गर्जे निरखुनि मृगराड् उग्र जैसा गजाला ।
सोडी पांचां शरांतें घनरवरिपु; तो त्यांसि तोडूनि, बोले,
'मागें न स्यंदनातें कर, तव पिशितें तर्पितों आजि कोलें.[3] ' ॥ १ ॥

ऐसें बोलोन, तेणें स्वरिपुरथ शरें ताडितां भोंवताला,
भोवें[4] वेगें मुहूर्त क्षितिवरि करितां अश्व गेले लयाला. ।
तो अन्यस्यंदनस्थ, द्रुत विशिखयुगें वर्म तोडूनि पाडी,
कोपें बाणत्रयानें त्वरित हरिपदीं तत्किरीटासि धाडी. ॥ २ ॥

१ 'तृणें घनाच्छादित '–काव्येतिहाससंग्रह. २ 'तयाचा विकरी '–काव्येतिहाससंग्रह. ३ येथें 'कोल्हें' असाही पाठ असणें संभाव्य आहे–काव्यसंग्रह. ४ 'भावे '–काव्येतिहाससंग्रह.

( पृथ्वी )

म्हणे कुश, ' भला ! भला ! त्यजुनि वैरिता संप्रती,
रणांत हरिलेंसि तूं जरि मदीय भाराप्रती, ।
तुझ्या बळभरासि मी हरिन आज, विश्वास हा
मनीं धरुनियां रहा, शरगणासि माझ्या सहा. ' ॥ ३ ॥

( स्रग्धरा )

आग्नेयास्त्रास सोडी कुश, अनळ तदा भाजुनी तद्रथाला,
जाळी वीरव्रजाला, ध्वजरथतुरगां उष्ट्रकांला गजांला. ।
नाना शस्त्रें जळालीं, कितिक शिखिभयें योधवृंदें पळालीं,
छत्रें, वर्में गळालीं; सुरुचिर वसनें फार भस्मीं मिळालीं[1] ॥ ४ ॥

सौमित्री वारुणास्त्रें शमवित, दुसऱ्या मारुतास्त्रासि सोडी,
तेव्हां वायु प्रचंड ध्वज, रथ गज, जे त्यांसि अत्यंत झोडी. ।
आकाशीं शुष्कपर्णांपरि किति फिरती, भ्रांत सारे पदाती.
स्वर्गीतें[2] वृक्ष जाती, द्विजसम उडती शैलही, भीति देती. ॥ ५ ॥

( शार्दूलविक्रीडित )

सेनानी मग लक्ष्मणाप्रति म्हणे, ' मी यासि संहारितों,
एकाकी तंव साध्य होईल, पहा, अस्त्रांस मी वारितों. ' ।
ऐसें ऐकुनियां म्हणे कुश, ' वृथा मूढा ! किती जल्पसी ?
त्वज्जिव्हा हरितों बरें, मदिपुला छेदों जरी कल्पसी. ' ॥ ६ ॥

( स्रग्धरा )

ऐसें बोलोनि, जिव्हा हरि बळपतिची, तोहि बाणें कुशाला
ताडी कोपें हृदब्जीं, क्षितिदुहितृसुतें तत्कर छिन्न केला. ।
अर्धेंद्राकारबाणें मग रुचिर शिर च्छेदितां, रामबंधू
सेनानीमृत्युकाळीं बहुत खवळला मानसीं शौर्यसिंधू. ॥ ७ ॥

---

१ 'मळालीं,–असा पाठभेद–काव्यसंग्रह–परिशिष्ट. २ 'स्वर्गातें वृक्षजाती; द्विजसम उडती शैलही, भीति घेती.'—काव्यसंग्रह. ३ 'ही'–काव्येतिहाससंग्रह.

( शार्दूलविक्रीडित )

आधीं अर्पुनि बाण दारुण सहा, अर्पी बळें शक्तिला; ।
कुंतातें, असिला, गदेसि मग तो दावी महाशक्तिला.
त्यागी मुद्गर आणखी परशु या दोहींस, त्यांला करें ।
सीतेचा सुत सप्तधा क्षितितळीं छेदूनि पाडी शरें. ॥ ८ ॥

ज्यांपासूनि नभोंतरीं शिखिशिखा विद्युत्समा फांकती,
ऐसे बाण लवाग्रजें कवळितां लोकेशही धाकती. ।
त्यांहीं लक्ष्मणहृत्कपाटकवच च्छेदूनियां भेदिलें,
त्यातें भूवरि पाडिलें मग कुशें मूर्च्छास्वहस्तीं[1] दिलें. ॥ ९॥

जेव्हां दूरुनि बंधुसिंहनिनद श्रोत्रीं तयाच्या घसे,
पाहे, तों बळराजिवेष्टित लव क्ष्माजासुताला दिसे. ।
हातीं घेउनि खड्गचर्म, परम क्रोधें तदा धांवला,
अग्नीलागिं सहाय मारुत जसा जाऊनियां पावला. ॥ १० ॥

( पृथ्वी )

द्विधा गज विदारिले, रथहि धूळिला अर्पिले,
पदातिहय चूर्णिले, पिशितभुक् क्षणें तर्पिले. ।
कितेक पललक्षमाधर विनिर्मिले क्ष्मातळीं,
कितेक रुधिरें नदी, कितिक कूप, वापी, तळीं. ॥ ११ ॥

( उद्गीतिछंद )

जैमिनिकृतभारतगतहयमेधीं कुशलवाख्यानीं ।
अकरावा अध्याय श्रवण करावा रसज्ञमुख्यांनीं. ॥ १२ ॥

१ 'मूर्च्छासुहस्तीं'–काव्यसंग्रह.

## अध्याय बारावा



( शार्दूलविक्रीडित )

श्रीमद्राघव दीक्षित, स्वहृदयीं चिंता करूनी वदे;
'रे! वत्सा! भरता! स्वदर्शन मला सौमित्र तो कां न दे?।
ज्यांहीं जिंकुनि पाडिला त्वदनुज, क्रत्वश्व नेला असे,
त्याच्या सर्व यशासि घेऊनि, कसा आला न? बोला, कसे?॥ १ ॥

सौमित्रिप्रति संगरीं निरखितां देवादिही धाकती,
तेथें मंदमती किती द्विजशिशू युद्धीं कसे ठाकती?।
जन्योद्युक्तमना ममानुज जधीं होईल; तेव्हा तया
सांगा कोण शरण्य या त्रिभुवनीं नाशावया तद्भया?॥ २ ॥

( गीतिवृत्त )

कोपें प्रवर्ततां द्विजशिशुमथनीं शौर्यसिंधु मद्भ्राता,।
सुतनाशाकुलचित्ता प्रार्थी कोणासि तेथ तन्माता?॥ ३ ॥
धर्मगृहापासुनिहि स्वबळें आणील बंधुरत्नातें।
चंडपराक्रममंडित न चुकेल प्राज्ञ तो प्रयत्नातें. ॥ ४ ॥
मम यज्ञविघ्नकारक दारक कोठूनि पावले आजी?।
करुनि अवज्ञा माझी, वाजी धरिला, विनिर्मिला आजी. ॥ ५ ॥
अंगद सुगळ, बिभीषण, पवनज, यांतें कसें अनादरिलें?।
फणिफणमणी न जाणुनि, मदश्वरत्न द्विजात्मजें हरिलें. ॥ ६ ॥
अन्य मदीय सुहृज्जन त्यांचाहि मनांत न धरिला लेखा,।
धाकहि ज्यास न कांहीं द्विजसुतचेष्टित विचित्र हे देखा. ॥ ७ ॥
सौमित्रिप्रति माझ्या संदेशातें सुशीघ्र नेति असे,।
आणावे चार भले, भरता! अस्वस्थ चित्त आजि असे. ॥ ८ ॥
तत्सेवालाभरतें आणविलें पांच दूत तेव्हां भरतें।
बोले हृतभूभर, तें ऐका येतें कृपांबुनिधिला भरतें. ॥ ९ ॥

द्विजबाळ मोहनास्त्रें मोहुनि जीवंत लक्ष्मणा ! धरणें, ।
रिपुसिंधुनिमग्नयशःशरीर, यातें असें समुद्धरणें. ॥ १० ॥
तूं शूर, वीरसेवितरथ, स्वधृतिमान्, धनुःश्रुतिज्ञ, कृती; ।
अपराधी, परि रक्षीं, विरथ, निराश्रय, शिशू पशुप्रकृती. ॥ ११ ॥
जे परबाळावरती करिति दया, त्यांसि कीर्तिमा वरिती; ।
बहुपुत्रपौत्रलालनसुखभाजन संसृतीसि मधु करिती. ॥ १२ ॥
सीतावदनांबुजनिभ पुत्रानन मी विलोकिलें नाहीं, ।
संसृतिनदीप्रवाहीं मज कांहीं सुख न लाभलें पाहीं. ॥ १३ ॥
कां विपिनीं ? कोण पिता, माता ? स्थळ कोण ? हें विचारावें. ।
आणावें मजपाशीं, त्यांचें भय सर्वही निवारावें. ' ॥ १४ ॥
एवं सांगत असतां क्षतजोक्षितगात्र वीर बहु आले, ।
वेपथुकंपभयाकुळ रामातें नमुनियां सुखी झाले. ॥ १५ ॥

( शार्दूलविक्रीडित )

तेव्हां ते म्हणती, ' जगत्त्रयपते ! सौमित्रि गेल्यावरी
शत्रुघ्नासि विलोकितां खवळला, युद्धासि कोपें करी, ।
त्या काळीं मग त्या रणीं द्विजसुतें सेनापती मर्दिला,
देवासह्य परंतु लक्ष्मण कृती तो मोहहस्तीं दिला. ॥ १६ ॥
जेणें राक्षस लक्षकोटि वधिले, शौर्याब्धि, वीराग्रणी,
जेणें इंद्रजिदप्रधृष्य मथिला सर्वास्त्रवेत्ता रणीं, ।
गाती ज्याप्रति मर्त्यदेवरमणी, जो धीरचूडामणी
तो विप्रात्मजबाणभिन्न पडला संमूढ युद्धांगणीं. ॥ १७ ॥
हस्त्यश्वोष्ट्रपदातिरक्ततटिनी क्षोणीतळीं वाहिल्या ।
ज्यांचीं दुर्गम मांसकर्दमतटें; नाहीं अशा पाहिल्या. ।
शक्रच्छिन्नगरुद्गिरिव्रज तसे नागेंद्र संचेष्टती. ।
कोणाचे करपाद भिन्न, किति हृच्छल्यें बहू कष्टती. ॥ १८ ॥
नानावीरशिरःसरोजनिकराकीर्णक्षमेच्या तळीं
गृध्रश्येनशिवासकृत्प्रजवकस्तोमींहि वाढे कळीं. ।

एवं संक्षय पावलें बळ रणीं, क्षोणींद्रचूडामणी !
दीक्षा सोडुनि धांव कीर्तिरमणी नेली, असें तूं गणी ' ॥ १९ ॥

( पृथ्वी )

असें वचन ऐकतां परम मोह तो पावला,
पडे क्षितिवरी भ्रमें, भरत तत्क्षणीं धांवला, ।
धरी उचलुनी, द्विजव्रज तदाशिषा योजिती,
जळें कितिक शिंपिति, व्यजनमारुतें वीजिती. ॥ २० ॥

( गीतिवृत्त )

मग उघडुनि नेत्रांतें करुणावचनेंकरूनि राम म्हणे, ।
' हा वत्स ! अहह लक्ष्मण ! हा बंधो ! हा प्रवीरमूर्धमणे ! ' ॥ २१ ॥
भरत म्हणे, ' रघुनाथा ! धर्मच्युत शोच्य, हा तसा नोहे. ।
तच्छोकें न समुचिता विकळ दशा, धैर्यरत्नसानो ! हे. ॥ २२ ॥

( शार्दूलविक्रीडित )

निर्दोषा त्यजिली वनीं जनकजा तेव्हांचि वीराग्रणी
झाला पंकिल लक्ष्मण, स्वतनुला तो भार ऐसें गणी, ।
तो सारा कुशचंडकांडतटिनीमध्यें स्वयें धूतला,
झाला पूतचि; तद्यशें धवळिलें स्वर्गासि, या भूतळा. ॥ २३ ॥

मीही होइन पूत, राम ! वरदा ! आज्ञा मला आज दे. '
कैकेयीसुत रामपादनत तो, प्रार्थूनि, एवं वदे; ।
' जा वत्सा ! उठ; कोण तो कुश असे ? जाण स्वसेनेसि घे. '
ऐसें राघववाक्य ऐकुनि तदा तोही प्रहर्षें निघे ॥ २४ ॥

' तातादेशकरें वनें बहुतरें[1] ! म्या सेविलीं भीकरें,
त्वांही चीरजटाधरें मम वचः केलें खरें आदरें,
जीवंत द्विजलेंकरें धरुनियां जा आण, वत्सा ! बरें. '
ऐसा भूमिसुतावरें भरत तो आज्ञापिला उत्तरें. ॥ २५ ॥

---

१ ' बहुत रें '—काव्यसंग्रह.

( गीतिवृत्त )

ऐकूनियां सत्वरतें भरतें तो प्रार्थिला सुसत्वर, तें. ।
'बळमथनकुशळ खळ ते कसे धरावे ? न मानस त्वरतें. ॥ २६ ॥
दोघे बाळक काळकराळ कवण ते ? न तूजला कळती, ।
जाणत असेल मारुति कीं अंगद, सचिव नीतिमान् सुमती.' ॥ २७ ॥
अंगद म्हणे, ' वनीं त्या अपवादें त्यागिली सती सुमती, ।
त्वद्भ्रोत्रोद्भव झाले तीच्या ठायीं शिशू असे गमती. ' ॥ २८ ॥
मग जांबवंदंगदनलनीलपवननंदनादि वीरमणी ।
रमणीयवेषभूषित निघती क्षम सर्व विष्टपाक्रमणीं. ॥ २९ ॥
नरवानरसंकुल बल भूमिव्योमासि वेष्टुनी चाले, ।
भारार्त शेषमस्तक हाले, मग भूमिकंप बहु झाले. ॥ ३० ॥
क्षरती मदोदकांहीं गंभीरध्वान कज्जलाभ करी,
भूगत घन हे मानुनि, मुग्धाजन फार कौतुकासि करी. ॥ ३१ ॥
गणिकास्पर्शे होतें क्षीण यशः, पुण्यपुंजही जळती;
म्हणुनि जणों बहुभुक्ता क्षितिला धर्मज्ञ हरि न आतळती. ॥ ३२ ॥

( शार्दूलविक्रीडित )

चापी रुक्मरथी, प्रचंडमुसली, कांडी, कृपाणी, गदी,
हारी, कीतिक कुंडली, सुकवची, चर्मी, किरीटांगदी, ।
देवांच्या परि शोभती भट, चलत्क्षोणीध्र तैसे रदी,
झाल्या त्या कटकें तदा क्षितितळीं नामैकशेषा नदी. ॥ ३३ ॥
स्वर्णाचे ध्वज अंबरीं झळकती दानोदकें वर्षती
हस्ती गर्जेति, धूळिचे व्रज घन व्योमांतरीं दाटती, ।
झाला कर्दम, दानघर्मसलिलें तीं वाहती सांचती,
वर्षा मानुनियां शिखी बहुसुखी कांतांसवें नाचती. ॥ ३४ ॥

( स्रग्धरा )

ऐसा सेनेसमेत त्वरित भरत तो जाय बंधुद्वयातें
रक्षायातें, प्रतापें कुशल कुशलवालागिं जिंकावयातें. ।

भेरीध्वानें सुरांला बधिर करुनियां युद्धयज्ञक्षमेला
  पावे, जेथें सुमित्रासुतभटजनही कोटि, कीं लक्ष, मेला. ॥ ३५ ॥

कोठें अंगुलिहस्तपादरदनत्वङ्मूर्धजांत्रें, शिरें;
  कोठें अर्ध कलेवरें, गलदसृक्पूरें महाभीकरें; ।
कोठें कुंडलनिष्कहारकटकें त्र्यक्तिरीटांगदें;
  ऐसें तेथ धरातळीं निरखिलें रामानुजें सांगदें. ॥ ३६ ॥

त्या स्थानीं लक्ष्मणाला सलवणरिपुला शोधितां क्षिप्र गेला,
  बोले वातात्मजातें भरत, निरखुनि क्रूर रक्तापगेला, ।
सीताशुद्धयर्थ पूर्वीं क्रमुनि जलधिला, तुष्ट केलें अजाला,
  तैसा या सिंधुलाही तर, मज सुखवीं, शोध रामानुजांला.' ॥३७॥

'सिंधूतें तरलों तधीं अभिमुखी होती' म्हणे, 'ती सती.'
  ते झालीच पराङ्मुखी, लघु नदी हे दुस्तरा दिसती. ।
ईतें लंघुनि पाहतों परि बरें आतां त्वदाज्ञेस्तव.'
  ऐसें बोलुनियां उडें, करि मुखें सीताधवाचा स्तव. ॥ ३८ ॥

सीतात्यागजकोपतापविकळा धात्री, जणों तीप्रती
  होते प्रार्थित ते 'क्षमस्व' म्हणुनी दोघेहि बंधू कृती. ।
तेथें जाउनि, त्यांसि पाहुनि, म्हणे 'चित्रा विधीची कृती,'
  हातीं घेउनि, मारुति मग उडे स्वर्णक्षमाध्राकृती. ॥ ३९ ॥

दोघेही भरतासि नेउनि तदा वातात्मजें दाविलें,
  ते दूरस्थित वीरवानर, तिहीं निर्जीवसे भाविले,
लंकेशात्मजशक्तिनें हृदय तें जेव्हां रणीं भेदिलें,
  तेव्हां मोह असा नसेचि, मरणापासूनिही भें दिलें. ॥ ४० ॥

( वसंततिलका )

उद्दंडचंडकुशकांडविखंडितोरा
  तो रामबंधु धरि आकृति फार घोरा ।
वक्षःक्षतक्षतजसिक्ततनू सशोक
  लोकव्रजासि करि पंक्तिरथात्मतोक. ॥ ४१ ॥

( स्रग्धरा )

त्याच्या संरक्षणार्थ द्रुत भरत तदा स्थापुनीयां चमूला,
कोपावेशें म्हणे, 'हे रघूपतिभजनध्वस्तसंसारमूला ! ।
रक्षोवृंदैककाला ! सततगतिसुता ! बाळकातें विलोकीं;
या काळीं त्या खळाला स्वकृतफळ घडो भानुमत्पुत्रलोकीं.' ॥ ४२ ॥

( गीतिवृत्त )

ऐसें वदोनि जेव्हां ताडविला दुंदुभि स्वयें भरतें, ।
आज्ञाविधूदयीं त्या आलें सेनापयोधिला भरतें. ॥ ४३ ॥

( उद्गीतिछंद )

जैमिनिकृतभारतगतहयमेधीं कुशलवाख्यानीं ।
बारावा अध्याय श्रवण करावा रसज्ञमुख्यांनीं. ॥ ४४ ॥

---

## अध्याय तेरावा



( गीतिवृत्त )

तो पाहुनियां कुशलव म्हणती 'नाहीं रिपू निमाले कीं. ।
निकट विकटकटकभट प्रकट कटकसेच दुष्ट आले कीं ? ॥ १ ॥

( शिखरिणी )

असे ते बोलोनी, त्वरित मग दोघे उसळले;
वनीं वाय्वग्नीसे भरतकटकांतीं मिसळले;
महाकांडव्रातेंकरुनि सुटले मर्दित रणीं,
बुडे अब्धीमध्यें तदिषुशिखिसंतप्त तरणी. ॥ २ ॥

( रथोद्धता )

सूर्यरश्मिसमुदाय आटला, अंधकार मग फार दाटला. ।
जाहलीं जनविलोचनें वृथा, नासली रणकथा यशःप्रभा. ॥ ३ ॥

( गीतिवृत्त )

नेत्रें असूनि उघडीं, तिमिरीं स्वपरासि वीर नोळखती,
आकस्मिकलब्धश्रीमदांध अकुलीन नर जसे कुमती. ॥ ४ ॥

( स्वागता )

ताडिलें गजकरों करवालें: निर्मिलें रण भयंकर बालें. ।
वाहती बहुतर क्षतजा ते, निर्मिलें लवकरें क्षत ज्यातें. ॥ ५ ॥

खड्गपात करितां गजदंतीं, शब्द संचरति सर्व दिगंतीं, ।
पावक प्रगट होउनि भाजी, धांवतां चिरडती गजवाजी. ॥ ६ ॥

काळसर्परसना तरवारी, तीस कोण जन कातर वारी, ।
स्पर्शतांचि बहु सत्वर मारी, काय ते प्रगटली नरमारी ! ॥ ७ ॥

'तात ! सोदर ! सखे ! सुत ! काका !' यापरी बहुत मारिति हाका.
ऊठती कलितशस्त्र कबंधें, मारिती निजजनांसचि अंधें. ॥ ८ ॥

( वसंततिलका )

कित्येक शोणिततटिन्युदरांत मेले,
जे कातरांतर तमांत पळोन गेले.
एवं तदा क्षितीसुतातनयायुधांनीं
एका दिसांत भरिली यमराजधानी. ॥ ९ ॥

मांसासि भक्षुनि निपेवुनि शोणितातें,
भूतें 'दिलें' म्हणति, 'भोजन मिष्ट तातें'।
'याच्या नसे' म्हणति तीं, 'तुलना यशातें.'
तें एकतां, सुख गमे बहु त्या कुशातें. ॥ १० ॥

( शार्दूलविक्रीडित )

आसूर्योदय यापरी बळ तिहीं संहारितां पाहिलें,
तेव्हां त्या भरतासि कोपशिखिनें उद्दंडसे दाहिलें; ।
संताडी कुशहृत्स्थळासि अनळज्वाळाकुळेषुव्रजें,
साधूंच्या प्रतिपालनीं मृदु, असत्संक्रंदनीं तीव्र जे. ॥ ११ ॥

( गीतिवृत्त )

त्यांचें करुनि निवारण, वारणशत्रुप्रताप कुश बोले,।
'धरुनि वृथा काम रणीं कां मरणीं सिद्ध मूढ हे झाले? ॥ १२ ॥

( अनुष्टुप् )

सेनालक्ष्मणशत्रुघ्नपंचतामोहहेतु मी,
पतंगदीपकन्यायें मरतां काय हे तुमी?' ॥ १३ ॥

( पृथ्वी )

म्हणे भरत, 'हे शिशो! त्यज खळा! ममाश्वोत्तमा.
न मानिसि जरी, मनीं धरुनि गर्व लोकाधमा!।
यमालयपथीं न हो पथिक, मी करूनि क्षमा
न मारिन, असो प्रसू तव न तापसी सश्रमा. ॥ १४ ॥
मदीयबळशोणितेंकरुनि तर्पिली त्वां क्षमा,
स्वबंधुहि विमर्दिले जरि, तथापि केली क्षमा.।
त्यजीं मखहयास या धरुनि अन्यथा मी तुला,
पुरास मग नेइन क्षण न लागतां, रे मुला! ॥ १५ ॥

( गीतिवृत्त )

सोडुनि माझा घोडा, दोघेही हस्त या क्षणीं जोडा.।
'शरणागत' म्हणवा रे! याचि उपायें समर्थभय वारे. ॥ १६ ॥

'वांचविलें भरतानें' ऐसें जननीस शीघ्र सांगावें,।
पुनरपि असें न करणें, निजजीवनदातृकीर्तिला गावें' ॥ १७ ॥

( स्रग्धरा )

कैकेयीपुत्र बोले खर मृदुल असें जेधवां आत्मतुंडें,
कोपें नेत्रें कुशाचीं तव दिसति, जशीं खादिरांगारकुंडें.।
सोडी निश्वास पादाहत उरग तसा, दंतवस्त्रासि खंडी,
कोदंडी चंडकांडी कुशचि परि गमे पत्र ज्याचें शिखंडी. ॥ १८ ॥

ताडी सप्तेषुवृंदें कुश कुशल करें शीघ्र रामानुजाला,
पांचां, सातां शरांहीं इतर भट तयां, सत्तरांहीं नळाला, ।
वाताच्या नंदनाला खरविशिखशतें, अंगदातें सहस्त्रें,
नीळातेंही तदर्धें; स्थविर, तिस शतें छिन्न, वाहे महास्त्रें. ॥१९॥

( अनुष्टुप् )

ज्यांच्या उरीं स्पर्श केला बलाकृष्टशिलीमुखें, ।
त्यांहीं त्याहीं भूगतांहीं वीरांहीं वाशिलीं मुखें. ॥ २० ॥

( उपजाति )

षट्चंडकांडप्रकरें लवानें केलें धनु छिन्न तदा लवानें,
ससूतवाजी शुभलक्षणानें संचूर्णिला तद्रथहि क्षणानें. ॥ २१ ॥

( इंद्रवज्रा )

वक्षःस्थळीं बाण तदा कुशानें संप्रेरिले युद्धनिरंकुशानें,
संमूढ होऊनि पडे धडाडां, रक्तप्रवाहासि वमे भडाडां ॥ २२ ॥

( शार्दूलविक्रीडित )

जेव्हां मूर्छित देखिला क्षितितळीं भास्वत्कुळाचा टिळा,
क्रोधें पर्वत योजनायत मरूत्पुत्रें समुत्पाटिला, ।
हुंकारध्वनिकंपितत्रिभुवनें दोघांवरी सोडिला,
त्यांहीं तो त्रसरेणुसंचय वियद्रंगांतरीं पाडिला. ॥ २३ ॥

वातोद्भूतमहीध्ररेणुगण तो जेव्हां शिरे खांगणीं,
युद्धालोकनकौतुकागतनभःस्थस्वर्वधू तत्क्षणीं ।
वक्त्रें झांकिति, नेत्र चोळिति, किती त्या फुंकिती, थुंकिती,
कीती खोकति, ओकती, किती धुतस्वालंकृती शिंकती. ॥ २४ ॥

ऐसें कौतुक निर्मिलें लवयुतें त्या सद्यशःसंचकें,
[1]वामीं मारुति ताडिला मग कुशें बाणांचिया पंचकें. ।

१ ' वामी '—काव्येतिहाससंग्रहपाठ.

वज्रछिन्ननगेंद्रसा धडधड क्षोणीतळीं आपटे,
कांपे सांद्र [[1]विनासरा] थरथरा भू, पृष्ठ जीचें फुटे. ॥ २५ ॥

( इंद्रवज्रा )

ऐसें कुशें कौतुक तेथ केलें, सर्वां भटांचें मग धैर्य गेलें, ।
धाकें पळाली अवशिष्ट सेना, भ्याडांसि कांहींच पुढें दिसेना. ॥ २६ ॥

( उपेंद्रवज्रा )

करूनियां ते जन वंदनातें, निवेदिति श्रीरघुनंदनातें. ।
सबाष्पदीनानन खेद मानी, धरी धृतीतें परमाभिमानी. ॥ २७ ॥

( शार्दूलविक्रीडित )

'हा! वत्सा! भरता! मदुक्तिनिरता! हा! सद्गुणा! लक्ष्मणा!
हा! वत्सा! घननादनाशकुशला! हा भिन्नरक्षोगणा! ।
हा! शत्रुघ्न! सखे! मरुत्सुत! मम प्राणप्रदा! नील! हा!,
हा! हा! अंगद! जांबवन्नल! कसे निर्वीर्य झालां महा!' ॥ २८ ॥

एवं फार तदा विलाप करुनि, श्रीराम तो घे सवें
सुग्रीवासि, बिभीषणाप्रति; रथीं आरूढ झाला जवें. ।
सेनामध्यविराजमान उडुराट् शोभे जसा खांगणीं,
पावे जाउनि युद्धभूमिजवळि क्षोणींद्रचूडामणी. ॥ २९ ॥

( अश्वधाटीवृत्त )

'रामा! मनोज्ञगुणधामा! पलाशजनतामारणैकनिरता!
कामारिचित्तसदना! मारुतिप्रियसुनामा! नशत्रुविजिता! ।
धामाधिपान्वयवरा! मानशौर्यसुभगा! मानिषेव्यचरणा!
वामाकृते! इतरवामापराङ्मुखमना! मानवैकशरणा!' ॥ ३० ॥

( शार्दूलविक्रीडित )

एवं शल्यनिपीडितात्मजनतावक्त्रोत्थनामध्वनी,
येतां युद्धधरेसमीप, शिरति श्रीरामकर्णाध्वनीं, ।

---

[1] येथें 'विनाकरा' असा काव्येतिहाससंग्रहाचा पाठ आहे.

त्यांला देखुनियां दयाकुलमना झाला कृपापांपती,
'गेले काय' म्हणे, 'किशोर?' तंव ते आले अकस्मात् कृती. ॥३१॥

( स्वागता )

काकपक्षधर, कार्मुकपाणी, मेघवर्ण, सुकुमार, कृपाणी, ।
तुल्यलक्षण, समान वयाचे देवसे गणिति मानव यांचे. ॥ ३२ ॥

जानकीवदनपद्मसमानें तन्मुखें निरखिलीं बहु मानें, ।
स्वाकृतीधरशिशूंप्रति पाहे, तों सुखासि रघुनंदन लाहे. ॥ ३३ ॥

तद्वृत्तश्रवणोत्सुकश्रुति, कृती, श्रीराम त्यातें पुसे,
'कोणापासुनि सांगचापनिगमीं अभ्यास केला असे? ।
उद्दंडध्वजिनीविनाश करितां कांहींच नाहीं श्रम?
क्षोणीभूषणराजिरत्न तुमचा कोणा स्थळीं आश्रम? ॥ ३४ ॥

कोणीं केला[1] उपनय[2]? वदा मातृताताभिधानें.
शब्दब्रह्माभ्यसन घडलें कीं महत्सन्निधानें? ।
निष्प्रत्यूहें सकळ घडती नित्य कीं सद्विधानें?'
रामें वाक्येंकरुनि पुशिलें त्यांसि एवंविधानें. ॥ ३५ ॥

( पृथ्वी )

म्हणे कुश, नृपा! असो कशितरीहि आस्मत्कथा,
पुसूनि तुज काय गा? फळ? विलंब होतो वृथा. ।
त्यजूनि निज पौरुषाप्रति, अशा न वार्ता रणीं.
करीं, स्वविशिखाशि घे, त्वरित तूं नियोजीं गुणीं.' ॥ ३६ ॥

'स्ववृत्त न निवेदितां प्रथम, वीरचूडामणे!
न युद्ध तुजशी घडे' रघुपती असें जों म्हणे, ।
तदा स्मितलसन्मुखद्विजसमूहशुभ्रद्युति-
च्छटाधवलितांबरक्षिति कथी कुश स्वस्थिति. ॥ ३७ ॥

---

१ 'केलें'—काव्येतिहाससंग्रह. २ 'उपनयन'—काव्येतिहाससग्रह.

( शार्दूलविक्रीडित )

' सीता केवळ काननी प्रसवलीं; जीं जातकर्मादिकें
कर्मे सोपनयें स्वयेंचि मुनिनें केलीं महत्कौतुकें; ।
समग्र् वेद सशास्त्रही पढविले, गानादि नानाकळा;
श्रीमद्रामचरित्र चित्र कथिलें, झाली मती सोज्ज्वळा. ॥ ३८ ॥

बुद्धिस्वास्थ घडे, मनोमळ झडे, स्वर्ग स्वयें सांपडे,
देहीं मोक्ष जडे, करीं जय चढे, काळारि धाकें दडे, ।
रामाच्या चरितामृताप्रति पितां सेनाजयाची कथा.
तेथें काय ? कितीक कौतुक मनीं लोकांसि भासे वृथा ! ॥ ३९ ॥

( आर्यावृत्त )

रामा ! तूझी ममता जायातनयालयादिकीं नाहीं, !
तस्मान् मृतसेनेची तुजला गणना नसो कांहीं. ॥ ४० ॥

( गीतिवृत्त )

शक्ति नसे तुज संप्रति, ते त्वां कां त्यागिली वनीं? रामा ! ।
शक्तिविवर्जित नर जो, तो होइल काय योग्य संग्रामा ?' ॥ ४१ ॥

( वसंततिलका )

' सीता ' असा परिसतां कुशशब्दकानें,
ते पुत्रसे वळखिले रघुनायकानें. ।
' धिग् युद्ध हें ' म्हणुनियां, मग कश्मलाला
पावोनियां, विकळ केवळ तो गळाला. ॥ ४२ ॥

( इंद्रवज्रा )

झाला मुहूर्तें मग सावधान सीतापती, शौर्ययशोनिधान ।
तेव्हां जगत्कंटकरावणारी वक्त्रें सुकंठासि असें विचारी. ॥ ४३ ॥

( गीतिवृत्त )

' कोणाचे सुत दोघे हे, या शोधासि वाळिबंधो ! घे, ।
मजशीं करिती दावे जाणत असशील तरि निवेदावे. ' ॥ ४४ ॥

सुग्रीव वदे तेव्हां रामातें नमुनि पूर्णकामातें, ।
'तूझेचि वनामध्यें दोघे प्रतिबिंब वाटती मातें. ॥ ४५ ॥

( वसंततिलका )

आज्ञा मला त्वरित दे, रघुनायका ! मी
आहे दशास्यमृतिपासुनि युद्धकामी. ।
हे भक्तकामसुरपादपराज ! आजी
या बाळकांसह घडो मजलागिं आजी. ॥ ४६ ॥

( स्रग्धरा )

आज्ञा होतां सुकंठें तरु उपडुनियां क्षेपिला जों[1] प्रचंडें,
त्यांहीं[2] केलीं द्रुमाचीं स्वविशिखनिकरें तों नभीं कोटि खंडें; ।
तद्वक्षोरक्त जैसें शरततिसि दिलें, देहही त्या क्षितीतें,
आली मूर्च्छाहि याच्या धरुनि म्हणुनियां अर्पिले प्राण तीतें. ॥ ४७ ॥

( शार्दूलविक्रीडित )

होतां वानरराज मूर्च्छित असा, तो नीळही तत्क्षणीं,
क्रोधाला धरुनी मनांत, तरुला हस्तीं, उडे खांगणीं, ।
ताडी त्यासि धरारुहें प्रबळ तो बाहूसि पाणिद्वयें,
हाही सानुज खंडितद्रु कुश तद्वक्षासि बाणें स्वयें ॥ ४८ ॥

( स्रग्धरा )

तेव्हां तद्रक्तबिंदु क्षितिवरि पडले, मूळनीळाप्रमाणें
त्यांचेही नीळ झाले प्रगट, मग कुशें ताडिले तेहि बाणें; ।
तद्रक्ताच्याहि धारा प्रबळतर महाकायनीळात्ममाता,
झाला ऐसाचि नीळव्रज सगिरितरु क्ष्मानभोंतीं न माता. ॥ ४९ ॥

चित्तीं सम्यग् विचारी कुशल कुश, जलौकास्त्र जें त्यासि योजी
त्यांच्या देहीं जलौका प्रबळचि जडति कोण हो ! त्यांसि मोजी ?

---

१ 'जो'–काव्येतिहाससंग्रहपाठ.

२ 'त्या ही केलीं'...इ०–काव्येतिहाससंग्रहपाठ.

होता नीरक्त पूर्वासहित शरचित क्ष्मातळीं बोळवीले,
कुष्टाचे चाळविले कर, यमसदना सर्वही बोळवीले. ॥ ५० ॥

( पृथ्वी )

गुणग्रहणदक्ष ते म्हणति, ' साधु साधु; क्षमा,
क्षमादुहितृनंदना ! धरु तुझा तदा पक्ष मा ।
क्षमाबळपराक्रमद्युतियशोनिधी सर्वदा
वदान्यपति हो, सुखी चिर वसें सुहृत्सर्वदा ! ' ॥ ५१ ॥

( अनुष्टुप् )

तदा कुशलवत्रस्त तें शिरे सैन्य काननीं, ।
यशस्तोम जनीं, त्यांचा गुण स्वर्नायिकाननीं ॥ ५२ ॥

( शार्दूलविक्रीडित )

एकाकीच तदा रघूद्वह रणीं क्रोधें उभा राहिला;
तद्भीत्याकुल भूमि कांपवि धृतस्वीयात्मभाराहिला; ।
नेला कीं चिरसंचितोत्तमयशस्तोम स्वयें पाहतां,
' युद्धीं मृत्यु बरा ' म्हणे ' सुख नसे दुष्कीर्तिला वाहतां.' ॥ ५३ ॥

( वसंततिलका )

कालानलप्रभशरांसि गुणासि जोडी,
आकर्ण चापलतिकेप्रति राम ओढी, ।
बालद्वयावर कृपेसह शीघ्र सोडी,
तों त्यांस सानुज कुश स्मितवक्त्र तोडी. ॥ ५४ ॥

( आर्यागीति )

शिशुतें सत्वरतातें समर्पिला जों क्षुरप्र सत्वर तातें, ।
तों तो होय चतुर्धा; बाणांशीं वाढली अशी ते स्पर्धा ॥ ५५ ॥

( शार्दूलविक्रीडित )

प्रावृण्मेघ जसा नगावरि जळें वर्षे तसा रामही
बाणांच्या निकरें, तदा थरथरां कांपे असारा मही. ।
तों ते सस्मितवक्त्र कांडततिचे निर्मूनियां तूकडे,
भूमीतें किति अर्पुनी, उडविती, व्योमस्थ देवाकडे. ॥ ५६ ॥

( गीतिवृत्त )

निर्धनलोकमनोरथकृपणालयशारदांबुदासारे ।
त्याचि रणीं निष्फळ शर रामाचे जाहले तदा सारे. ॥ ५७ ॥
रण जनविस्मयकारक दारकयुग्मासवें असें रामें ।
केलें खरतरशरवरधरकरपद्में गुणाचयारामें[1] ॥ ५८ ॥

( द्रुतविलंबित )

स्वबळतुल्य तदीय बळाप्रति स्वहृदयीं समजे धरणीपती. ।
शर तयांसि शिवे नचि आपुला, तदिषुगोचर तो बहु तापला. ॥ ५९ ॥

( स्रग्धरा )

त्या दोघांच्या मुखातें जंव निजनयनें, युद्ध होतांहि, पाहे,
तों तों कांतास्मृतीतें घडिघडि हृदयीं जानकीजानि लाहे. ।
त्या रंध्रीं त्या सतीचा स्मर, अणिक तिचे पुत्रही चापपाणी,
एकामेंचि प्रतापें रघुपतिस उरीं ताडिती क्रूरबाणीं ॥ ६० ॥

( पंचचामर )

उरःक्षतक्षरत्प्रभूतरक्तसिक्तविग्रह,
प्रमीलिताक्ष तो, जगत्क्षयीं जसा रवि ग्रह. ।
सुराश्रुबिंदुसंततीसह क्षणें रथीं पडे,
सखेद लेख देखतां, प्रमोद त्यांसही घडे. ॥ ६१ ॥

प्रचंड पंक्तितुंडदंडदक्षबाहुदंड हा
किशोरकांडखंडितस्वपिंड जाहला अहा ! ।
सतोक देवलोकही सशोक तो करी क्षमा-
तळीं निजाश्रुवृष्टिला, तृणोद्भवास जे क्षमा– ॥ ६२ ॥

( मंदाक्रांता )

ऐसा जेव्हां रघुतिलक तो गुंतला मोहपाशीं,
आले हर्षें कुशलव तदा जानकीजानिपाशीं. ।

---

१ ‘ गुणांचियारामें ’–काव्येतिहाससंग्रह.

घेती त्यांतें उतरुनि करें मेदिनीमंडलातें,
केयूरातें कटकपदकस्त्रङ्मणीकुंडलातें. ॥ ६३ ॥

( स्रग्धरा )

कैकेयीसूनुमेघध्वनिरिपुलवणद्वेषणाद्यंगभूषा,
त्यांतें घेती करांहीं अभय, हरि जसा दीपकांतीसि पूषा. ।
मूर्च्छाग्रस्त प्रतापी भट, इतरहि जे सैनिक च्छिन्न काय,
दोघे तद्भूषणांचें हरण करिति, तद्भारनाशार्थ काय ! ॥ ६४ ॥

( शार्दूलविक्रीडित )

'आहे हा रथ हेमरत्नखचित ब्रध्नप्रभापुंजसा,
जावें यावरतें बसोनि'[1] लव हें बोले स्वतोषें जसा, ।
तेव्हां सानुज तो चढे कुश सुखें श्रीराघवस्यंदनीं,
त्यांची दृष्टि जनांसि त्या निरखितां गेली मरुन्नंदनीं. ॥ ६५ ॥
श्रीमन्मारुति जांबवान् प्लवग हे दोघेचि तेथें कृती
होते कृत्रिममूर्च्छित क्षितितळीं अत्यंत रम्याकृती. ।
त्यांतें पाहुनियां म्हणे लव 'कुशा ! या वानरांतें घरा
या नेऊं, अवलोकितांचि जननी होईल हृष्टांतरा.' ॥ ६६ ॥

( स्रग्धरा )

ऐसें ऐकोनि कानें पवनसुत म्हणे 'जांबवन् ! मृत्यु आला,
तूतें, मातें धरूनि प्रबळबळ लवें नेइल स्वालयाला. ।
मूर्च्छाग्रस्तात्म रामप्रभृति मृततसे पाडिले बाळकांहीं,
झांकावें लोचनांतें दृढ जयद नसे आपणा काळ कांहीं. ॥ ६७ ॥

( शार्दूलविक्रीडित )

युद्धातें करितां महाबळ शिशू संहारितील क्षणें,
मच्चित्तीं त्रिजगज्जयार्हचि असे हे भासती लक्षणें. ।
जातील स्वगृहासि घेउनि, तरी संदिग्ध वाटे जिणें;
आजि क्ष्मातनयासमीप घडतें पंचत्व शस्त्राविणें' ॥ ६८ ॥

---

[1] 'शब्द'—काव्येतिहाससंग्रहपाठ.

( स्रग्धरा )

ऐसें बोले उपांशु श्वसनसुत मग क्षिप्र तो स्तब्ध[1] जाला,
दोघांतें न्यावयाला लव लवकरि तो त्या स्थळालागिं आला; ।
स्थापूनि स्यंदनांतीं प्रबळ शिशु सुखें पर्णशाळेशि गेले,
सीतपादांबुजातें नमन करुनियां प्रांजळी नम्र ठेले. ॥ ६९ ॥

( गीतिवृत्त )

पुत्रांतेंहि न हृदयीं आनंदातेंहि ते धरी सुमती,
करुणामृतासि केवळ न, वर्षली अश्रुवारिलाहि सती. ॥ ७० ॥
चिर आलिंगुनि पुत्रद्वयास सोडी श्रमासही सीता, ।
सुततनुगतरिपुशस्त्रव्रणावलोकप्रहर्षिताभीता. ॥ ७१ ॥

( स्रग्धरा )

सांगे सीतेसि तेव्हां लव, ' जननि ! कुशें फारसें युद्ध केलें,
याच्या त्रासें रिपूचें बहु बळ यमुनाबंधुगेहासि गेलें. ।
या वीरें राम तोही प्रबळ परि रणीं जिंकिला बाणजाळें,
हीं त्यांचीं भूषणें, हा रथवरहि पहा, थोर आश्चर्य झालें ! ॥ ७२ ॥

( उपजाति )

त्वत्कौतुकार्थ प्लवगद्वयातें मी आणिलें, तूं अवलोक यांते. ।
तुझ्या कृपेनेंचि खळ क्षयाला नेऊनि, आलों कुशळ क्षयाला ॥ ७३ ॥

( अनुष्टुप् )

एवं ऐकोनि पाहे, तों वोळखे मारुतीस ती. ।
दुसरा जांबवान् वृद्ध हें जाणें सुमती सती. ॥ ७४ ॥

( गीतिवृत्त )

सीता म्हणे लवाला, ' रणीं प्लवंगांस सोड जा बाला ! ।
मज पाहुनि हे मानी होतील प्राणहीन, हें मानीं.' ॥ ७५ ॥

( उपजाति )

ऐकोनि ऐसें, मग त्या लवानें रणीं हरींतें त्यजिलें लवानें. ।
झाली सुखी ते बहु भूमीकन्या धन्या, वदान्या, जगदेकमान्या ॥ ७६ ॥

( शिखरिणी )

अशा काळीं आला वरुणसदनापासुन मुनी,
तयातें हे दोघे कथिति निजवृत्तासि नमुनी. ।
तदा आलिंगूनि क्षिति दुहितृपुत्रांप्रति, करें
शिरीं स्पर्शे हर्षें सुरविटपिगर्वक्षयकरें. ॥ ७७ ॥

( शार्दूलविक्रीडित )

गंगातीरपवित्रनामशमनप्रेमाश्रुनीरव्रजें
वर्षे त्यांवर तो दयाब्धि भगवान् वाल्मीकि नेत्रांबुजें. ।
ज्यातें जे कथिली धनुःश्रुति, तिचें साफल्य जालें खरें,
त्या विप्रें सुतनिर्विशेषचि वनीं तीं पाळिलीं लेंकरें ॥ ७८ ॥

( वसंततिलका )

श्रीरामसैन्यहि बळें मथिलें करांहीं,
संपादिला जय सुदुर्लभ लेंकरांहीं.
आश्चर्ययुक्त मुनि, पावुनियां सुखातें,
पाहे अतृप्त हृदयें क्षण तन्मुखांतें. ॥ ७९ ॥

( स्रग्धरा )

ऐसा शिष्यचरित्रतुष्ट भगवान् वाल्मीकि बोले मुखें,
' या युष्मच्चरितेंकरूनि हृदयीं मी पूर्ण झालों सुखें. ।
केला मत्प्रिय राम मूर्च्छित तुम्हीं, हें दुःख झालें मला,
दावा तें स्थळ, जेथ सैन्य वधिलें; आतांचि पाहूं, चला. ॥ ८० ॥
राजा राम गुणाभिराम, तुमचा तो तात की; त्याप्रति
दावा नेउनियां मला, उचित हें केलें नसे संप्रति.' ।
विप्रव्रातसमेत तो मग उठे, बोलोनि ऐसें, मुनी
सीतानंदन दाविती मग तया स्थानासि त्या नेउनी ॥ ८१ ॥

( शार्दूलविक्रीडित )

जेव्हां सानुज मूर्च्छित क्षितितळीं श्रीराम तो देखिला,
त्रैलोक्याभर बाळविक्रम वनीं वाल्मीकिनें लेखिला,[1] ।

---

1 ' देखिला '—काव्येतिहाससंग्रहपाठ.

तेव्हां तो मुनि मंत्रपूत सलिलें सावांसि शिंपीं करें
सर्वक्लेशहरें, जनेप्सितकरें, पुण्यामृतैकाकरें. ॥ ८२ ॥

( इंद्रवंशा )

सुप्तोत्थिताचेपरि सर्व ऊठले, वंदूनि वाल्मीकिपदासि भेटले. ।
कृपाकटाक्षें यमपाश तोडिले म्हणोनि रामें निजहस्त जोडिले. ॥ ८३ ॥

( स्रग्धरा )

तेव्हां वाल्मीकिनामा मुनि धरि हृदयीं सानुजाला अजाला,
आनंदाश्रुप्रवाहें भिजवि, बहु तदा तोष झाला द्विजाला. ।
बोले तो लेखकांताप्रति धिषण जसा, कीं पिता स्वात्मजाला,
ऐसाची तूं त्रिलोकीं, गुरु कवि, भगवान्, वंदिति सर्व ज्याला. ॥ ८४ ॥

रामा ! लोकापवादें निजयुवति वनीं त्यागिली त्वां ससत्वा,
ते म्यां यूपार्थ रानीं विचरत असतां देखिली शुद्धसत्वा, ।
तूझी कांता प्रशांता, अजतनुजवधू मैथिलाची सुता, हे
जाणूनि, त्राण केलें तनुवचनमनें[1] आजपर्यंत, पाहे ॥ ८५ ॥

तीचे हे पुत्र दोघे कुशलव, तुजसी निर्मिलें युद्ध यांहीं,
पुत्रच्छात्रादिकांहीं जित बुध धरिती दुःख चित्तीं न कांहीं. ।
आतां त्वद्विप्रयोगप्रखरशिखिशिखातप्तदेहा अदोषा
न्यावी हर्षें गृहातें, धरुनि मम वचें, हे सपुत्रा स्वयोषा' ॥ ८६ ॥

( अमृतध्वनि )

ऐसें वदोनि, मग शिष्यासि पाठवुनि, सीतेसि आणवि मुनी,
स्वीकारिली सतनया राघवें त्वरित, वाल्मीकिलागि नमुनी. ।
हर्षें तदा कुसुमवर्षें अमर्त्य जन वर्षे रघूत्तमशिरीं,
प्रेमाश्रुशीकर सुरांचेंहि भूमिवरि, नीहारतेंवि शिशिरीं. ॥ ८७ ॥

गाती नभीं मुदित गंधर्व, नाचति तदा अप्सरोगण सुखें,
ब्रम्हेंद्ररुद्रमुख देव प्रहृष्ट रघुनाथासि वर्णिति मुखें. ।

---

१ 'तनुजवचनमनं'–काव्येतिहाससंग्रह.

भेरीप्रभृत्यखिलवाद्यस्वनेंकरुनि भेरीची होय जगती;
वाहे सुशीत, मृदु, गंधाढ्य वात; बहु लाहे प्रमोद मग ती. ॥ ८८ ॥

( स्रग्धरा )

एवं झाला प्रमोद प्रचुरतर तदा विष्टपीं; अंगनेला
अंगीकारोनि, रामें मग निज नगरा सर्षि वाल्मीकि नेला. ।
भेरीवीणामृदंगप्रभृति बहुविधें वाजलीं मंजु वाद्यें,
जेव्हां केलें प्रयाण प्रमुदितहृदयें त्या जगत्संभवाद्यें ॥ ८९ ॥
साकेतालागिं रामें गमन करुनियां यज्ञ संपूर्ण केला.
झालें स्वांतीं प्रमोदप्रचुर अवभृथस्नान भूकन्यकेला. ।
दासीदासाश्वरत्नक्षितिकनकरथेंभेंद्रधेन्वंशुकांहीं.
झाले तृप्त द्विजाति, स्वमनि न गणिती द्रव्यनाथासि कांहीं. ॥९०॥

उपसंहार

( शार्दूलविक्रीडित )

एवं रावणपीडितत्रिभुवनक्लेशाक्षयाकारणें
ब्रह्मप्रार्थितपादपद्मयुगुलें, देवें जगत्कारणें, ।
मायामानुषविग्रहें, कृतमहारक्षःसमिन्निग्रहें,
सर्वांतें सदनुग्रहें सुखविलें निर्दोषलीलागृहें ॥ ९१ ॥
ऐशीं नित्य सुखाकरें, सुचरितें, एनस्तमोहस्करें,
जीं केलीं करुणाकरें, रघुवरें, भक्तापदातस्करें ।
त्यांमध्यें लव वर्णिला प्रमुदितस्वांतें मयूरेश्वरें
लोकीं नाहिंच आर्य कार्य दुसरें या विग्रहें नश्वरें. ॥ ९२ ॥

( उद्गीतिछंद )

जैमिनिकृतभारतगतहयमेधीं कुशलवाख्यानीं, ।
तेरावा अध्याय श्रवण करावा रसज्ञमुख्यांनीं ॥ ९३ ॥

# कुशलवोपाख्यान



## टीपा व स्पष्टीकरण



### अध्याय पहिला

हा अध्याय केवळ प्रास्ताविक स्वरूपाचा आहे. रामानीं लोकापवादास्तव आपल्या प्रिय पत्नीचा त्याग करण्यापूर्वीचा कथाभाग यांत वर्णिला आहे. चवदा वर्षांच्या प्रदीर्घ वनवासानंतर रावणास मारून रामानीं आपल्या निष्कंटक राजवटीनें आपल्या प्रजेला व आप्तस्वकीयांना जें सुख दिलें, त्यामुळें पृथ्वीवर सर्वत्र संपन्नता झाली. या अध्यायांतील सुखाचा प्रकर्ष व पुढील अध्यायांत लोकापवादश्रवणानें होणारी दुःखाची सुरवात, यांतील विरोध वाचकाला जाणवल्याशिवाय रहात नाहीं. म्हणून हा अध्याय पुढील कारुण्यजनक कथानकाची पार्श्वभूमिकाच होय असें म्हणण्यास हरकत नाहीं. पहिल्याच गीतींत पंतांनीं गणपति, गुरु, कार्तिकस्वामी, शंकर, पार्वती, गंगा व सरस्वति यांना वंदन केलें आहे. ग्रंथनिर्मिति निर्विघ्नपणें पार पडावी, म्हणून इष्ट देवतांना प्रथम वंदन करण्याचा कवींचा प्रघात आहे. पंतांनीं नमिलेले सर्व देव व देवता शंकरांच्या घराण्यापैकीं असून त्यांचीं नांवें गकारानें आरंभित होतात, व म्हणून सहजच येथें अनुप्रास साधला आहे. **रामात्मज**—मोरोपंत. पंतांच्या वडिलांचें नांव रामाजीपंत असें होतें. शिवाय पंत हे रामभक्त असल्यामुळें रामाचे पुत्र जे कुश व लव त्यांचेंच चरित्र गाण्याची त्यांना बुद्धि व्हावी, यांत विशेष असें कांहीं नाहीं. **श्लोक २.** येथें प्रस्तुत आख्यानाचा विषय थोडक्यांत दिला आहे. रामानें लोकापवादभयामुळें सीतेला टाकणें, तिनें वाल्मीकीच्या आश्रमांत राहणें, तिला तेथें आवळे जावळे पुत्र होणें, त्यांनीं रामानें अश्वमेधासाठीं सोडलेला घोडा धरणें, व पुढें रामाशीं त्यांचें युद्ध होऊन प्रत्यक्ष वडिलाचाच त्यांनीं पराभव करणें, हा या आख्यानाचा

एका श्लोकांत सारांश आहे. **वसुमतिकन्या**—सीता; पृथ्वीची मुलगी. **महीजा**–सीता, पृथ्वीपासून उत्पन्न झालेली. **यम**—आवळे जावळे. **तिहीं**—त्यांनीं, त्या पुत्रांनीं. **श्लोक ३.** यांत रामवनवास, रावणाकडून सीतेचें हरण, रामाचें सुग्रीवाशीं सख्य व रामाकडून वाळीचें हनन इत्यादि कथाभाग सूचित केला आहे. **तातादेशें** इ०—दशरथाच्या आज्ञेनें. **मेदिनीकन्यका**—सीता. **प्लवगपति**—वानराच्या राजाशीं. सुग्रीव हा वानरांचा राजा होता. रावणाशीं युद्ध करतांना रामांना सुग्रीवाच्या स्नेहाचा फार उपयोग झाला. सुग्रीव व वाळी या दोघा बंधूंत पत्नीसंबंधीं भांडण होतें. रामानीं सुग्रीवाचा पक्ष स्वीकारून वाळीला मारलें, व सुग्रीवाला आनंदित केलें. **विशिखें**—बाणानें. **दिवाळी दावणें**—आनंदाचे दिवस दाखविणें. **श्लोक ४.** रावणवधानंतरची व्यवस्था वर्णन करतात. **ससुता इ०**—पुत्र व अमात्यासह रावणाला रामानें मारलें. लंकेचें रावणाचें राज्य त्याच्याच बिभीषण नांवाच्या धाकट्या भावास दिलें. **स्विध्वर्क इ०**–समुद्र, सूर्य व चंद्र असेतोंपर्यंत. यावच्चंद्रदिवाकरौ, अर्थात् कायमचं. **स्वाहेशा इ०**—अग्नीच्या मुखांत शुद्ध ठरलेल्या सीतेसहित. रावणाचा स्पर्श झाल्यामुळें सीतेनें अग्निप्रवेश करून आपणास शुद्ध करून घेतलें. **साकेत**—अयोध्या. **सुपुष्पकीं**—सुंदर अशा पुष्पक नांवाच्या विमानांतून. **कृती**—कृतकृत्य झालेला ( राम ). **श्लोक ५.** रामागमनानें अयोध्येंतील लोक किती आनंदित झाले, व किती उत्सुकतेनें सर्वांनीं त्यांचें स्वागत केलें, त्याचें अनुरूप उपमेनें पंत वर्णन करतात. **मरुत्पुत्र**—मारुति. **जानकीपति इ०**—रामाच्या गुणसमूहास. **श्रीरामागमन इ०**—जशी तान्हेलेली गाय पाण्याकडे सोत्कंठ धावावी, तशीच रामाच्या आगमनानें आनंदित झालेली अयोध्या धांवली. अयोध्या धांवली म्हणजे तेथील लोक धांवले. container for the things contained या न्यायानें येथें metonomy हा अलंकार झाला आहे. **श्लोक ६.** रामाच्या पुरोहितानें रामाला सामोरा जाऊन आशीर्वाद दिला आहे. **समां**—वर्षें. **भावूनिया**—समजून.**सक्ष्मादेव**—ब्राह्मणांसह. **पुरोधा**—पुरोहित, कुलगुरु वशिष्ठ ऋषि. **आशीर्वादमिषें**—आशीर्वादाच्या रूपानें. अपह्नुति. **श्लोक ७. कैकेयीसुत**—भरत. राम वनवासांत असतां भरतावर राज्य सोंपविलें होतें, तरी त्याचा स्वीकार न करितां तापस वेषांतच तो नंदीग्रामीं राहिला होता. राम येतांच प्रधानांसह तो त्यांना सामोरा गेला. **प्रभूतोत्सवें**—मोठ्या उत्सवानें. **तत्प्रेमाश्रु इ०**—रामाच्या नेत्रांतील प्रेमाश्रूबिंदूंनीं. **शिरीं हुंगिला**—वडिलांनीं

धाकट्यांचें मस्तक हुंगून आपलें वात्सल्य प्रगट करण्याचा हा प्रकार आहे. तिसऱ्या व चवथ्या ओळींतील दोन कर्त्यांना 'जाला' हें एकच क्रियापद असल्यामुळें येथें क्रियादीपक अलंकार होतो. **श्लोक ८.** रामानें अयोध्येंत प्रवेश करतांच त्यानें आपल्या तिनीही आईनां नमन केलें. **सकळक्ष्मा**—सर्व राजांचा मुकुटमणि, सार्वभाम राजा. **घननाद इ०**—इंद्रजिताचा शत्रु जो लक्ष्मण त्याची आई सुमित्रा. रामानें आपल्या सख्ख्या आईस—कौसल्येसच नमन केलें नाहीं, तर सुमित्रा व कैकेयी या सावत्र आईनांही नमन केलें. यांतच त्याच्या मनाचा मोठेपणा दिसून येतो. पहा—'कैकेयीं च सुमित्रां च भरतं लक्ष्मणं तथा । शत्रुघ्नं च पुरस्कृत्य ववंदे रघुवंशजः । जैमि० २५।१०' **कांतारवास इ०**—वनवास घडविणारी. ज्या कैकेयीनें रामांना वनवास घडविला, तिलाही वंदन करून आनंदित केली. येथें सुप्रसिद्ध कारणावांचून कार्याची उत्पत्ति होत नाहीं म्हणून काव्यसंग्रहकार म्हणतात त्याप्रमाणें विभावना अलंकार होत नाहीं. तसेंच रामानें 'कांतारवासप्रदा कैकेयी प्रमोदास्पदा केली' यांत दोन वस्तूंमध्यें अदलाबदल तर नाहींच व ती कविप्रतिभानिर्मित नाहीं म्हणून येथें न्यूनपरिवृत्तीचाही भास होत नाहीं. **श्लोक ९.** रामवनवासानें व पतिमरणानें कौसल्येची अशी दुस्थिति झाली होती. तिला राम परत येऊन त्यानें दिलेल्या आलिंगनानें आनंद झाला. पहा—"कौसल्यां जननीं पश्चान्नमस्कर्तुमगाच्च सः । मलिनां पंकदिग्धांगीं रामदर्शनलालसां । भर्तृदुःखपरिक्लिन्नां हर्षितां रामदर्शनात् । जैमि० २५।११।१२.' **आश्लेष**—आलिंगन. **पूर्वीच्या परि इ०**—पूर्वी दशरथानें रामाला यौराज्याभिषेक करण्याचें ठरविलें असतां, कैकेयीनें मध्यें विघ्न आणून त्याला वनवासास पाठविलें. तशाच प्रकारचें विघ्न आणखी येईल या भीतीनें आपल्या आनंदाश्रूंनीं कौसल्येनें जणुं आज आपल्या पुत्राला राज्याभिषेकच केला होता. राज्यावर बसण्याच्या वेळचा अभिषेक तिनें आपल्या आनंदाश्रूंच्या सिंचनानेंच जणुं आटपून टाकला. 'जणु' या शब्दानें येथें उत्प्रेक्षा अलंकार साधला आहे, व याचें श्रेय मोरोपंतांनाच आहे. तथापि ती त्यांना 'अथाभिषेकं रघुवंशकेतोः प्रारब्धमानंदजलैर्जनन्योः । रघु. १४।६' यावरून सुचली असावी. मूळ जैमिनीच्या वर्णनांत ही सुंदर कल्पना नाहीं. तेथें फक्त "स्नापयंती दृगंभोभिः स्नेहेन बहुना सुतं । विशेषेण जटावंतं चिरं स्नानमवर्तयत् । जैमि. २५।१४" एवढाच उल्लेख आहे. **श्लोक १०.** रामलक्ष्मणांना आलिंगन देतांना कौसल्येची उक्ति दिली आहे. "तुझा मुलगा राम, हा अच्छेद्य व अभेद्य आहे असें वसिष्ठादि

प्रमुख ऋषि मला सांगतात, तें खोटें कसें ? कारण हे रामा ! तुझें शरीर तर प्रखर बाणांनीं जर्जर झालें आहें" असें म्हणून रामलक्ष्मणावर हात फिरवून, तिनें त्या मुलांना हृदयांशीं घट्ट धरिलें. **हा अच्छेद्य इ०**—पहा 'अच्छेद्योऽयमदाह्योयम-क्लेद्योऽशोच्य एव च'-गीता. हें आत्म्याचें वर्णन रामाला लागू करून रामाचें परात्मत्व सिद्ध केलें आहे. **अच्छेद्य**—छेदण्यास अशक्य. **अक्लेद्य**—न भिजणारा. वसिष्ठांनीं तर रामाचें अभेद्य अच्छेद्य असें वर्णन केलें होतें. पण प्रत्यक्ष पहावें तर रावणाशीं केलेल्या युद्धांत रामाला प्रखर बाणांच्या जखमा झालेल्या कौसल्येच्या हातांस लागल्या. म्हणून तिला वसिष्ठाचें म्हणणें खोटें कसें, अशी शंका आली. या श्लोकाला जैमिनीच्या श्लोकांचा आधार आहे. पहा—"ततो रामं कराग्रेण पस्पर्श जननी तथा । राक्षसास्त्रक्षतं दृष्ट्वा प्रोवाच वचनं शुभं ॥ वसिष्ठप्रमुखा रामं वदंति किमिदं वचः । अच्छेद्योऽयमभेद्योऽयमक्लेद्योऽयं सुतस्तव ॥ जैमि० २५।१५।१६." **वसिष्टमुख**—वसिष्ठ ज्यांचा प्रमुख आहे, असे. **श्लोक ११.** सीतेनें सर्व सासूंना नमन केलें. त्यावेळीं त्यानींहि तिला आलिंगन दिलें. या वर्णनास मूळ जैमिनीच्या अश्वमेधग्रंथांत आधार नाहीं. रामानंतर सीतेनेंही सर्व वडिलांना वंदन केलें असलें पाहिजे अशी कल्पना करून मोरोपंतांनीं रघुवंशांतील वर्णनावरून ती आपल्या आख्यानांत समाविष्ट केली आहे. पहा "क्लेशावहा भर्तुरलक्षणाहं सीतेति नाम स्वमुदीरयंती । स्वर्गप्रतिष्ठस्य गुरोर्महिष्या-वभक्तिभेदेन वधूर्ववन्दे ॥ रघु. १४।५. उत्तिष्ट वत्से ननु सानुजोसौ वृत्तेन भर्ता सुचिना तवैव । कृच्छ्रं महत्तीर्ण इति प्रियार्हां तामूचतुस्ते प्रियमप्यमिथ्या ॥ रघु. १४।६." **श्वश्रू**-सासू. **सुचुबुकीं**—सुंदर अशा हनुवटीस. तिसऱ्या व चवथ्या ओळींत, कौसल्या सीतेस आशीर्वाद देते. **स्वपत्या**-सुंदर आहेत अपत्यें जिचीं अशीं तूं. **पातिव्रत्य इ०**—तुझ्या पातिव्रत्याच्या बळानेंच माझा पुत्र राम ( वनवासरूपी ) दुःखसागर तरून गेला. सीतेच्या उच्च गुणांबद्दल कौसल्येला केवढा आदर होता, हें दिसून येतें. सीतादेवीच्या पातिव्रत्यामुळें राम दुःखसागर तरला या म्हणण्यांत काव्यसंग्रहकारांप्रमाणें आम्हांस तरी असंगति दिसत नाहीं. **श्लोक १२.** कौसल्या सीतेचे आणखी गुण वर्णन करीत आहे. **स्तुत्या इ०**—सीता ही सर्व पतिव्रतांमध्यें स्तुति करण्यास योग्य आहे, कारण अहल्या, द्रौपदी, सीता, तारा व मंदोदरी या पंच कन्यांतच तिचा अंतर्भाव झाला आहे. **सुरेंद्ररमणी**—अप्सरा. **स्वांगणीं**—आपल्या आंगणांत अर्थात् स्वर्गांत. स्वर्गांतदेखील सीतेचें

गुणगान चालतें असा अर्थ. कौसल्या सीतेस म्हणते :—“ तुझ्या कोपामुळेंच रावण नामशेष झाला. नाहींतर त्याला मारायला या पृथ्वीवर कोण धजला असता ? रावणहननाचें सर्व श्रेय कौसल्या आपल्या पुत्राच्या पराक्रमास देत नसून आपल्या सुनेच्या उच्च चारित्र्याच्या पुण्यास देत आहे. यांत एकप्रकारें मातृहृदयच व्यक्त झालें आहे. वात्सल्यामुळें कोणत्याही आईला आपल्या पुत्रानें केलेलें मोठें कृत्य त्याच्याकडून प्रत्यक्ष घडलें असें सहसा वाटत नसतें. तें आपल्या सुनेच्या पुण्याईनें घडलें अशीच तिची समजूत असते. **कथाशेष**—नामशेष. **श्लोक १३. स्फुरदधरमुखें**—खालचा ओठ स्फुरण पावत आहे, अशा मुखानें. आनंदामुळें कौसल्येचा खालचा ओठ स्फुरण पावत होता, व अशा मुखानेंच ती रामलक्ष्मणांचा पराक्रम वर्णन करीत होती. राम अयोध्येस परत आल्यावर वशिष्टांनीं त्यांना रीतसर राज्याभिषेक केला. **क्षितिसुरतिलकें**—ब्राह्मणश्रेष्ठानें. **संघ**—समूह. **श्लोक १४.** येथून, राम राज्यावर बसल्यावर सर्वत्र सुखसमृद्धि कशी झाली त्याचें वर्णन करतात. **अज**—जन्म-रहित असा राम परमात्मा. **बालिश इ०**—मूर्ख देखील ज्ञानसंपादनांत निमग्न झाले. **घटदोहनी**—घागरभर दूध देणाऱ्या. **बहुरसा**—विपुल आहे पाणी जिच्या ठिकाणीं अशी. **सस्यावृत्ता**—धान्यांनीं युक्त. **यूपस्तंभ इ०**—सरयू नदीचे कांठ यज्ञस्तंभांनीं युक्त दिसूं लागले. जिकडे तिकडे यज्ञयागांचा सुकाळ झाला असा अर्थ. **श्लोक १५. भूरुह**—वृक्ष. **दिव्यास्वाद इ०**—वृक्ष, दिव्य व गोड अशा फळांनीं लहडलेले दिसूं लागले. **आत्मापत्य इ०**—पृथ्वीवर कोणाही आईबापांनीं आपल्या अपत्यांचा मृत्यु पाहिला नाहीं. कोणालाही पुत्रशोक ठाऊक नव्हता; असा रामराज्याचा प्रभाव होता. **वंध्या**—वांझ. वांझेलादेखील पुष्कळ संतति प्राप्त झाली. **वर्ण**—ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र हे चार वर्ण आपापल्या धर्मांत निमग्न होते. **श्रीरामाख्य इ०**—श्रीरामाच्या चरित्ररूपी अमृताला सर्व लोक आपल्या कर्णरूपी पेल्यानें पीत होते. सर्व लोक रामाचें चरित्र सुखानें ऐकत होते. **चषक**—पेला. **श्लोक १६.** रामराज्यांत पापाला जागा नव्हती. श्रम तर नाहींच. चिंतेला तर आश्रय न मिळाल्यामुळें तीच बिचारी सचिंत झाली; मग ती दुसऱ्यांना सचिंत कशी करणार ? विघ्नाच्या वाटेंतच पुष्कळ विघ्नें येत. मग तीं आपोआपच पळून जात. भीति त्रिलोकावर रुसली होती. तिचा मागमूसही दिसत नव्हता. सारांश अयोध्येस राम राज्य करीत असतां, सर्व वर्णांचे लोक, पाप, श्रम, चिंता, विघ्नें व भीति इत्यादि उपाधींपासून सर्वथैव मुक्त

६

होते. श्लोक १४-१६ या श्लोकांतील वर्णनाला मोरोपंतांनीं जैमिनीचा थोडा आधार घेतल्याचें दिसतें. पहा—" प्रजाःस्वस्थाह्यवर्तत विप्रा वेदपरायणाः । आतृप्तेश्च पयः पीत्वा वत्सा यत्रोपरेमिरे ॥ २२ ॥ गोपाला दुदुहुस्तत्र घटोघ्नीर्गाः शुभास्तदा । फलंति सततं वृक्षा लताः पुष्पंति सर्वदा ॥ २३ ॥ ओषध्यः फलवंत्यस्ता दुष्कालादेर्विनाशकाः । सरयूतीरमासाद्य यज्ञाः कुर्वंति याजकाः ॥ २४ ॥ यूपस्तंभाः समंताच्च पशुभिरुपशोभिताः । दृश्यंते स्थाणुतां प्राप्ता अध्वरांते समुच्छ्रिताः ॥ २५ ॥" **सानुजसुहृद्**—आपल्या बंधु व मित्रांसह. **श्लोक १७. जैमिनिकृत इ०**—व्यासशिष्य जैमिनीच्या अश्वमेध या ग्रंथांतील कुशलवाख्यानाच्या २५-३६ या अध्यायांवरून पंतांनीं प्रस्तुत आख्यान रचिलें आहे. जैमिनीनें आपल्या कुशलवाख्यानाच्या पहिल्या अध्यायास ' अयोध्याप्रवेश ' असें नांव दिलें आहे.

## अध्याय दुसरा

रामांनीं हजारों वर्षें राज्य करून प्रजेला सुख दिलें. परंतु त्यांना पुष्कळ दिवस अपत्यसुख नव्हतें. शेवटीं सीतादेवी गर्भिणी झाल्यानें त्यांना आनंद झाला. त्यानंतर एके रात्रीं रामांना असें स्वप्न पडलें कीं, आपण सीतेला वनांत सोडून दिली असून ती अरण्यांत मोठ्यानें शोक करीत आहे. हें स्वप्न त्यांनीं वशिष्ठांस सांगितलें. वशिष्ठांनीं गर्भशांत्यर्थ पुंसवनक्रिया करण्यास सांगितलें. रामांनीं, जनक राजा, विश्वामित्र इत्यादींना निमंत्रण पाठवून त्यांच्या समवेत हा विधि पार पाडला. पुढें डोहाळे पुरविण्याच्या दृष्टीनें, ' तुझें इच्छित काय ? ' असें रामांनीं विचारिलें असतां ' विप्रांचे वेदघोष ऐकावे, विप्रांचे आश्रम व ऋषींच्या निर्लोभ व कुलीन बायका पहाव्या, गंगेचें अवलोकन करावें ' असे आपणास डोहाळे लागल्याचें तिनें सांगितलें. त्याच रात्रीं एका गुप्त हेरानें अयोध्येंतील एका दुष्ट परटाचे रामाबद्दलचे निंद्य उद्गार कथन केले. स्थिति अशी होती कीं, या परटाची बायको त्याच्याशीं भांडून बापाच्या घरीं गेली होती. बापानें तिला पुनः नवऱ्याकडे आणली. पण हा परीट तिला घरीं घेण्यास तयार होईना, इतकेंच नव्हे तर तो असें म्हणाला होता, "रावणाच्या घरांतून परत आलेल्या सीतेला पुनः नांदविणारा मी राम नव्हे. राजा म्हणून त्याला तें शोभलें, मी तसें करणार नाहीं." परटाच्या या अपवादानें राम काळजींत पडले, व सीतेला टाकावी किंवा कसें, याबद्दल विचार करूं लागले. पण सीतेला

टाकणेंच युक्त आहे असा शेवटीं त्यांनीं निश्चय केला, व ते अतिशय दुःखित झाले. रामाच्या दुःखाचें कारण न समजल्यामुळें भरत, लक्ष्मण व शत्रुघ्न हेही दुःखित होऊन बुचकळ्यांत पडले. या अध्यायांत साधारणतः इतका कथाभाग आला आहे. **श्लोक १. नवसहस्र इ०**—रामानें रावणवधानंतर नऊ हजार वर्षें सुखानें राज्य केलें. जैमिनीअश्वमेधांत हा काल दहा हजार वर्षांचा दिला आहे. पहा "दशवर्ष सहस्राणि राज्यं चक्रे स राघवः।" २६।१. "**रघुवरासि इ०**—इतक्या दीर्घ कालावधींत रामाला अपत्य झालें नाहीं, हें खरोखर मोठें आश्चर्य आहे. रामाला त्याची प्रजा वश होती, पण त्याच्या पोटीं संतान नव्हतें. **श्लोक २. रामा**—स्त्री. **पांडुवक्त्राभिराम**-गरोदरपणांतील फिकट वदनामुळें सुंदर दिसणारी. पहा-" अथाधिकस्निग्धविलोचनेन मुखेन सीता शरपांडुरेण। आनंदयित्री परिणेतुरासीदनक्षरव्यञ्जित दौहृदेन॥" रघु. १४।२६. **स्वसुतवदन इ०**-पुत्रमुख पाहण्याची फार उत्कंठा रामाला लागली. **केली**-क्रीडा. पहा 'रेमे विदेहाधिपतेर्दुहित्रा।' रघु. १४।२४. **श्लोक ३.** सीतेला पांच महिने लोटले असतां रामाला **स्वप्न** पडलें. पहा-" प्राप्ते तु पंचमे मासे रामः स्वप्ने ददर्श सः।"। जैमि. २६।४. **गुरूपाशीं**—वशिष्ठास. **श्लोक ४.** रामाला पडलेलें **स्वप्न. देवरानें**—दिरानें, लक्ष्मणानें. लक्ष्मणानें सीतेला वनांत नेऊन सोडली असें स्वप्न रामांना पडलें. **मूर्धजांचा कलाप**—केशकलाप, केशसंभार. **परिपरी**—परोपरीनें, अनेक तऱ्हांनीं. मोरोपंतांनीं जैमिनाच्या ज्या श्लोकांच्या आधारें प्रस्तुत श्लोक रचिला तो. पहा-'सीतां भागीरथीतीरे विलपंतीमनाथवत्। लक्ष्मणेन परित्यक्तामित्यहो विस्मयान्वितः। जैमि. २६।४।५. **श्लोक ५.** राम वशिष्ठास सांगतात. **स्वामी**-हे वशिष्ठ गुरुजी! **श्लोक ६. शिष्यहृत्तम**-शिष्याच्या अंतःकरणांतील अंधकार, अज्ञान. वशिष्ठ हे रामाचे कुलगुरु असल्यामुळें, आपल्या यजमानास योग्य तो सल्ला देण्याचा त्यांचा अधिकार होता. शिवाय आपल्या शिष्याचें अज्ञान घालविण्याचीही त्यांना शक्ति होती. **श्लोक ७.** वशिष्ठ ऋषि रामाला सीतेच्या गर्भशांत्यर्थ पुंसवन क्रिया करण्यास सांगतात. मूळ जैमिनीच्या ग्रंथांत रामच 'मला पुंसवन क्रिया करण्यास आज्ञा दे' असें वशिष्ठास म्हणतात, व त्यावरून तशी आज्ञा वशिष्ठ देतात. मोरोपंतांनीं येथें थोडा फेरफार करून वशिष्ठाकडूनच 'पुंसवनक्रियेची सूचना रामाला दिली आहे. पहा-राम उवाच. 'स्वने पश्यामि रुदतीं सीतां भागीरथे तटे। तद्गर्भविघ्नशांत्यर्थं तस्याः पुंसवनक्रिया॥६॥

शीघ्रमादिश्यतां ब्रह्मन्पुन्नक्षत्रे दिने शुभे । तस्यतद्वचनं श्रुत्वा वशिष्ठो मुनिपुंगवः ॥ ७ ॥ जैमि. २६. **जलदश्यामा**–घननीळ. **देवर्षिनिकरप्रिया**–देव व ऋषि यांच्या समूहास प्रिय असणाऱ्या. **पुंसवन**–आपल्या पत्नीस पुत्रच व्हावा यासाठीं गरोदर पत्नीस करण्यांत येणारा एक संस्कार. **श्लोक ८.** वशिष्ठ सांगतात. 'कृष्णपक्ष सरतांच विप्रांना संतुष्ट करावें.' पहा–" कर्तव्या शुक्लपक्षे तु कृष्णपक्षे व्यपोहतु । पुष्यार्के योगे पंचम्यां कार्यं पुंसवनं विभो ॥ ८ ॥ मुहूर्तस्य दिनं यावदागमिष्यति राघव । तावद्राम महाबाहो क्रियतां विप्रतर्पणम् ॥ ९ ॥ जैमि० २६. **इहामुत्र**–इहलोकीं व परलोकीं. **द्विजार्पण**–ब्राम्हणाला केलेलें दान. **श्लोक ९.** राम वशिष्ठाची आज्ञा मान्य करतो. **नृपति**–राम. **कुशासनातें**–दर्भाचें आसन आहे ज्याचे अशा वशिष्ठास. **शासन**–आज्ञा. **हरिजिदरिप्रति**–इंद्रजिताच्या शत्रूस, लक्ष्मणास. **हरिसैन्यराजराजा**–वानर सेनेचा राजा जो सुग्रीव त्याचा राजा असा राम. रामानें लक्ष्मणास जनकराजाकडे जाण्यास सांगितलें. पहा–" तावत्त्वं गच्छ भद्रं ते जनकंच समानय ।' जैमि० २६।११. **श्लोक १०.** जनकराजाला असें सांग कीं, दशरथाचा पुत्र राम, तुझ्या दर्शनाची इच्छा करीत आहे. **अजसूनुनंदन**–अज राजाचा पुत्र दशरथ, त्याचा पुत्र राम त्यास. **श्लोक ११.** राम, विश्वामित्रांना आणण्याबद्दल लक्ष्मणास आज्ञा करतात. पुंसवनाच्या वेळीं आपला श्वशुर जो जनक व ऋषिवर्य विश्वामित्र यांना रामानें आमंत्रण दिलें आहे. पहा–" विश्वामित्रं मुनिश्रेष्ठं मुनिभिः परिवारितम् ।" जैमि० २६।११. **कुशिकतनय**–विश्वामित्र. **महातपःसमुद्र**–मोठ्या तपाचा सागर अशा विश्वामित्रास. **श्लोक १२.** रामाची आज्ञा मान्य करून लक्ष्मणानें जनक व विश्वामित्र यांना आणलें. **दशवदनेभसिंहवाणी**–रावणरूपी गजाला सिंहाप्रमाणें असणारा जो राम त्याची वाणी, आज्ञा. **बद्धपाणी**–बद्धांजली. **श्लोक १३. सुरवंद्यविग्रहातें**—देवांनाही वंद्य आहे शरीर ज्याचें अशा रामास. विश्वामित्र जनकासह अयोध्येस येत आहे, अशी लक्ष्मणानें रामास वर्दी दिली. पहा—" तावत्स लक्ष्मणस्तूर्णं विश्वामित्रं महामुनिं । जनकं च समाहूय रामं नत्वेदमब्रवीत् ॥ १६ ॥" लक्ष्मण उवाच. "आगतो जनको राम विश्वामित्रो महातपः । अर्घ्यादि क्रियया भ्रातः पूजयैतौ समागतौ ॥ १७ ॥" जैमि० २६. **श्लोक १४.** लक्ष्मणाचें म्हणणें मान्य करून राम त्यांना सामोरा गेला. घनाला मोर जसा सामोरा जातो तसा राम त्यांना सामोरा गेला. ही वाक्योपमा असून यांतील कल्पना मोरोपंतांची फार आवडती आहे. कारण त्यांत

त्यांना स्वतःच्या नांवाचाही निर्देश करतां आला आहे. **अनुजवाक्य**–लक्ष्मणाचें बोलणें. **त्रिजगन्मनोभिराम**–तिन्ही लोकांनाही आनंद देणारा. **श्लोक १५.** रामानें विश्वामित्राचें पूजन करून त्याचा प्रवासाचा शीण घालविला. **पथश्रम**—वाटेचा प्रवासाचा शीण. **पुण्यसग्रहातें**—पुण्याचा संचय अशा विश्वामित्रास. **निजाश्रमाला**—आपल्या आश्रमाला. रामानें आपल्या आश्रमाला विश्वामित्रास आणलें, म्हणजे राजवाड्यांतच आणलें. **श्लोक १६.** रामानें वसिष्ठप्रभृति ब्राह्मण विश्वामित्रादि शिष्ट, महर्षिसत्तम व आप्त यांना सुखी करून पुंसवन क्रिया संपविली. **श्लोक १७.** राम व सीता यांचा एकांत वर्णिला आहे. **गंधाढ्य**—सुवासानें दरवळलेल्या. **दिव्यकेली-गृहांतरी**—उत्तम अशा रंगमहालांत. **मधूत्तरीं**—गोड भाषणांनीं. सीतेला गोड अशा भाषणांनीं आनंदित करून. **श्लोक १८.** राम सीतेला तिचे डोहाळे विचारतात. **लंकावरकाल**–लंकाधिपति रावणाला मारणारा. पहा. "अयोध्यायां दाशरथिः शयानः किल सीतया । एकदा रात्रिसमये हृष्टः सीतां वचोऽब्रवीत् ॥" जैमि. २६।२८. "तामंकमारोप्य कृशांगयष्टिं वर्णांतराक्रांतपयोधराग्राम् । विलज्जमानां रहसि प्रतीतः प्रप्रच्छ रामं रमणोऽभिलाषम् ।" रघु. १४।२७. **श्लोक १९. प्रजाफलोद्भवे इ०**—प्रजारूपीं, अपत्यरूपी फल देणारी लता. कोणते डोहाळे लागले आहेत तें भीड न धरतां सांग असें राम म्हणतात. **तुला इ०**–ही ओळ, "अध्यमासित्रयमेव भूपतेः शशिप्रभं छत्रमुभेच चामरे।" रघु. ३. याचा अनुवाद दिसतो. सीतेला न देण्यासारखी वस्तु सर्व राज्यांत नाहीं. ती मागेल तें मिळेल, असा रामाचा आशय आहे. **श्लोक २०. रमणीयवपुर्धरा**–सुंदर शरीर धारण करणारी. **धराकन्या**–पृथ्वीची कन्या, सीता. **कंबुकंधरा**–शंखाप्रमाणें सुंदर गळा आहे जिचा अशी. **श्लोक २१.** सीता आपले डोहाळे सांगते. हे तिच्या पुढील वनवासाचे सूचकच आहेत. **ऐकावे इ०**–सर्व संसाराच्या श्रमांचा परिहार करणारे, मुनींच्या वदनांतून निघणाऱ्या वेदांचे सुंदर घोष ऐकावे. **सद्ध्वान**–चांगले घोष. **मृगकुलसंकुल**–हरिणांच्या कळपांनीं युक्त अशा. **श्लोक २२.** सीता आणखी आपले डोहाळे सांगते. **निजहृदयेशभक्ति लीन**–आपल्या पतिभक्तिमध्यें गढून गेलेल्या. **नीवार**–गवत. **च्छद**–पानें. **कंद**–गड्डे. **मूळें**–झाडाचीं मुळें. **प्रमुदित इ०**–ज्या स्त्रिया समाधीमुळें किंवा समाधिसुखांत निमग्न आहेत. पहा–"तवप्रसादान्मे कामः परिपूर्णः सदानघ । परं भागीरथीतीरे गंतुमिच्छामि राघव ॥ ३० ॥ ऋषिपत्न्यश्चा यत्रासन्नृषयोऽजिनवाससः ॥ ३१ ॥" जैमि. २६. **श्लोक २३.** सीतेला गंगातटाकीं

जाण्याची इच्छा होते. **सुरतटिनी**–गंगा. **लसत्तरंगा**–नाचणाऱ्या लाटा आहेत अशी. **पापौघश्रमशमनी**–पापांना व श्रमांना घालविणारी. **शिवांतरंगा**–जिचें अंतरंग कल्याणप्रद आहे अशी. जिच्या पाण्यांत बुडी मारली असतां कल्याण प्राप्त होतें. **जे वाहे** इ०–जिच्या पात्रांत पाण्याच्या रूपानें सर्व अमृतच वाहत आहे. 'प्रकृतं प्रतिषिध्य अन्यत्स्थापनं सा अपह्नुतिः।' **आलोके** इ०–जी आपल्या दर्शनानें प्राण्याला जन्ममृत्यूच्या फेऱ्यांतून सोडविते. या श्लोकांत गंगेचें उत्तम गुणवर्णन केलें आहे. श्लोक २१–२३ यांतील सीतेचे डोहाळे रघुवंशांतील, "सा दष्टनीवारबलीनि हिंस्रैः संबद्धवैखानसकन्यकानि। इयेष भूयः कुशवंति गंतु भागीरथीतीरतयोवनानि" रघु. १४।२८. **श्लोक २४.** डोहाळे ऐकून रामाचे विचार यांत प्रदर्शित केले आहेत. **जनकनृवर** इ०–जनकराजाच्या मुलीचा, सीतेचा. **करुनि सरस हास्य**–सीतेनें पूर्वी दंडकारण्यांत दीर्घ काल वास केला तरीही वनवासाची तिची इच्छा अजून तृप्त झाली नाहीं याबद्दल रामाला हांसे आलें. पहा–"जहास रामः किमिदं न तृप्ता वनवासतः ॥ ३१ ॥ सीते त्वं दंडकारण्ये वर्षाणि नव पंचच। अद्य वा दोहदस्तेयं प्रथमो निष्फलः कथम् ॥ ३२ ॥" जैमि० २६. **शर्मसंदोहद**–सुखांचा समूह देणारा. **उदधिउडुपहायनें**–चवदा वर्षे. आंकडे सांगतांना त्या त्या संख्येनें युक्त अशा वस्तूच निर्दिष्ट करण्याचा संस्कृतचा प्रघात आहे, तो येथें अवलंबिला आहे. उदधि ४ आहेत. उडुप–चंद्र १ आहे. आतां 'अंकानां वामतो गतिः' या न्यायानें एक चंद्र व चार उदधि म्हणजे १४ हा आंकडा, मांडणीनें सिद्ध होतो. **हायन**–वर्ष. **दंडक**–दंडकारण्य. **ओळ ४. दंडक**–रीत, पद्धत. येथें 'दंडक' शब्द घालून वृत्ताचेंही नांव कौशल्यानें सुचविलें आहे. **श्लोक २५.** राम सीतेचे डोहाळे पुरविण्याच्या दृष्टीनें म्हणतो. **वरारोहे**–उत्तम आहे आरोह–कटिपश्चाद्भाग जिचा अशी. **शांतसत्व** इ०–सौम्य अशा प्राण्यांच्या समूहांनीं युक्त अशीं गंगातीरतपोवनें. पहा–"प्रातर्भागीरथीतीरे गमनं तेऽस्तु जानकि॥" जैमि० २६।३३. **श्लोक २६. रघुवंशावतंस**–रघुकुलाचें शिरोभूषण. **जडितमंचीं**–रत्नजडित अशा पलंगावर. **स्वजनरक्षार्थ** इ०–जो आपल्या लोकांचें रक्षण करण्यास नेहमीं तयार आहे. **निद्रा तदा** इ०–राम पलंगावर पडल्यावर त्याच्या शरीरांत निद्रेनें प्रवेश केला व दोन प्रहरानंतर ती त्यांना आपणच सोडून गेली. म्हणजे रामांना दोन प्रहर निद्रा लागली, असा अर्थ. येथें निद्रेवर सचेनत्वाचा आरोप केला आहे. राज्याच्या काळजीमुळें, राम फार थोडी झोंप घेत असें दिसतें. पहा "इति तस्यै प्रतिश्रुत्य सुष्वाप ससुखं प्रभुः" जैमि० २६।३३.

**श्लोक २७.** दोन प्रहर झोंप घेतल्यानंतर गुप्त हेरांकडून गांवांतील वार्ता ऐकण्याचा रामांचा परिपाठ होता. " चारैः पश्यंति राजानः " हा न्याय सर्व राजांना लागूच आहे. **चार**–गुप्त हेर. **श्रीअयोध्या इ०**—अयोध्येच्या राजास. **मरणजन्म इ०**—जन्ममरणांचा फेरा तोडणारा. **भूसुताप**–सीतेचा पति. या श्लोकाला आधार पहा–" निशीथे तु व्यतिक्रांते चाराः पुरचरा निशि । रामं रहः समागम्य वाक्यमूचुः पृथक् पृथक् ॥ ३४ ॥ तव कीर्तिः प्रतापश्च सर्वतो वर्ण्यते जनैः । रामः पृच्छत्यतिदृढं लोकानां कीदृशी स्थितिः ॥ ३५ ॥"–जैमि० २६. **श्लोक २८. लोकश्रुति**—जनवार्ता. **वशी**–आत्मसंयमी. **मर्त्यदेव**–मानवांचा देव–राजा. **श्लोक २९.** आपल्या घरांतील कोणाकडूनही घडलेलें वाईट कृत्य जें प्रजेकडून कळलें असेल तें सांगण्याबद्दल राम हेरास अभयपूर्वक सांगतात. पहा–" मम वा मम भार्याया भ्रातृणां दुष्कृतं किल । सुकृतं वा त्वया चार भ्रमता निशि यत्शृतम् ॥ ३६ ॥ तत्सत्यं वद चार त्वं मा भीतिं कुरु दंडतः ॥ " जैमि० २६. **श्लोक ३२.** रामानें अभय दिल्यावर गुप्त रीतीनें ऐकलेली बातमी, हेर रामास सांगतो. **खळरजकाची**—दुष्ट अशा परटाची. या दुष्ट परटाची बायको एकदां भांडून नवऱ्याला न विचारतांच बापाच्या घरीं पळून गेली. **पितृक्षय**–बापाचें घर. **श्लोक ३३.** आपली मुलगी नवऱ्याला न विचारतां आपल्या घराला आली हें अनुचित, असें समजून त्या मुलीच्या बापानें तिला पुनः तिच्या नवऱ्याच्या घरास परत पोंचती केली. मोरोपंतांनीं हें व पुढील वर्णन जैमिनी अश्वमेधाच्या २६ अध्यायांतील श्लोक ४१–४९ या आधारें रचिलें आहे. **श्लोक ३४.** पुष्कळ सांत्वन करूनही आपल्या बायकोच्या अपराधाबद्दल त्या परटाचा राग शांत झाला नाहीं. **रोषारुणदृक्**—रागानें लाल झाली आहे दृष्टि ज्याची. **दष्टाधर**—रागानें चावला आहे खालचा ओंठ ज्यानें तो. पहा–" तप्तः क्रुद्धोऽब्रवीद्वाक्यं सृक्किणी परिलेलिहन् " जैमि० २६।४५. **श्लोक ३५.** परटाचे रागाचे उद्गार येथें दिले आहेत. " रावणाच्या घरीं राहिलेली आपली बायको पुनः आपल्या घरीं नांदविणारा मी राम काय ? " असें तो परीट हात उभारून मोठ्यानें म्हणूं लागला. वास्तविक या परटाची बायको आपल्या बापाच्या घरीं गेली होती. माहेरी जाण्यांत तिचा कांहींच अपराध नव्हता. पण ती नवऱ्याला न सांगतां गेली होती इतकेंच. परटानें या तिच्या अपराधाचा केवढा बाऊ केला आहे, व त्याचा परिणाम किती दूरवर गेला आहे पहा–" जामाता हस्तमुद्यम्य रामोहमिति वो मतिः '

जैमि० २६।४६. **श्लोक ३६.** तो परीट पुढें म्हणाला–"राम राजा आहे म्हणून त्याचें खपून गेलें. मी तसें चालूं देणार नाहीं" हें भाषण तो परीट आपल्या मित्रपरिवारांत बोलत असतां आपण ऐकलें असें तो हेर सांगत आहे. **श्लोक ३७.** तो हेर रामांना सांत्वनपर बोलत आहे. "स्वर्गंगेच्या पाण्यांत चिखल जसा कधीं ऐकलाच नाहीं, तद्वत् तीन लोकांना गाण्यास योग्य असें चरित्र असणाऱ्या तुला, पाप कोठलें?" **श्लोक ३८.** तो गुप्त हेर पुढें म्हणतो, "तुझें नांव एकदां उच्चारतांच महापापी देखील पापांचा समुद्र तरून जातो. प्रत्यक्ष शंकरदेखील तुझें गुणरूपी अमृत पितात, मग इतर कोण बरें पिणार नाहीं?" शंकर राम-नामाचा जप करतात अशी आख्यायिका आहे. पहा–"निशीदिनि शितिकंठा हा जपाचाच धंदा–" सामराज-रुक्मिणीहरण. **श्लोक ३९.** रामा! तूं वनवास स्वीकारून वडिलांची आज्ञा पाळलीस, रावणाला मारून देव व ब्राह्मण संतोषित केलेस व आपल्या गुणरूपी मोत्याच्या कंठ्यानें स्वर्गीय स्त्रीयांचे सुंदर कंठही भूषविलेस. स्वर्गीय स्त्रियादेखील तुझें गुणगान करूं लागल्या असा अर्थ. पहा– "गंगा तटद्वीप निखातयूपः स्वधर्मनिष्ठः पितृवाक्यकर्ता। जेता दशास्यस्यजगच्छरण्यः स राघवः केन समोस्ति लोके॥" जैमि० २६।४९. **श्लोक ४०.** इतकें करूनही लोकांचें निवारण करणें कठीण आहे. लोकांच्या तोंडाला हात लावतां येत नाहीं. तो दारू पिऊन मत्त झालेला परीट वाटेल तें बोलत आहे. **सकलकलुष** इ०–सर्व पापरूपी अंधकाराचा रवि असा तूं रामा! **प्रामाण्यचि** इ०–'तसे हेही बोल प्रामाण्यचि युक्तचि'–असा अन्वय. "तो परीट दारू पिऊन तोंडाला येईल तें बरळत आहे. मग त्यानें तुझ्यासंबंधानें काढलेले अपवादाचे शब्द तितकेच प्रमाण किंवा युक्त असणार!" त्या परटाच्या बोलण्याकडे लक्ष देण्यांत अर्थ नाहीं, असें हेर रामाला विनवीत आहे. **श्लोक ४१.** लोकापवादानें चलबिचल झालेला राम मनांत विचार करूं लागला. **श्लोक ४२.** "वनवासानंतर सीतेची अग्नीच्या द्वारा शुद्धि केली, तरीदेखील लोक निंदा करतातच. अशा स्थितींत शुद्धचरित अशा सीतेस टाकावी किंवा कसें असा रामाला प्रश्न पडला. पहा– "शुद्धापि जानकी वन्हौ लोकेस्मिन्परिगर्ह्यते। तस्मात्त्यजेयं नोवेति चिरं दध्यौ स जानकीम्॥" जैमि. २६।५२. रघुवंशांतही–'किमात्मनिर्वादकथामुपेक्षे जायामदोषायुत संत्यजानि। इत्येकपक्षाश्रयविक्लवत्वा दासीत्सदोलाचलचित्तवृत्तिः'। रघु. १४।३४. अशीच रामाच्या मनाची स्थिति वर्णन केली आहे. **श्लोक ४३.** ही सीता कशी टाकावी? एकाद्या श्रोत्रिय-

प्रमुखानें आपला आचार टाकणें जसें योग्य नाहीं तद्वतच, मी सीता टाकणें योग्य नाहीं. या श्लोकाच्या दुसऱ्या ओळींतील कल्पना जैमिनीचीच आहे. पहा–"कथं तां मृगशावाक्षीं सीतां पद्मनिभाननां । त्यजामि श्रोत्रियोमुख्यामाचारस्येव पद्धतिम् ॥" जैमि० २६। ५३. यांत वाक्योपमा अलंकार होतो. **श्लोक ४४.** सीतेचा त्याग करण्याचा राम शेवटीं निश्चय करतात. **विप्र जसे इ०**–कलियुगांतील ब्राह्मण ज्याप्रमाणें वेदांना टाकतात, त्याप्रमाणें मीही सीतेला टाकीन. एकाद्या खोचदार उपमेनें समाजावर टीका करण्याची मोरोपंतांची पद्धति आहे. येथें कलियुगांतील वेदबाह्य ब्राह्मणावर टीका केली आहे. **श्लोक ४५.** सीतेला टाकण्याचा निश्चय करतांना रामाच्या मनाची व्याकुल स्थिति वर्णन केली आहे. **जलजलसद्रम्यमुखी**–कमळाप्रमाणें सुंदर मुख आहे अशी. **नवनवनीतापरीस**–ताज्या लोण्याप्रमाणें मृदु अंग आहे जिचें. हे–ही सीता. **मजविण इ०**–"या भित्र्या सीतेला आज माझ्या शिवाय वनवासदु:ख भोगण्याचा प्रसंग प्राप्त झाला आहे." पूर्वीं वनवासांत सीतेबरोबर रामही होता. त्यावेळीं तें दु:ख सुसह्य झालें. आतां एकट्या सीतेचें कसें होणार ! दुसऱ्या ओळींत 'साहे' असा मूळचा पाठ असावा असें काव्यसंग्रहकार म्हणतात. पण 'साहे' या पाठानें यमक साधत नाहीं. म्हणून तो मूळपाठ नसावा असें वाटतें. **श्लोक ४६–४७.** रामाची मन:स्थिति. **उपांशु**–हळुच. **श्लोक ४८.** वशिष्ठांनीं सांगितल्याप्रमाणें दानं देण्यांत शत्रुघ्नादि रामाचे बंधु गुंतले होते. त्यांना रामाची ही मध्यंतरी घडलेली मनाची दु:खी परिस्थिति ठाऊक नव्हती. दानें देऊन परत येण्यास आपणास उशीर झाला म्हणून राम आपणावर रागावले असावे, असेंच त्यांना विमनस्क रामांना पाहून वाटलें. कदाचित् आपण सांगितलेलीं दानें ब्राम्हणांना दिलींच गेलीं नाहींत, असें रामांना वाटलें काय ? अशीही शंका त्यांना आल्यावांचून राहिली नाहीं. **क्रियावितंद्र**–कर्तव्य करण्यांत आळस नाहीं, अशा रामास. **श्लोक ४९.** शत्रुघ्नादि बंधु रामाला म्हणतात. **पवित्रवृत्तातें**–पवित्र आहे चरित्र ज्याचें अशा रामास. **त्वत्पदस्थचित्तातें**–तुझ्या पायांच्या ठिकाणीं लागलेलें आहे मन ज्यांचें अशा आम्हांस, आमच्याशीं भाषण करून आम्हांस कां आनंदवीत नाहींस ? **श्लोक ५०. भक्तमयूरेश्वर इ०**–रामाचा भक्त जो मोरोपंत त्याच्या काव्याच्या व मनाच्या क्रीडागृहास, रामास. मोरोपंत हे रामभक्त असल्यामुळें त्यांचें काव्य व मन हें रामाच्या ठिकाणींच रममाण होणार. त्याच्या काव्याला व मनाला रामाशिवाय दुसरें क्रीडागृह नव्हतेंच. या अध्यायास जैमिनीनें रामवाक्य असें नांव दिलें आहे.

---

## अध्याय तिसरा

सीतेच्या त्यागाचा आपला निश्चय रामानें आपल्या तिघांही बंधूंना कळविला. त्यांना पराकाष्टेचें दुःख झालें. आपल्या निश्चयापासून रामानें परावृत्त व्हावें, म्हणून भरतानें पुष्कळ युक्तिवाद केला. पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. लक्ष्मणाला तर रामाचा निश्चय ऐकून क्रोध अनावर झाला. शत्रुघ्नानेंही रामाला पुष्कळ विनविलें. तथापि "अपवादभयास्तव मी प्राणार्पण करण्यास तयार आहें तेथें सीतेची काय कथा ?" असे निर्वाणीचे उद्गार रामांनीं काढल्यामुळें, सर्वांचा नाइलाज झाला. रामही दुःखव्याकुल झाले होते. शेवटीं सीतेला भागीरथीच्या तीरीं नेऊन सोडण्यास त्यांनीं लक्ष्मणास आज्ञा केली. लक्ष्मण, रथ सज्ज करून सीतेच्या मंदिरास गेला. आपल्या पतीनें आपले डोहाळे पुरविण्यासाठींच आपणास भागीरथीतीरास नेण्याची योजना केली, असें प्रामाणिकपणें वाटून सीतेनें जाण्याची सिद्धता केली. तिनें सर्वांचा निरोप घेतला व तिघींही सासूंच्या आशीर्वादासह तिनें वनाकडे प्रयाण केलें. सीता लक्ष्मणाबरोबर वनाप्रत गेली, म्हणून जैमिनीनें या अध्यायास 'लक्ष्मणप्रस्थान' असें नांव ठेविलें आहे. **श्लोक १**–**स्वचारें**–आपल्या गुप्त हेरानें. **चरणरजें इ०**-आपल्या पायाच्या धूळीनें पापांचा नाश करणारा राम आपल्या तिघांही बंधूंना आपला सीतात्यागाचा निश्चय सांगता झाला. **श्लोक २.** ज्याप्रमाणें नास्तिक व पापाचें केवळ माहेरघर असा मनुष्य वेदांची निंदा करतो, तद्वत् रावणानें धरलेल्या सीतेची लोक निंदा करीत आहेत. पहा–'सीता च गर्ह्यते लोकैर्यथा पाखंडिभिः श्रुतिः ।।' जैमि. २७।१. मोरोपंत येथें व पुढील श्लोकांत जैमिनीचा केवळ अनुवाद करीत आहेत. **श्लोक ३.** या श्लोकांत वाक्योपमा अलंकार साधला आहे. पहा– "लोकापवादभीतेन त्यज्यते जानकी मया । संसारभयभीतेन योगिना ममता यथा ।।" जैमि. २७।२. **श्लोक ४.** बंधूंना वाटलेलें दुःख वर्णन करतात. पहा– "भ्रातरस्ते त्रयो भूवन् रोमांचित वपुर्धराः ।।" जैमि. २७।३. **श्लोक ५.** भरताचें दुःख. **शोकपाणी**—शोकामुळें डोळ्यांतील अश्रू. **पाणी**–हात. **दीनवाणी**–दीन आहे वाणी म्हणजे शब्द ज्याचा असा भरत. **वाणी**–वर्णन करी. काव्यसंग्रहकारांच्या पाठाप्रमाणें 'दीन वाणी' असे पृथक् शब्द घ्यावे लागून वाणी–वर्णी असा थोडा चमत्कारिक वाक्यप्रयोग करावा लागतो. त्यापेक्षां दीनवाणा झालेला भरत खालीलप्रमाणें म्हणजे श्लोक सहामध्यें दिलेलें भाषण वर्णू लागला, बोलूं लागला, हें जास्त सयुक्तिक दिसतें. येथें पाणी–पाणी, वाणी-वाणी, यांत श्लेष व दामयमकें साधलीं आहेत. **श्लोक ६.** भरताचें भाषण. 'केवळ

एक गाय कांहीं दिवस अंत्यजाच्या घरीं होती म्हणून तिचा कोणी त्याग करील काय? तद्वतच सीता, कांहीं दिवस रावणाच्या घरीं होती म्हणून तिचा त्याग करणें उचित होणार नाहीं,' असा भरताच्या म्हणण्याचा रोख. ही कल्पनादेखील जैमिनीचीच आहे. पहा–" अंत्यजेभ्यो बलात्कश्चित्कपिलां गां समानयेत्। पश्चात्संसर्गदुष्टत्वात्यजेतां विपिने तु कः॥" जैमि० २७।५. **श्लोक ७.** "सीतेनें अग्निदिव्य करून आपली शुद्धी करून घेतली, त्याची तुला आठवण नाहीं काय?" असें भरत रामाला विचारतो. अग्निदिव्य करून आपण शुद्ध आहों असें सीतेनें एकदां सिद्ध केल्यावर केवळ लोक बडबडतात त्याकडे लक्ष देऊन तिला पुनः वनवासाचें दिव्य करावयास लावण्याचें कांहींच कारण नव्हतें, असा भरताचा अभिप्राय. **श्लोक ८.** ही दशरथाची उक्ति आहे. तिचें स्मरण भरत रामाला करून देत आहे. आपली सून जी सीता तिच्या शुद्ध चारित्र्यामुळेंच आपणास देवलोक प्राप्त झाला आहे, असें दशरथाचें म्हणणें. **श्लोक ९.** भरत रामास म्हणतो कीं, वरील उक्ति आपला पिता दशरथ विमानस्थ असतां बोलला, तिचें स्मरण करावें. सीतेच्या शुद्ध चारित्र्याची साक्ष स्वर्गस्थ दशरथही देतो, मग तिला वनवासास पाठविण्याचें प्रयोजन काय? **ज्ञानिलोक इ०**–ज्ञानीलोकांचें हृदय हेंच सदन ज्याचें. ज्ञानी लोकांच्या हृदयांत रहाणाऱ्या तूं. **श्लोक १०. पूर्वी**–लंकेच्या समरभूमीवर रावणाशीं युद्ध करीत असतां स्वर्गस्थ दशरथानें रामाला दर्शन दिलें, व तो आणि देवसमूह जें बोलला त्याचें स्मरण करण्यास भरत रामास सांगत आहे. **श्लोक १२. अश्रुजलभ्रष्ट इ०**—अश्रुजलानें धुऊन गेलें आहे, हृदयाला लावलेलें चंदन ज्याच्या. भरताच्या अश्रूंची परमावधि झाली. **श्लोक १२.** राम भाषण करतात. त्यांना लोकापवादाची मातब्बरी विशेष वाटते. **ज्याच्या इ०**–ज्याची कीर्ति शाबूद आहे. त्याला यमदेखील मारावयास समर्थ नाहीं. **कीनाश**–यम. **श्लोक १३.** कीर्तिरूपानें जिवंत असणाऱ्या राजांचीं नांवें राम सांगतात. **वैन्य**–वेनराजाचा मुलगा. **ओळ २.** बंधु, पत्नी व पुत्र यांच्यामुळें ज्यांची कीर्ति नाश पावते, अशा लोकांचा स्वप्नांत देखील संसर्ग नको. रामांना पत्नीमुळें लोकापवाद आल्यामुळें, ती अपकीर्ति त्यांच्या मनास फार लागली आहे. **श्लोक १४.** राम आणखी कांहीं यशोधन राजांचीं उदाहरणें सांगतात. **कित्येकांही**–कित्येकांनीं आपल्या शरीरदानानें आपलें यश रक्षिलें. शिबि राजानें आपल्या शरीराचें मांस श्येनास देऊन आपली कीर्ति राखली, हें प्रसिद्ध आहे. **कीर्तिशोधन**—राम म्हणतात कीं, "सीतात्याग करून

मी माझ्या कीर्तीची शुद्धि करतों. माझ्या कीर्तीला लोकापवादाचा कलंक लागला आहे. तो मी पत्नीत्यागानें शुद्ध करतों." **श्लोक १५.** रामानें आपल्या निश्चयापासून परावृत्त व्हावें म्हणून भारतानें बरीच गळ घातली म्हणून त्याला राम निक्षून सांगतात. **श्लोक १६.** लक्ष्मण देखील आपल्याकडून सांगून पाहतो. **विकलुषा**—निष्पाप. म्लेंच्छांनीं वेदांची निंदा केली म्हणून ब्राह्मण त्यांना टाकणार नाहींत. तद्वतच सीतेबद्दल लोक निंदायुक्त बोलले म्हणून आपण तिचा त्याग करणें युक्त नव्हे, असा लक्ष्मणाचा आशय. **शास्त्रनेत्रें**—शास्त्ररूपी डोळ्यांनीं. राम हा शास्त्रसंपन्न असल्यामुळें त्याला इतरांहून निराळ्या दृष्टीनें पाहण्याचें सामर्थ्य आहे. येथें 'क्रोधतप्त' हें विशेषण सौमित्रीलाच लावलें पाहिजे. कारण जैमिनीच्या ग्रंथांत या प्रसंगीं क्रुद्ध लक्ष्मणाचेंच वर्णन आहे. पहा—"तावत्स लक्ष्मणः क्रुद्धो धुन्वन्हस्तावथाब्रवीत् । निष्पिष्य पाणिना पाणिं निश्वसन्नुरगो यथा ॥" जैमि० २७।२६,२७. **श्लोक १७.** **स्त्रीकलहास्तव इ०**—पहा "भार्या कलहतः कश्चिन्मातरं त्यक्तुमर्हति।" जैमि. २७।२८. **श्लोक १८.** आतां शत्रुघ्न रामांना विनंति करतो. **सामप्रकारें**—गोडीगुलाबीनें. **तेंही इ०**—पण तें सर्व अरण्यरुदिताप्रमाणें निष्फळ झालें. असें आहे कीं, अयोग्य कालीं धरलेली इच्छा पूर्ण होत नाहीं. वर्षाकाल संपल्यावर सारंग पक्ष्याला थेंबभर देखील पाणी मिळत नाहीं. कोणतेंही काम योग्य कालींच फलद्रुप होतें. शत्रुघ्नाची विनंति उशीरा झाल्यामुळें तिचा कांहीं परिणाम घडला नाहीं. या सिद्धांताच्या पुष्टीस्तव तिसऱ्या व चवथ्या ओळींत अर्थांतरन्यास घातला आहे. **श्लोक १९.** **सीतात्याग इ०**—सीतात्यागरूपी चंद्राच्या उदयानें रामाचा दुःखसिंधु वाढला. पौर्णिमेला समुद्रास भरती येते. या ओळींत वाईट वस्तूवर चांगल्या वस्तूचा आरोप केल्यामुळें हीं रूपकें हृद्य वाटत नाहींत. **ओळ २.** रामाच्या बंधूंनीं शोकाश्रूंनीं भूमि भिजविली. **कन्यात्याग इ०**—आपल्या मुलीच्या त्यागाच्या बातमीनें झालेल्या त्रासामुळें मूर्च्छित झालेली भूमि, रामाच्या बंधूंनीं आपल्या अश्रुजलाच्या सिंचनानें जणु काय शुद्धीवर आणली. रामानें सीतेचा त्याग केलेला ऐकून सीतेच्या आईस, भूमीस दुःख होणें साहजिक आहे. या सुंदर उत्प्रेक्षेचें श्रेय पंतांकडेच जातें. **श्लोक २०.** इकडे तर आपले बंधु आपणास हळुवार विनंति करतात, इकडे तर सीतेमुळें आपल्या कुळाला कलंक लागतो. अशा स्थितींत रामानें कठोर असाच निश्चय केला. **लंकापतिकुळांतक**—रावणाच्या कुळाचा नाश करणारा, राम. **श्रुती**—कान. राम इतकें कठोर बोलले कीं, तें कानानें ऐकवत नव्हतें. **श्लोक**

२१. अपवादभयापुढें रामाला स्वतःच्या जीविताची किंवा बंधूंच्याही जीविताची किंमत नव्हती, तेथें सीतेचा काय पाड ? पहा–"आत्मानमप्यहं जह्यां युष्मांश्च पुरुषर्षभ। अपवादभयाद्भीतः किं पुनर्जनकात्मजाम् ॥" जैमि० २७।३५. "निश्चित्य चानन्य निवृत्तिवाच्यं त्यागेन पत्न्याः परिमार्ष्टुमैच्छत् । अपि स्वदेहात्किमुतेंद्रियार्थाद्यशोधनानां हि यशो गरीयः ॥" रघु० १४।३५. **लेखा**–हिशेब पर्वा. **श्लोक २२. कैकेयीचा सुत**–भरत. **स्वांतोद्वेकप्रदे**–अंतःकरणाला उद्वेग देणारीं. **अनुजयुत**–शत्रुघ्नासह. **तदालया**–रामाच्या मंदिरांत. भरत उद्वेगानेंच तेथून गेला. **श्लोक २३.** इकडे लक्ष्मणदेखील अधोवदन होऊन हात जोडून रामाच्या पायाकडे दृष्टि लावून उभा होता. **शिंपित इ०**–आपल्या नेत्रकमळांनीं भूमि शिंपित, म्हणजे भूमिकडे दृष्टि लावून असा अर्थ. **निबद्धकर**–हात जोडलेला. **पूजित इ०**–रामाचीं पदकमळें आपल्या दृष्टीच्या कमळांनीं पूजीत होता. कमळांनीं कमळाची कसली पूजा व्हावयाची ? हीं रूपकें हृद्य नाहींत. लक्ष्मण रामाच्या पायाकडे दृष्टि लावून उभा होता इतकाच त्याचा अर्थ. येथें पर्यायोक्त अलंकार होतो. जो राम आपल्या नामरूपी रसपानाविषयीं तत्पर असणाऱ्या लोकसमुदयास, संसार किंवा जननमरण देत नाहीं, तो लक्ष्मणाकडे पाहून बोलला. येथेंही तिसऱ्या ओळींत पर्यायोक्त अलंकार होतो. **श्लोक २४.** "एक तर माझें म्हणणें मान्य कर व सीतेला गंगातीरीं नेऊन सोड, नाहींतर सीतेबद्दल तुला वाईट वाटत असल्यास मलाच तुझ्या हातांनीं मारून टाक." असे रामांचे निर्वाणीचे शब्द. पहा–"सौमित्रे छिंधि खड्गेन शिरो मे न विचारय । सीतां भागीरथीतीरे त्युक्तुं वा गच्छ माचिरम् ।" जैमि० २७।३८. **श्लोक २५. तटाकरानीं**–तीरावरील वनांत. **सीतापरित्यागज इ०**–सीतेचा त्याग केल्याबद्दलचा दोष माझ्यावर आहे, तुझ्यावर नाहीं. **श्लोक २६. बंधुला**–रामाला. **अवनत इ०**–अधोवदनानें. लक्ष्मण रथ आणवून सीतेच्या मंदिरास गेला. **सूतहातें**–सारथ्याकरवीं. **पुसुनि गुरुसि**–वडील भावास, रामास विचारून. त्याची आज्ञा घेऊन. **श्लोक २७. क्ष्मातनयापदांबुजाला**–सीतेच्या पदकमलीं लक्षण विनम्र झाला. **श्लोक २८. रावणप्रमुख इ०**–रावणादि राक्षसांचा नाश करणारी. **देवरासह**–दीराबरोबर. **श्लोक २९.** सीतेचें भाषण. "मी रामाजवळ विनोदानें जें मागितलें तेंच मला त्यांनीं दिलें, असें मला वाटत होतें. परंतु तुझा रथ दिसेपर्यंत मला तें खरें होईल कीं नाहीं अशी शंका होती." सीतेनें गंगातीरीं जाण्याचे आपले डोहाळे रामाला सांगितले, व तो ते पूर्ण करील अशी तिची खात्री होती. पण प्रत्यक्ष लक्ष्मण

रथ घेऊन येईपर्यंत सीतेला ती गोष्ट घडून येईल कीं नाहीं, याबद्दल शंका होती. **जगत्काम इ०**–सर्व जगाचें इच्छित पुरविणारा कल्पवृक्ष, राम. **श्लोक. ३०. हरिजिच्छमना** –इंद्रजिताला मारणाऱ्या लक्ष्मणा, तूं रामाच्या शब्दरूपी आम्रवृक्षास वसंत ऋतूप्रमाणें पोषक झाला आहेस. आम्रवृक्षास बहर येण्यास वसंत ऋतु जसा मदत करतो, तद्वत् तूं रामाचा शब्द खरा करण्यास मदत केली आहेस. **सत्यसंघ**–सत्यप्रतिज्ञ. **मनुसंभव**–मनूचे वंशज. या श्लोकांतील रम्य कल्पना मोरोपंताचीच आहे. **श्लोक ३१. द्रविणें**–द्रव्य. **दुकूलें**–रेशमी वस्त्रें. **देवराच्या इ०**–दिराच्या मताप्रमाणें द्रव्य व वस्त्रें बरोबर घेतलीं. **ओळ २.** "सुखसमृद्धिसाठीं ब्राह्मणसुवासिनींची पूजा करीन" असें ती जन्ममरणरहित सीता म्हणाली. पहा– "गृहीष्यामि विचित्राणि वासांस्यगरुचंदनम् । मुनिभ्यो मुनिपत्नीभ्यो दातुं श्रेयोऽभिवृद्धये ॥" जैमि. २७।४९. **श्लोक ३२. स्वर्णाच्या**—सोन्याच्या. **मणिचित्रिता**—रत्नांनीं चित्रविचित्र अशा, रत्नजडित. **मुनिमनो इ०**–मुनींचीं मनें हींच रत्नें, तीं ठेवण्याच्या पेट्या. हें पादुकांचें विशेषण आहे. रामाच्या पादुकांच्या ठिकाणीं मुनींचीं मनें गुंतून रहात. मुनींचीं मनोरूपी रत्नें जेथें सांठविलीं जात, अशा त्या पादुका म्हणजे रत्नें ठेवण्याच्या पेट्याच होत्या. **मैथिल**—राम. जनकानें मिथिलेचें राज्य रामालाच दिलें होतें म्हणून रामाला ही संज्ञा आहे. **कांतपदांबुजैकनिरता**—ज्याची पत्नी, पतीच्या पादपद्माच्या ठिकाणीं एकतानता पावते, तो राजा राम धन्य होय. **श्लोक ३३. सुरद्विरदगामिनी** ऐरावतासारखी मंद गति आहे जिची, गजगामिनी. **पुसावया**—जातांना निरोप घेण्यास. **हृदयनाथ इ०**–आपल्या पतीच्या आईला, सासूला. **स्वभालगत इ०**–आपल्या कपाळावरील कुंकवानें कौसल्येचे पाय सीतेनें चिन्हित केले. कौसल्येच्या पायावर सीतेनें डोकें टेकून वंदन केल्यामुळें सीतेच्या कपाळावरील कुंकू कौसल्येच्या पायास लागलें. **निजवर इ०**–आपल्याला प्राप्त झालेल्या वराच्या आनंदाचें स्थान. हे 'मुखें' याचें विशेषण आहे. रामाकडून प्राप्त झालेल्या वरानें झालेला आनंद सीतेच्या तोंडावर दिसत होता. **श्लोक ३४.** सीता सासूला आपले डोहाळे सांगते. **सगरात्मज इ०**–सगर राजाच्या मुलांचा पापरूपी चिखल. भगीरथ राजानें गंगेला मृत्युलोकीं आणून आपल्या पितरांचा उद्धार केला, या कथेला येथें संदर्भ आहे. **श्लोक ३५.** गंगेचें माहात्म्य सीता वर्णन करते. **सुरमानव इ०**–देव, मानव व नाग यांच्या स्त्रिया. सीता गंगादर्शनास

जाण्यास आपल्या सासूची अनुज्ञा मागते. **श्लोक ३६.** " ज्यानें इंद्रजिताचा वध केला तो आपल्या वडील भावाच्या आज्ञेनें ( रामाच्या आज्ञेनें ) माझे मनोरथ पूर्ण करण्यास्तव रथ घेऊन माझ्या मंदिरास आला आहे. " आपणास गंगातीरास नेण्यास लक्ष्मण रामाच्या आज्ञेवरून रथ घेऊन आला आहे, असें सीता सांगते. **श्लोक ३७.** कौसल्येचें भाषण. **नवीन इ०**–ताज्या शिरीषाच्या फुलाप्रमाणें कोमल अशा सीते ! **या इ०**–" या माझ्या घरापर्यंत येण्यानेंही तुझे पाय सुकले. " इतकी तूं कोमल ! **वक्त्रकांति**–मुखकांति म्लान होईल. **सारांश** सीतेला वनवास सहन होणार नाहीं, असा कौसल्येचा अभिप्राय. येथें कौसांत घातलेला शब्द मुळांत गळला आहे. म्हणून 'मद्' हा शब्द आम्हीं सुचविला आहे. काव्यसंग्रहकार येथें 'या' असा शब्द सुचवितात. **श्लोक ३८. स्नेहसद्रत्न इ०**–स्नेहरूपी उत्तम रत्नाची खाणी. जिच्या वाणींत प्रेमभाव ओतप्रोत भरला आहे. **भारती**–वाणी. **श्लोक ३९.** वर श्लोक ३७ त कौसल्येनें वनवासांत सीतेचा ओठ वाळेल अशी भीति व्यक्त केली आहे. त्याला सीता उत्तर देते. " माझा पति वनवासांत सर्व कांट्याकुट्यांचा ( शत्रूंचाही ) नाश करणारा आहे. त्यानें आपल्या वानर वीरांना, मृत्युसमुद्रांत बुडत असतां तारलें आहे. अशा शुद्ध गुण-सागर रामाच्या नामाचा जप सारखा करीत असतां, ( वनवासांतील श्रमानें ) माझा ओठ वाळेल काय ? " रामनामाच्या जपानें आपणास थकवा येणार नाहीं, असा अर्थ. वरील ३७–३९ श्लोक, जैमिनीच्या अध्याय २७।५५–६० या श्लोकांचा स्पष्ट अनुवाद आहे. **श्लोक ४०.** सीता कौसल्येचा आशीर्वाद मागते. " तुमच्या कृपाछत्राची छाया माझ्या मस्तकावर असल्यावर क्लेशरूपी सूर्याचे किरण मला कसे शिवतील ? " हें परपंरितरूप होय. **श्लोक ४१.** सीतेचें हें भाषण ऐकून, तिच्या तीन सासू तिला आशीर्वाद देतात. **स्वकर्णांजलिंहीं**–आपल्या कर्णरूपी ओंजळीनें. सीतेचें वाणीरूपीं अमृत त्या आपल्या कानाच्या ओंजळीनें प्याल्या. सीतेचें भाषण त्यांनीं ऐकलें. **आज्ञापायेथ**–आज्ञारूपी शिदोरी. सीतेला त्यांनीं जाण्यास अनुज्ञा दिली असा अर्थ. **श्लोक ४२.** सीता आपल्या तिघी सासूंना प्रदक्षिणापूर्वक वंदन करून निघते. **श्लोक ४३. रघूत्तमांघ्रिसारसा**–रामाच्या पादपद्मांना, चरणकमलांना. **तूर्ण**–सत्वर.

---

## अध्याय चवथा

सीता लक्ष्मणाबरोबर वनवासास जात आत असतां, तिला भयसूचक अनेक अप-शकून झाले. या दुश्चिन्हांचा परिणाम आपल्या पतीवर होऊं नये म्हणून तिनें त्याचें कल्याण चिंतिलें. सीता गंगातीराला पोंचली. पण पुष्कळ वेळ ऋषींचे पावनाश्रम तिला न दिसल्यामुळें ती थोडी दुःखीच झाली. लक्ष्मणानें तिचें सांत्वन करून तिला धीर दिला व रामानें तिला लोकापवादामुळें सोडली आहे, अशी दुःखदायक बातमी निवेदन केली. आपल्या पतीनें या हेतूनें आपला त्याग केला आहे, ही कल्पना नसल्यामुळें सीतेच्या मनाला धक्का बसला. लक्ष्मण परत अयोध्येस जात असतां तिनें सासूंना व आपल्या पतीला निरोप पाठविला, व तो दिसेनासा झाल्या-वर तर तिचा शोक अनावर झाला. तिचा हा विलाप ऐकून वाल्मिकी ऋषि आपल्या शिष्यांसह तेथें आले. अशा या अध्यायाच्या कथानकामुळें जैमिनीनें या अध्यायास 'वाल्मीकिसमागम' असें सार्थ नामाभिधान ठेविलें आहे. **श्लोक १.** सीतेच्या त्यागामुळें अयोध्येंतील लोक दुःखी झाले असें सांगतांना अयोध्येवर चेतनत्वाचा आरोप केला आहे. **विनागसा**–निष्पाप. **स्वपटह इ०**—आपल्या नगाऱ्यांच्या आवाजानें रडणारी. अयोध्येंतील नगाऱ्याचा आवाज रडण्याप्रमाणें भासत होता. नगाऱ्यांचा आवाज म्हणजे त्या नगरीचें रडणेंच असें वाटत होतें. **समीरण इ०**–वाऱ्यानें हलत आहे कापड ज्याचें अशा ध्वजरूप हातानें. अयोध्येंतील ध्वजांचीं फडकीं जीं वाऱ्यानें हलत होतीं, तीं त्या नगरीच्या हाताप्रमाणें भासत होतीं. आपल्या ध्वजरूपी हाताच्या हालचालीनें अयोध्या, सीतेला जणु काय निरोपच देत आहे असें वाटत होतें. यांतील उत्प्रेक्षा जैमिनीनीच आहे. पहा–"अयोध्यातीव दुःखेन व्यथिता वातचंचलैः। ध्वजानां पल्लवैरेनां वारयंतीव दृश्यते।" जैमि० २८।१।२. **श्लोक २.** सीता अरण्यास जातांना दुश्चिन्हें पाहते. पुढील दुःखांची ही सूचना किंवा पार्श्वभूमिकाच होय. **श्लोक ३.** दुश्चिन्हांचें किंवा अपशकुनांचें वर्णन पुढील तीन श्लोकांत आलें आहे. **शिवा**–कोल्ही. **भीमा**–भयंकर. **अशिवा वाक्**–अशुभ ओरडणें. कोल्हीचें पुढें येऊन ओरडणें अशुभसूचक मानतात. याशिवाय सीतेचा उजवा डोळाही जोरानें स्फुरूं लागला. बायकांचा उजवा डोळा लवणें हें अशुभकारक आहे. या श्लोकाच्या ओळींच्या शेवटीं च्छेकानुप्रास साधला आहे. **श्लोक ५.** सीता लक्ष्मणास म्हणते. **रक्षोवृंदापहा**–राक्षसांच्या समूहाचा नाश करणाऱ्या लक्ष्मणा! **भल्लू**–कोल्ही.

येथेंही च्छेकानुप्रास आहेच. **श्लोक ६. गोमायु**–कोल्हा. **व्यापूनि**–आमचा मार्ग व्यापून, आमच्या पुढें येऊन. या दुश्चिन्हांनीं आपल्या पतीस अकल्याण प्राप्त होऊं नये, म्हणून सीता त्याच्या भावी सुखाची आशा प्रदर्शित करते. **श्लोक ७.** रामाच्या प्रतापाला या दुःश्चिन्हांनीं कमीपणा न येवो अशी सीतेची इच्छा. रामाचा मागील प्रताप ती वर्णन करते. **जनस्थानीं**–दंडकारण्यांतील पवित्र-क्षेत्रीं. हेंच हल्लींचें नाशिकक्षेत्र. रामानें या क्षेत्रीं, खरादि राक्षसांना रणांगणांत यम-सदनास पाठविलें. **शमननगर इ०**–यमाच्या नगराच्या दाराचा रस्ता. अर्थात् मृत्यूचा रस्ता. **प्रत्यर्थी**–शत्रु किंवा याचक. राम हा शत्रूला उदारपणें वागविणारा तसाच याचकांना उदारपणें देणग्या देणारा आहे. **शरघनाच्या इ०**—शररूपी घन देण्यांत. पण येथें ' शरधनाच्या ' असाच मोरोपंतांचा मूळ पाठ असावा असें खास वाटतें. कारण येथें ' प्रत्यर्थी ' हा श्लिष्ट शब्द योजल्यामुळें, त्याचा ' शत्रु ' हा अर्थ ' शर ' या शब्दाला जसा लागू पडतो, तसा त्याचा ' याचक ' हा दुसरा अर्थ ' धन ' या शब्दालाच विशेष लागू पडण्यासारखा आहे. म्हणून ' राम जसा शत्रूंना बाण देणारा आहे, तसाच तो याचकाला धन देणारा आहे ' असाच अर्थ घेणें युक्त आहे. **खळबळध्वांत इ०**–शत्रूचा सैन्यरूपी अंधःकार घालविणारा सूर्य. रामाचें बळ शत्रुसैन्याचें निर्दलन करण्यास समर्थ असो. रामाचा आतांपर्यंत चालू असलेला प्रताप पुढेंही चालो. **श्लोक ८.** रामानें रावणावर स्वारी करून विजय मिळविल्याचा सीता उल्लेख करते. **जगत्तोषांबुजाचाकरी**–जगाचा आनंद हे कमल त्याला उपटून टाक-णारा हत्ती. जगताच्या आनंदाचा नाश करणारा रावण. **पाषाणीं इ०**–लंकेवर स्वारी करतांना रामानें जो समुद्रावर सेतु बांधला त्याचा उल्लेख. **काळातिथि**–मृत्यूचा पाहुणा. रामानें समुद्रावर सेतु बांधून रावणाला मृत्यूचा पाहुणा केला, म्हणजे यमसदनाला पाठविला. **विद्याश्रीमद इ०**–विद्या आणि वैभव यांनीं उत्पन्न होणारी गर्वरूपी दारू पिऊन जे भकलेले ( मूढहृदय ) असे देवांचे शत्रू ( स्वर्द्विट् ), तेच कोणी वारे ( मरुत् ) त्यांना पिणारा मोठा सर्प ( वासुकी ), राम. सर्प हे वायुभक्षक आहेत. पहा ' सर्पाः पिबंति पवनं ' म्हणून रामावर सर्पाचें व रावणादि राक्षसावर वाऱ्याचें रूपक केलें आहे. देवाच्या शत्रूंना, रावणादि राक्षसांना मारणारा राम असा याचा अर्थ. या लांब व थोड्या क्लिष्ट रूपकाचें श्रेय मोरोपंतांकडेच आहे. **श्लोक ९.** सीता, रामाचे पूर्वीचे सर्व पराक्रम स्मरून त्याचें कल्याण चिंतिते. या दुश्चिन्हांचा परिणाम, अशा पराक्रमी रामावर न व्हावा अशी तिची इच्छा.

**गौतमदार इ०**–गौतम ऋषीची पत्नी अहिल्या पतिशापानें शिळा झाली होती, ती रामपदस्पर्शानें उद्धरली. **धनुर्भंग इ०**–सीतास्वयंवर प्रसंगीं रामानें केलेला शिवधनुर्भंग. या रामानें केलेल्या पराक्रमांची सीतेला आठवण झाली. **दंडक**–नियम. **प्रीतिप्रकर्षास्तव**–प्रेमातिशयामुळें. **ओळ ४.** प्रेमातिशयामुळें आवडत्या माणसाच्या विरहानें मनांत विनाकारण नेहमीं चिंता उत्पन्न होते. हा अर्थांतरन्यास सुंदर असून तो खास मोरोपंतांचा दिसतो. **श्लोक १०.** यापुढें लक्ष्मण सीतेची खिन्नवृत्ति घालविण्यासाठीं गंगेच्या प्रवाहाचें वर्णन करून विषय बदलण्याचा प्रयत्न करतो. **स्मृतिभवद्विण्मौलि इ०**–मदनशत्रू जो शंकर त्याच्या मस्तकावर पांढऱ्या मालेप्रमाणें शोभणारी. गंगेचा शुभ्र जलप्रवाह शंकराच्या मस्तकावर श्वेतपुष्पांच्या मालेप्रमाणें शोभतो. अशा शुभ्र गंगेस डोळ्यांनीं पाहून लक्ष्मण सीतेस म्हणाला. **चिंताकुंचित इ०**–चिंतेनें आकुंचित झाली आहे चित्तवृत्ति जिची अशा सीतेस 'माते' असेंच संबोधतो. कारण ती वडील बंधूची पत्नी असल्यामुळें मातेप्रमाणेंच आहे. **हंसस्वरभाषिणी**–तीरावरील हंसांच्या स्वरानें बोलणारी. गंगेच्या तीरावरील हंसांचे स्वर हेच त्या नदीचें भाषण. **पद्मेक्षणें**–गंगेच्या प्रवाहांतील कमळें हींच तिचे नेत्र. **लहरीभुजा**–गंगेच्या लाटा याच तिचे हात. हीं तिन्हीं रूपकें असून गंगेवर चैतन्यारोप केला आहे. **स्वर्गंगा इ०**–ही गंगा आपले तरंगरूपी हात वर करून तुला भेटावयालाच जणु बोलावते असें भासतें. गंगेच्या उंच उंच लाटांवर केलेली ही उत्प्रेक्षा सुंदर आहे. **श्लोक ११.** सीता त्या वनांत आल्यामुळें सर्व सृष्टीलाच आनंद झाल्याचें लक्ष्मण वर्णन करीत आहे. **विहगरवें इ०**–वृक्ष, पक्ष्यांच्या कूजनानें सीतेला जणु कुशल विचारीत आहेत. पक्ष्यांचे स्वर हीच वृक्षांची भाषा. **श्लोक १२.** भृंगांच्या गुंजारवावर ही हेतूत्प्रेक्षा केली आहे. सीतेनें आपल्या वनांत येऊन आपणास दर्शन दिलें म्हणून भ्रमरी जणु आपल्या गुंजारवांनीं सीतेचे गुणच वर्णन करीत आहेत. **श्लोक १३. दशमुखजिन्मनोभिरामा**–"रावणाला जिंकणाऱ्या रामास आनंद देणारी, तूं (सीता) आपल्या अरण्यास पुष्कळ दिवसांनीं आली असें पाहून हे राज्ञि सीते! तुला हंसी जणु सामोऱ्या येताहेत.' या श्लोकांतील दुसऱ्या ओळींत 'क्षितिपति' यापुढील दोन अक्षरीं शब्द गळला आहे. काव्येतिहाससंग्रहकारांनीं तेथें 'पत्नि!' असा शब्द स्वकल्पनेनें योजला आहे, तर काव्यसंग्रहकारांनीं तेथें 'कीर्ति' हा शब्द घातला आहे. परंतु हा श्लोक सीतेला अनुलक्षून असल्यामुळें 'पत्नि!' हें संबोधनच विशेष सयुक्तिक वाटतें.

तशांत सीता ही 'क्षितिपतिपत्नी' होती म्हणूनच तिला मराळरामा ( हंसी ) सामोऱ्या आल्या आहेत. काव्यसंग्रहकारांचा 'कीर्ति' हा शब्द घेऊन विशेष अर्थ साधत नाहीं. कारण 'कीर्ति' या शब्दानें शुभ्रत्वाचा जो ध्वनि निघावयाचा तो 'शुभ्रवर्णा' हा शब्द घातल्यानें उघड झाला आहे. त्यामुळें 'कीर्ति' या शब्दाचें प्रयोजन राहिलेलें नाहीं. म्हणून काव्येतिहाससंग्रहकारांचाच पाठ योग्य वाटतो. **श्लोक १४. देवर-भारती**–दिराचें भाषण. **अमरापगेला**–देवनदीला, गंगेला. **श्लोक १५. देवी**–गंगा. **गौरपयोधरा**–शुभ्रजल धारण करणारी, शुभ्रजला गंगा सीतेला पाहून आनंदली. तशीच गौर आहेत स्तन जिचे अशी देवी सीता, गंगेच्या दर्शनानें संतोषली. येथें 'पयोधर' हा शब्द श्लिष्ट आहे. **श्लोक १६. तरणिवर**–नावेवर. **तरणिकुल इ०**–सूर्यवंशांतील उत्तम राजा जो राम याची पत्नी, सीता. **देवरति इ०**–देवांना आवडणाऱ्या नदीच्या. **परकूला**–परतीराला. सीता नौकेंतून गंगेच्या परतीराला गेली. **श्लोक १७. विश्वपावनी वनीं**–जगाला पावन करणाऱ्या गंगेच्या पाण्यांत. गंगेच्या परतीरावर सीतेला आश्रम न दिसल्यामुळें ती थोडी सचिंत झाली, कारण पुण्याश्रम पाहण्याचे तिचे डोहाळे होते. पहा–सौमित्रे नच पश्यामि मुनिनामाश्रमानहं । पवित्रवेषास्ताः साध्वीर्न पश्यामि तपस्विनीः ॥ जैमि० २८।२५. **श्लोक १८.** सीतेला गंगेच्या परतीरावर सौम्य प्राणी दिसले नाहींत, उलट सिंहव्याघ्रादि हिंस्र पशु व त्यांनीं मारलेले हत्ती असा बीभत्स देखावाच दिसला. आश्रम तर तिला कुठेंच दिसेनात. हाही शकुन तिला शुभ वाटला नाहीं. **शार्दूल**–वाघ. **पंचमुख**–सिंह. **ऋक्ष**–अस्वल. **वृक**–लांडगे. **पादोत्थ इ०**–या पशूंच्या पायांनीं उठलेल्या धूळीनें सूर्य दिसेना. इतकी धूळ प्रचंड व उंच उडाली होती. त्यामुळें अशा पशूंचें किती प्राचुर्य त्या वनांत होतें, हें स्पष्ट होतें. **पंचास्य इ०**-सिंहांनीं फोडलेल्या गजमस्तकांतून गळालेलीं मोतीं जमिनीवर सर्वत्र पसरलीं होतीं. हत्तींच्या गंडस्थलांत मोतीं असतात असा प्रवाद किंवा संकेत आहे. **श्लोक १९. सिंहाहत इ०**–सिंहांनीं मारलेल्या हत्तींच्या रक्तानें भूमिभाग शिंपला गेला होता. **तद्दंत इ०**–सिंहांनीं मारलेल्या हत्तींच्या दातांचे ढीग भूमीवर सर्वत्र पसरले होते. **ओळी** ३।४–मृत हत्तींचें रक्त व दांत यांनीं व्याप्त झालेल्या पृथ्वीवर उत्प्रेक्षा केली आहे. सर्वत्र हस्तिदंत पसरल्यामुळें, पृथ्वी, पांढऱ्या फुलांच्या माळांनीं विभूषित झालेल्या व हत्तींच्या रक्ताच्या सड्या-मुळें ती रक्तचंदन लावलेल्या, स्त्रीप्रमाणें भासली. **श्लोक २०. शार्दूल इ०**–वाघांच्या पंजांत सांपडला आहे गळा ज्यांचा अशा हरिणींची. **निर्दग्ध इ०**–

पार जळून गेलेले वृक्ष. **क्रूरद्विजिव्ह इ०**–दुष्ट सर्पाच्या फूत्काराच्या अग्नीनें. वृक्ष सर्पाच्या फूत्कारांनीं जळून गेले होते, इतक्या जालिम विषाचे हे सर्प. सीतेला हे असे उद्वेगकारक देखावे दिसले. **श्लोक २१.** सीता लक्ष्मणास म्हणते. **घनरवांतकरा**–इंद्रजिताचा वध करणाऱ्या लक्ष्मणा ! **वनबिडाल**–रानमांजर भूमि सारखी उकरीत आहे. **मूषकसेवनीं**–उंदीर खाण्यांत. **श्लोक २२. दावग्रस्तवनो इ०**–वणवा लागलेल्या अरण्यांतून उठलेल्या धुरांत, पक्षी कोठें गडप झाले. **निर्दग्धांड इ०**–जळून गेलेल्या अंड्यांकरितां व पिलांकरितां पक्ष्यांनीं काढलेल्या करुण स्वरानेंच त्यांचें ( पक्ष्यांचें ) अस्तित्व भासत होतें. **पंचास्याहत इ०**–सिंहांनीं मारलेल्या, काजळासारख्या काळ्या हत्तींचीं प्रेतें, सीतेला ( मातें ) भूकंपानें तुटलेल्या डोंगराच्या कड्याप्रमाणें भासत होतीं. यांतील हत्तींच्या शवांना दिलेली उपमा, अनुरूप आहे. **संदेहबुध्युद्भवें**–शंका उत्पन्न झाल्यामुळें. काळ्याकुट्ट हत्तींचीं प्रेतें पाहून डोंगराच्या काळ्या फत्तराच्या कड्याची शंका सीतेला आली. **श्लोक २३.** अजून पावन नद्यांचीं जलें कां दिसत नाहींत, असें सीता लक्ष्मणास विचारते. **क्षमासमाना इ०**–सोशिकपणांत पृथ्वीसारख्या. **रूपीं इ०**–स्वरूपानें प्रत्यक्ष लक्ष्मीसारख्या. दुसऱ्या ओळींत आद्यंतिकयमकें साधलीं आहेत. **श्लोक २४.** ऋषिपत्नी कां दिसत नाहींत, असा सीतेचा प्रश्न. **होमधूमारुणा इ०**–यज्ञाच्या धुरानें तांबडे झालेले आहेत, कमळाच्या पाकळीसारखे आपांग डोळे ज्यांचे अशा. **श्लोक २५. दंड**–पळसाचा दंड. **मौंजी**–मुंज नांवाच्या गवताचा कडदोरा. **सद्विद्या**–ब्रह्मविद्या. ब्रह्मचिंतनांत गढून गेलेले पंडित, कां अजून दिसत नाहींत ? **श्लोक २६.** यांतील सामासिक शब्द, 'भूदेव' या शब्दाचीं विशेषणें आहेत. **आम्नाय इ०**–वेदानें सांगितलेला जो धर्म, त्या मार्गानें जाणारे. **संसारांबु इ०**–संसारसमुद्राचें पान करण्यांत जे अगस्ति आहेत. अगस्तीनें ज्याप्रमाणें समुद्र पिऊन टाकला, त्याप्रमाणें या गंगातीरावरील ऋषींनींही संसारसमुद्र पिऊन टाकला होता. ज्यांनीं संसाराचा नाश केला होता, किंवा ज्यांनीं संसारावर जय मिळविला होता. **शापानुग्रहदक्ष**–जे शाप किंवा आशीर्वाद देण्यांत तत्पर आहेत, असें ज्यांचें सामर्थ्य, ते ऋषि ( भूदेव ) कोठें दिसत नाहींत. म्हणून सीता म्हणते, "हे लक्ष्मणा, चिंतारूपी सर्पिणी माझ्या आनंदरूपी अमृताला पिऊन टाकीत आहे." "चिंतेनें माझ्या आनंदवृत्तीवर विरजण पडत आहे." अपेक्षित असे पावन आश्रम व ऋषि, गंगातीरीं न दिसल्यामुळें सीतेला काळजी लागली आहे. **श्लोक २७.** रामांना टाकून

आल्याबद्दल सीतेला पश्चात्ताप वाटत आहे. आपण डोहाळ्यांच्या भरीं पडून विनाकारण अरण्य गांठलें, असे सीतेला वाटलें. **अविवेक इ०**–'अविचारानें ओढवून घेतलेलें आहे पाप जिनें, त्या मला पुण्यवान् ऋषि कसे दिसतील ?' आपण पापी म्हणूनच आपणास पुण्यवान् ऋषि दिसत नाहींत अशी तिची समजूत. पहा–मयाऽसौ रघुनाथश्च त्यक्तो बुध्द्या ततो नहि। दृश्यंते मुनिपत्न्यस्तामुनिपुत्रामुनीश्वराः ॥ जैमि० २८। २९. **श्लोक २८.** दुसऱ्या ओळींत दृष्टांत अलंकार चांगला साधला आहे. **कौशिक**–दिवाभीत, घुबड. **पद्मिनीपति**–सूर्य. दिवाभीताला सूर्याकडे पाहण्याचें जसें सामर्थ्य नसतें, तद्वतच माझ्यासारख्या पापिणीला पवित्राश्रमवासी जन पाहण्याचा अधिकार नाहीं. **श्लोक २९. प्रजावती**–भावजय. **दिराच्या**–लक्ष्मणाच्या. **रावणपुत्रहंता**–लक्ष्मण. **संतापसंतप्त इ०**–संतापानें तापलेल्या मनाचें नियमन करणारा, सांत्वन करणारा. लक्ष्मणाचें भाषण त्रासलेल्या मनाचें सांत्वन करणारें होतें. **श्लोक ३०.** लक्ष्मणाचें भाषण. **व्योमासि इ०**–ब्राह्मणांच्या होमांचा धूर गगनाला चुंबित आहे. येथूनच आपण धुराच्या लोटाच्या रोखानें जावें. **विजितांबरा**–जिंकलेलें आहे आकाश जिनें ( धूमराजी ). आकाश व धूम यांची नील कांति आहे. पण धुराचा लोट आकाशाच्या नीलत्वापेक्षां सरस होता. जेथें धूर निघत आहे, तेथें आश्रमपद असावें, असा लक्ष्मणाचा कयास. **श्लोक ३१.** रामांनीं सीतेला लोकापवादामुळें वनांत टाकिली आहे ही आतांपर्यंत गुप्त ठेवलेली गोष्ट, लक्ष्मण येथें उघड करीत आहे. **जगद्वंद्य इ०**—जगाला वंदनीय अशा तुझ्या पतीनें, रामानें. **प्रशोकबाष्पाकुल इ०**—अत्यंत शोकामुळें आलेल्या अश्रूंनीं दाटला आहे कंठ ज्याचा, अशा लक्ष्मणानें ( देवरानें ). लक्ष्मणाला ही गोष्ट बाहेर फोडतांना अगदीं जिवावर आलें असें दिसतें. यांतच त्याची भावनावशता व्यक्त होते. पहा–" रामेण त्वं परित्यक्ता सत्यं लोकापवादतः। तवापि दोहदो जातो द्रष्टुं भागीरथीं नदीं ॥ ३३ ॥ मामसौ प्रेरयामास त्वां हातुं गहने वने। किं करोम्यवशो मातः भ्रातुस्तस्य वचोहरः ॥ ३४ ॥ " जैमि० २८. जैमिनीचा लक्ष्मण तितकासा भावनाप्रधान दिसत नाहीं. **श्लोक ३२.** सीतेला सोडणाच्या बाबतींत आपणाकडे कांहीं दोष नाहीं, हें लक्ष्मण सीतेच्या निदर्शनास आणतो. आपण पराधीन, केवळ रामाचे आज्ञाधारक. अशी आपली भूमिका तो स्पष्ट करतो. **अस्रालि इ०**—लक्ष्मणाच्या डोळ्यांतून यावेळीं अश्रू गळूं लागले. त्याच्या अश्रूंची मालिका मोत्यांच्या हाराप्रमाणें भासली,

अशी थोडी अयुक्त उत्प्रेक्षा पंतांनीं केली आहे. **श्लोक ३३.** आपणास लोकापवादामुळें रामांनीं टाकलें, ही गोष्ट सीतेला माहीत नव्हती. आपले डोहाळे पुरविण्यासाठींच त्यांनीं आपणास वनांत लक्ष्मणाबरोबर धाडलें आहे, पुण्याश्रम पाहून लगेच त्याच्यासह आपण परत अयोध्येस येऊं, अशी तिची प्रामाणिक समजूत होती. पण लक्ष्मणानें सीतात्यागाचें खरें कारण सांगितल्यावर आकस्मिकतेमुळें तर तिला दुःखाचा भयंकर धक्का बसला. **मूर्च्छावात** इ०—मूर्च्छारूपी वायूनें कंपायमान झालेली. **सीतारंभा**—सीतारूपी केळ. सीता मूर्च्छा येऊन भूमीवर पडली. हें परंपरितरूपक पंतांचें आहे. जैमिनीनें येथें निराळी उपमा योजली आहे. पहा– "इति तस्य वचःश्रुत्वा पपात धरणीतले । मूर्छिता जानकी तस्मिन्नंबराद्रोहिणी यथा ॥ ३५॥" जैमि० २८. **श्लोक ३४.** लक्ष्मण मूर्च्छित सीतेला सावध करतो. उघड्या अरण्यांत पडलेल्या सीतेवर त्या लक्ष्मणानें आपल्या डाव्या हाताचें छत्र करून सावली केली, व वस्त्र धरलेल्या उजव्या हाताचा पंखा करून वारा घातला. **सत्तालवृंतक**—उत्तम ताडाचा पंखा. पहा–"ततस्तां लक्ष्मणस्त्रस्तो वस्त्रांतेनाभ्यवीजयत् । हस्तेनैकेनच छायां कुर्वश्च मुखपंकजे ॥" जैमि. २८।३७. **श्लोक ३५.** लक्ष्मणाचे उद्गार. सीतेच्या नशिबीं असा प्रसंग लिहिणाऱ्या ब्रम्हदेवासच लक्ष्मणानें दोष दिला आहे. आपल्या डोळ्यांतील अश्रूंनीं सीतेचें शरीर भिजवून लक्ष्मण म्हणाला–" हे ब्रह्मदेवा! अशीं कठोर अक्षरें सीतेच्या कपाळीं लिहिणारी तुझी लेखणी जळो. माझ्या हातून जर रामाच्या पायाची सेवा घडली असेल, तर ही मूर्च्छित पडलेली ( सीता ) लवकर उठेल." अशा रीतीनें लक्ष्मणानें त्याच्या हातून घडलेली रामसेवा पणालाच लावली. **सुविषमाक्षराची**–अत्यंत कठोर अक्षरांची. **खनी**–खाण, ( अशी लेखणी ). **श्लोक ३६.** सीता सावध झाली. **अंतर्बहिस्थित** इ०–सीतेच्या गर्भांतील रघुवंशज पुत्र, व बाहेर जवळच बसलेला रघुवंशज लक्ष्मण, या दोघांच्या भीतीनें सीतेच्या प्राणांना जाण्यास धीर झाला नाहीं. नाहींतर तिचे प्राण तिला केव्हांच सोडून गेले असते. **मोहांधकार** इ०–दैवाच्या विचित्र लीलेनें मूर्च्छित झालेल्या सीतेनें हळूच डोळे उघडले. लक्ष्मणाची तपश्चर्या फळास आली. **श्लोक ३७.** सावध झाल्यावर सीता लक्ष्मणास म्हणते. **कश्मलसिंधु** इ०–मूर्च्छा समुद्राच्या कडेला गेल्यावर, मूर्च्छा ओसरल्यावर, सीता आपल्या दिराच्या मुखकमलाकडे पाहून बोलूं लागली. **लोकसा**–परक्याप्रमाणें. **श्लोक ३८.** मागें दंडकारण्यांत लक्ष्मणानें केलेली सेवा स्मरून सीता म्हणते. **छदनसदनें**–पर्ण-

झाला. **हृत्सुखकरें**–चित्ताला आनंदकारक. **स्वात्मघरसें**–वनाला देखील तूं स्वतःच्या घराचें स्वरूप आणलेंस. जशी तूं पूर्वी सेवा केलीस तशी आतांही येथें राहून करावीस, असा सीतेचा अभिप्राय. **श्लोक ३९. हा दारुणा इ०**–पापाच्या परिणामाची करणी खडतर आहे. आपणास लक्ष्मणानें टाकून जाऊं नये, असें सीता त्याला विनविते. पहा "अवोचत शनैरेव मां त्यक्त्वा गहने वने। कथं यास्यसि सौमित्रे जनस्थाने यथापुरा॥" जैमि० २८।४०. **श्लोक ४०.** सीता म्हणते, कीं, "पूर्वी दंडकारण्यांत असतांना पुढें राम व मागें तूं, ( लक्ष्मण ) असे तुम्हां दोघांनीं माझें रक्षण केलें." **काळानळी इ०**–मृत्यु रूपी अग्नींत. **सुरसपत्न इ०**–देवांच्या शत्रूरूपी तुपाचें. मृत्युरूपी अग्नींत राक्षसरूपी तुपाचें हवन करणारा राम. राक्षसांना मारणारा राम, असा अर्थ. **सुमित्रा**–सीता लक्ष्मणास म्हणते, "त्यावेळीं तूं मला सुमित्रेप्रमाणें, प्रत्यक्ष आपल्या आईप्रमाणें मानलेंस." पहा–"अग्रतः पति रामो मां पृष्ठतस्तु भवान्वने॥" जैमि० २८।४३. **श्लोक ४१.** रामाच्या रम्य आकृतीचें वर्णन करून सीता त्याचें स्मरण करते. **सन्मध्य**–सुंदर कटि, कंबर. **श्लोक ४२.** रामाचें सुंदर वदन मला कधीं दिसेल? असें सीतेस झालें आहे. **सांद्रानंदसुधानिधि**–अत्यंत आनंदरूपी अमृताचा सांठा, अर्थात् अत्यंत आनंदी. ( हीं राघवाननाचीं विशेषणें आहेत ). **स्मितजित इ०**–हास्यानें जिंकला आहे मदन व चंद्र ज्यानें असें. रामाचें हास्यमुख मदन व चंद्रापेक्षांही सुंदर होतें असा अर्थ. **ज्यातें इ०**–ज्या रामाच्या मुखाकडे पाहून अप्सरांना देखील मदनबाधा होऊन त्या कंपायमान व्हाव्या. **कस्तूरी इ०**–कस्तूरीच्या टिळ्यानें जें सुंदर दिसत आहे. **ममहृन्नेत्रैक इ०**–माझ्या हृदयाचें व नेत्रांचें जें विश्रांतिस्थान आहे. **श्मश्रुल**–श्मश्रुनीं मिशांनीं युक्त असें, ( रामाचें मुख. ) समानवर्णन पहा–"मुखं पद्मविशालाक्षं निर्मलं चंद्रबिंबवत्। चारुदंष्ट्रं श्मश्रुलंच कुंडलाभ्यां सुशोभितम्॥" जैमि. २८।४८. मोरोपंतांनीं मुळांतील वर्णनांत बरीच भर घातली आहे. **मतें**–मला, मातें. **श्लोक ४३.** आतां आपणास रामाचे पाय कधीं दिसतील अशी सीतेला उत्कंठा लागली आहे. **भवरवि**–संसाररूपी रवि. **मिथ्याप्रपंचपथिकांस**–आभासमय प्रपंचाच्या मार्गावरील प्रवाशास, अर्थात् या मायामय जगांतील मनुष्यप्राण्यास. प्रपंचरूपी रवि आपल्या प्रखर किरणांनीं प्रापंचिक मनुष्यास सारखा भाजीत आहे. येथें 'भव' व 'प्रपंच' या समानार्थक शब्दांवर केलेलीं अनुक्रमें 'रवि' व 'मार्ग' यांचीं रूपकें हृद्य वाटत नाहीं.

**तत्तापसंततिस**–संसारतापाच्या परंपरेला, जो रामांघ्री–रामाचा पाय–केवळ स्मरण-मात्रानें नष्ट करतो, तो माझ्या डोळ्यांना कधीं सुखी करील? तो मला कधीं दिसेल? **श्लोक ४४.** पूर्वीच्या वनवासांतीस रामाचे गुण सीता आठवते. **जो आलिंगी इ०**–ज्यानें सीताच समजून वृक्षांना व वेलीनांच आलिंगन दिलें. **मत्प्राप्यर्थ इ०**–रावणानें माझें हरण केलें असतां; ऋषींचा मित्र व जगाच्या राजा असा हा राम, विमनस्क होत्साता वानरांचा मित्र झाला. एवढा राजा असून माझ्या शोधासाटीं त्याला यःकश्चित् वानरांशीं मैत्री करावी लागली. **शाखामृग**–वानर. **श्लोक ४५.** सीता आपल्या स्वयंवराच्या वेळचा धनुर्भंग प्रसंग आठवते. **मदाशयाला**–माझ्या अभिप्रायाला, माझ्या मनोगताला. **प्रमदाशयाला**–स्त्रीच्या हातास. सीता म्हणते, "मी रामालाच वरणार असा माझा निश्चय जाणून, रामाला माझा हात लग्नांत धरावा असें वाटलें." **प्रमदाशय**–स्त्रीचा सीतेचा शय–हात. **तातपूतें**–माझ्या श्वशुराच्या पुत्रानें, आर्यपुत्रानें, रामानें. **पूतें**-पवित्र अशा रामानें. काव्यसंग्रहकारांनीं 'तातपूतें' याचा अर्थ 'मिथिलेला' असा कसा केला कळत नाहीं. **श्लोक ४६.** सीता म्हणते. **मद्विधि**–माझ्या दैवरूपी अगस्तिऋषीनें, रामाचा कृपासिंधु शोषून टाकला. अगस्तीनें जसा समुद्र शोषला, तशी माझ्या दुर्दैवानें माझ्यावरील रामाची कृपा आटून गेली. **शफरीला**–मत्सीला. रामाच्या कृपासमुद्रांतील मी मत्सी आहे. तो कृपासमुद्रच आटल्या-वर मला कोठला थारा मिळणार? रामाची कृपा नसल्यावर माझी अवस्था कशी होणार? **श्लोक ४७.** सीता लक्ष्मणास म्हणते, 'मला वनवासास धाडण्याच्या कामीं कठोर हृदयाच्या बिभीषणाची योजना करावयाची सोडून तुझ्यासारख्या नम्र व मृदुहृदयाच्या माणसाची कशाला केली?' **स्वभ्रातृ**–आपल्या भावाचा–रावणाचा–घात करण्याचा खटाटोप करण्याइतका जो क्रूर आहे, तो बिभीषणच या वनवासा-सारख्या कठोर प्रसंगीं बरोबर धाडण्यास योग्य होता. दयाशील लक्ष्मण तेथें काय कामाचा? **श्लोक ४८.** 'मला अरण्यांत सोडण्यास माझ्या पतीनें सुकंठाची कां योजना केली नाहीं? असलें दुःष्कृत्य सुग्रीवासारख्या वानरालाच सांगण्यास योग्य. हे लक्ष्मणा! या कृत्यामुळें तुझ्या मुखाला काजळाची कांति आली आहे. तुझें तोंड काळवंडलें आहे. तूं ही गोष्ट मनाला लावून घेतली आहेस.' **सुकंठ**–सुग्रीव. **वलीमुख**–वानर. **मलीमसरुचि**–कृष्णकांति. तुझ्या मुखावर कृष्णकांति आली आहे, असा अर्थ. **श्लोक ४९.** लक्ष्मण परत जातांना सीता आपल्या सासूंना निरोप देते.

**सर्वविदितनया**–जाणत आहे, सर्व नीति जो अशा लक्ष्मणा. **पंक्तिरथतनया**–दशरथपुत्रा लक्ष्मणा ! पहा–“ श्वश्रूजनं सर्वमनुक्रमेण विज्ञापय प्रापितमत्प्रणामः । प्रजानिषेकं मयिवर्तमानं सूनोरनुध्यायत चेतसेति ॥” रघु० १४।६०. **श्लोक ५०.** सीता रामाला निरोप पाठविते. **श्लोक ५१.** “ मी माझ्या हृदयमंदिरांत ध्यानरूपी नेत्रांनीं तुमचे पाय सारखे पहात आहें. पण तेच पाय प्रत्यक्ष माझ्या मस्तकाला लागून कधीं सुख देतील तें कळत नाहीं.” सीतेनें पाठविलेला हा निरोप जैमिनीच्या ग्रंथांत नाहीं. पंतांनीं याची योजना रघुवंशाच्या १४ व्या सर्गातील भागावरून केली आहे. **श्लोक ५२. हृत्कायवाक्कर्मज**–“ मानसिक, शारीरिक, वाचिक व क्रियात्मक पापें मजकडून घडलेलीं नाहींत. हें, माझ्या पतीला कसें ठाऊक नाहीं ? ( पण मी गरोदर असल्यामुळें, ) गर्भनाशाचें भ्रूणहत्येचें पातक लागत नसतें, तर मी माझ्या टाकाऊ शरीराचा त्याग केला असता.” **सत्व**–गर्भ. पहा–“ किंवा तवात्यंतवियोगमोघे कुर्यामुपेक्षां हतजीवितेस्मिन् । स्याद्रक्षणीयं यदि मे न तेजस्त्वदीयमन्तर्गतमंतरायः ॥ रघु० १४।६५. **श्लोक ५३. सत्वसंपन्ना**–गरोदर. **असाधु इ०**–मूल वाईट असो कीं चांगलें असो, तें टाकणें योग्य नव्हे. **श्लोक ५४.** सीतेचा निरोप पुढें चालू. **अपराधवियुक्ता**–अपराधापासून अलिप्त. **भूमिवरें**–राजानें, रामानें. **दैवदुस्त्यज**–दैव–टाळतां येत नाहीं, हें माझ्या आज चांगलेंच अनुभवाला आलें. पहा–“कल्याणबुद्धेरथवा तवायं न कामचारो मयि शंकनीयः । ममैव जन्मांतरपातकानां विपाकविस्फूर्जथुरप्रसह्यः ॥” रघु० १४।६२. **श्लोक ५५.** सीता श्रीरामाचें गुणवर्णन करते. **त्वद्विप्रयोग**—तुझा विरह. **श्लोक ५६.** सीतेनें आत्महत्याही केली असती, पण ती गरोदर असल्यानें गर्भहत्येचें पातक तिच्या आड येत आहे. **भारभूत इ०**–“तुझ्या पायांच्या सेवेशिवाय मला जड झालेलें माझें शरीर भूमीला केवळ भार झालें आहे. माझ्या हीन शरीराला टाकावें, तर तुजपासून मला राहिलेला गर्भ माझ्या बेताच्या आड येत आहे. **वीर्यनिषेक**–वीर्यसिंचनानें राहिलेला गर्भ. **श्लोक ५७.** सीतेची हळुवार भावना येथें व्यक्त झाली आहे. “चंदनाच्या लेपाच्या आडपड्यानें तुझा माझा वियोग होऊं नये, तुझ्या माझ्यांत अलगपणा येऊं नये, म्हणून तो लेपही मी शरीराला लावला नाहीं. आतां तुझ्या माझ्यामध्यें लक्षावधि पर्वत व वृक्ष आल्यामुळें, तूं असा कसा दिसेनासा झालास ?” पूर्वी अयोध्येंत असतां आपल्या अंगाला चंदन लावलें तर त्याचा पातळ लेपही आपल्या व आपल्या पतीच्या मध्यें येईल, अशी सीतेला

भीति वाटे. म्हणून ती चंदनाचा लेपही अंगाला लावीत नसे. पण आतां वनवासा-मुळें या प्रेमळ पतिपत्नींमध्यें किती पर्वत व वृक्ष आले आहेत ? केवढा दैवदुर्विपाक हा ! **श्लोक ५८.** सीता आपला तपाचा निश्चय सांगून रामावरील अढळ प्रेम व्यक्त करते. पहा—"साहं तपः सूर्यनिविष्टदृष्टिरूर्ध्वं प्रसूतेश्चरितुं यतिष्ये । भूयो यथा मे जननांतरेपि त्वमेव भर्ता न च विप्रयोगः ॥" रघु० १४।६६. **श्लोक ५९.** रामविरहानें आपलें हृदय अजून शाबूद आहे, हें पाहून सीता स्वतः-लाच दोष देते. **अशनि**–वज्र. **विरहघनपतन** इ०–विरहरूपी घणाच्या माऱ्यानें फुटलेलें. **जळलें**–मेलें. स्त्रियांच्या तोंडीं हा शब्द नेहमीं येतो, हें मोरोपंतांनीं पाहिलें होतें. **श्लोक ६०.** शेवटीं सीतेच्या या निरोपांत थोडी कठोरता आली आहे. **अंतर्वत्नी**–गरोदर. **पांसुला**–जारिणी. यालाच समानार्थक पहा–"वाच्यस्त्वया मद्वचनात्स राजा वन्हौ विशुद्धामपि यत्समक्षम्। मां लोकवादश्रवणादहासीः श्रुतस्य कीं तत्सदृशं कुलस्य ॥ रघु० १४।६१. **श्लोक ६१.** "हे रामा! तुझ्या पदकमलाच्या ठिकाणीं माझें चित्त आसक्त झालेलें आहे. पण त्या नेहमींच्या मित्रांनीं–तुझ्या पायांनींही आज मला टाकलें आहे. विपरीत घडलें असतां दुर्दैवानें आपले आप्त व मित्रही कारणाशिवाय शत्रू बनतात." अर्थांतरन्यास. **अमित्र**–शत्रू. **श्लोक ६२.** सीता लक्ष्मणाला वर देते. **क्षेम**–कल्याण. **शातें**–सुखातें. **शं**–सुख. **श्लोक ६३.** येथें सीतेचा निरोप संपला आहे. **श्लोक ६४.** सीतेचा निरोप ऐकून लक्ष्मण रडूं लागला. **ओकआत्मधनस्त्रीतें** इ०–घर, द्रव्य व पत्नी यांना मनानें ओकारी-प्रमाणें त्याज्य मानणारा लक्ष्मण, यःकश्चित् मुलाप्रमाणें (तोकवद्) रडूं लागला. रामाज्ञेपुढें त्याला कशाचीच किंमत वाटत नव्हती. **श्लोक ६५.** रामाज्ञेप्रमाणें सीतेला सोडून लक्ष्मणाला अयोध्येस परतणें भाग होतें. त्याप्रमाणें तो परतला. **श्लोक ६६. तनू नेली**–लक्ष्मण मोठ्या प्रयासानें शरीरानें परतला, पण सीतेला एकटी टाकून त्याचें मन तेथून परतेना. **स्वांबाविरह** इ०–आपल्या आईच्या विरहानें उत्पन्न झालेल्या संतापानें जसें मूल तळमळतें, तसा लक्ष्मणही तळमळला. रडून त्याचें तोंड मलीन झालें. **श्लोक ६७.** लक्ष्मण गेल्यावर सीतेची स्थिति. **नयनागोचर**–डोळ्यांना दिसेनासा. **कळ न पडे**–चैन पडेना, विश्रांति मिळेना. काव्यसंग्रहकारांचा 'दुःख थांबेना' हा अर्थ बरोबर नाहीं. पहा–"सुजना जेंवि खळ, कळ क्षणहि पडों दे नरा न देवा त्या।"—मोरो० कर्णपर्व, ११।५४. **करपद** इ०–तिचेच हात पाय तिला झेपेनासे झाले. **श्लोक ६८. राजरामा**–राजाची

पत्नी. **रजोरिक्ता**–रजोगुणरहित अशी, अर्थात् सात्विक. **रुचिराक्षी**–सुंदर डोळ्यांची. या ओळींत 'र' नें अनुप्रास साधला आहे. **श्लोक ६९.** तिचा दीर दिसेनासा झाल्यावर तिला तिचें धैर्य तिला सोडून गेलें, तिनें धीर सोडला. **हृच्छोकवल्मीक**–इ० हृदयांतील शोकरूप वारुळांतून उत्पन्न झालेला मूर्च्छारूप साप, तिला चावला. म्हणजे शोकामुळें तिला मूर्च्छा आली. **मातेसि**–आपल्या आईस, भूमीस. मूर्च्छा येतांच सीता भूमीवर पडली. **श्लोक ७०. गळतीसमान**–अभिषेकपात्राप्रमाणें डोळ्यांतून अश्रु गळूं लागले. **लपनें**–तोंडानें. तोंडानें धडपणें शब्द येईनात. **विग्रह**–शरीर. शोकामुळें ती एकदा उठे तर एकदा निजे, असा चाळा करूं लागली. **जनका**–पित्यास. या ओळींत आद्यंतिक यमकें साधलीं आहेत. **श्लोक ७१. हृदंगणिं**–सीतेच्या हृदयरूपी अंगणांत शोक नाच करूं लागला, हृदयांत शोक अनावर झाला. **शोकला** –वाळला. **भारती**–वाणी. यांतही आद्यंतिक यमक प्रत्येक ओळींत आहे. **श्लोक ७२.** आपण राजकन्या व राजपत्नी असून आपली अशी अवस्था व्हावी याबद्दल सीता आपल्या दैवासच दोष लावते. **कमळस्था**—" हे ब्रह्मदेवा, तूं माझ्या कपाळीं हें काय लिहिलेंस ? पहा–" जनकस्य कुले जाता दत्ताऽस्मै रघवे पुरा । जैमि० २८। ६५. **त्रिविष्टपीं**–त्रिजगतांत. **श्लोक ७३.** कदाचित् लक्ष्मण परत माघारा येईल, तो दूर गेला नसेल, कदाचित् माझ्या धैर्याची परीक्षा घेण्यासाठीं त्यानें मला येथें सोडून जाण्यांत विनोद केला असेल किंवा सुखदु:खांचा क्षणिक अनुभव देणारें हें स्वप्न आहे, किंवा हें माझ्या कर्माचें फळच ब्रह्मदेवानें मला भोगावयाला लावलें आहे ? अशा अनेक शंका सीतेला येत आहेत. **श्लोक ७४.** सीता रामाचा धावा करते. **सुहृदयपदका**–ज्याच्या, सुंदर हृदयावर पदक आहे असा. **पापपंकोदका**–पापरूपी चिखलाला धुणारें जल असा. **सुहृदलिकमला**–मित्ररूपी भ्रमरांचें कमळ. मित्रांचें आश्रयस्थान. **श्लोक ७५.** आत्महत्या करावी असें सीतेच्या मनांत अनेक वेळां येतें. पण भ्रूणहत्येचें पातक तिच्या बेताच्या आड येतें, हें मागें आलेंच आहे. **भ्रूणहत्येमुळें इ०**–मी आत्महत्या केल्यास गर्भहत्येच्या पापासाठीं धर्म मला आपल्या कठोर हातांनीं शिक्षा करील. माझें कृत्य धर्मबाह्य होईल. **विग्रह**–दंड, शिक्षा. **श्लोक ७६. तोषधनाचे इ०**–संतोषरूपी धनाचे चोर असे सीतेचे विलाप. सीतेच्या विलापांनीं सर्वांचें समाधान नष्ट झालें, असा अर्थ. **पवनीं**–सीतेचा विलाप वाऱ्यावर चढून अर्थात् वाऱ्याबरोबर सर्व वनांत शिरला. **श्लोक ७७.** सीतेच्या विलापामुळें सर्व चेतनाचेतन सृष्टि रडूं लागली, चैतन्यारोपाचे ( pathetic fallacy ) हें

उदाहरण आहे. **विविधपतग इ०**–अनेक पक्ष्यांच्या समूहाच्या ओरडण्याच्या मिषानें वृक्ष (भूमिभू) व लता रडूं लागल्या. तें पक्ष्यांचें ओरडणें नसून लतावृक्षांचें रडणेंच होतें. अपह्नुति अलंकार. **श्लोक ७८. शिखी**–मोर. **नाट्यरस**–नृत्यरंग. दुःखित सीतेवर मोरांनीं आपल्या अश्रूंचें सिंचन केलें. **प्रकोपशिखी**–संतापरूपी अग्नि. या पतिव्रतेचा संतापाग्नि विझावा म्हणूनच जणु त्यांनीं अश्रू ढाळले. उत्प्रेक्षा. पहा "मयूरा नृत्यमुत्सृज्य तस्मिन्काले प्रधाविताः।" जैमि० २८।६९. **श्लोक ७९. स्वल्प शिवति**–उड्या मारतांना हरिणांचे पाय जमिनीला फारच थोडा वेळ स्पर्श करीत होते. पहा–"पशोदग्रप्लुतत्वाद्वियति बहुतरं स्तोकमुर्व्यां प्रयाति"। –शाकुंतल. वास्तविक हरिणांचा उंच उड्या मारण्याचा स्वभाव आहे. पण त्यावरच येथें पंतांनीं उत्प्रेक्षा केली आहे. **स्वदुहितृ इ०**–आपल्या मुलीच्या शोकरूपी अग्नीनें, भूमि तापलेली आहे. आपण जर तिच्यावर पाय ठेवले तर पोळतील, या बुद्धीनेंच जणु हरिण जमिनीला स्पर्श करीत नव्हते. **श्लोक ८०.** निरनिराळे पशु व प्राणि, दुःखित सीतेची परिचर्या करीत आहेत. भ्रमरींनीं शीतळ व कमलगंधि अशा पाण्यानें तिच्यावर सिंचन केलें. **चमरी**–वनगाई. **निजवालधि इ०**–आपल्या केसाळ शेपट्यांच्या चवऱ्यांनीं वनगाई जणु दासीप्रमाणें वारा घालीत होत्या. **श्लोक ८१.** आतां हत्तिणींची पाळी आली. **करिणी**–हत्तिणी. **सुमदालसा**–मदानें भारावलेल्या. **करीं**–सोंडेंत. **सजळें** येथें 'सुजळें' असा पाठ असावा. ज्यांच्या सोंडेंत पाणी होतें असा अर्थ. **कर्णव्यजन इ०**–आपल्या कानाच्या पंख्यांच्या वाऱ्यांनीं. आपल्या सुपासारख्या कानांचे पंखे करून हत्तिणींनीं सीतेला वारें घातलें. **श्लोक ८२. उदकस्थ इ०**–पाण्यांत राहणाऱ्या पक्ष्यांनीं. **शकुंतद्विजवर**–शकुंतपक्षिश्रेष्ठ. **पक्षच्छायेसि**–पंखाच्या छायेस. **श्लोक ८३. कुळ**–समुदाय. **जळें**–अश्रु. **तदवलोकें**–तिला पाहून. **श्लोक ८४.** सीतेचा शोक पाहून क्रूर प्राणीदेखील सौम्य झाले. **क्रूर सत्वें**–क्रूर प्राणी. **भूसुता इ०**–सीतेच्या सात्विक स्वभावामुळें. **ओळी ३।४.** सन्मार्गानें वागून सांठविलेलें पुण्य सर्व आपत्तिरूपी पर्वतांचा नाश करण्यांत वज्राप्रमाणें समर्थ असतें. गांठीं असलेलें पुण्य दुःखपर्वतांचा नाश करतें. सीता पुण्यवान् होती म्हणूनच तिला पशूंचीही मदत मिळाली. पहा–"यांति न्यायप्रवृत्तस्य तिर्यंचोपि सहाय्यताम्।" **श्लोक ८५. कुश**–दर्भ. **गोक्षुर**-सराटे. **संचरणीं**–चालतांना. **क्षतद**–जखम करणारी. **स्वमुखें**–आपल्या टोकांनीं. सीता चालत असतां, दर्भ, कांटे, सराटे इ० आपल्या टोकांनीं तिच्या पायांत शिरून जखम करीत होते. पण ती रामराणी आपल्या

पतीच्या रमणीय व कल्याणकारक पायांचें स्मरण करीत होती. आपल्या पायांच्या दुर्दशेकडे तिचें लक्षच नव्हतें. तिचें लक्ष त्यावेळीं पतीच्या पायांकडे होतें. येथें दामयमक साधलें आहे. **श्लोक ८६.** सीता धुळीनें माखली होती, त्यावर उत्प्रेक्षा. **धूलिस्वसा**–धूळ ही सीतेची बहीणच होती. कारण सीता जशी भूमीची मुलगी, तशी धूळदेखील भूमीची मुलगीच. म्हणून हें नातें ओळखून धूळीनें जणु आपल्या बहिणीला–सीतेला आलिंगून समजाविलें होतें. सीता धूलि-व्याप्त झाली होती इतकाच अर्थ. **श्लोक ८७.** सीतेच्या कंठांतील मोत्याच्या कंठ्यांतील मोती गळत होते, त्यावर उत्प्रेक्षा. ‘त्या हाराचा आशय कीं, सीतेच्या हृदयाला अगदीं बिलगून असलों, तरी आपल्याकडून तिच्या दुःखाचा परिहार कांहीं होत नाहीं, असें जाणून एकेका मोत्याच्या रूपानें तो अश्रूच जणु गाळीत होता.’ तोही सीतेला अशा रीतीनें सहानुभूति दाखवीत होता. **मुक्ताफलच्छलें**–मोत्यांच्या मिषानें. येथें अपह्नुति अलंकारही साधला आहे. **श्लोक ८८.** वाल्मीकीचें सीतेजवळ आगमन. **छात्रासि**–शिष्यांना. **यूपार्थ**–यज्ञस्तंभासाठीं. **क्रतुस्तव**–यज्ञासाठीं. **साक्षाद्भस्म इ०**–जटा, भस्म धारण करणारा प्रत्यक्ष शंकरच जणु. **दयानिधान**–दयेचा ठेवा.

## अध्याय पांचवा

वाल्मीकि ऋषीनीं सीतेचें सांत्वन करून तिला आपल्या आश्रमांत नेलें. तेथील ऋषिस्त्रियांनींही तिचें आनंदानें स्वागत केलें. ऋषीच्या शिष्यांनीं तिला एक पर्णशाला बांधून दिली व तेथें ती रामांच्या पादुकांचें पूजन करीत व आश्रमांतील झाडांना पाणी घालीत दिवस कंठूं लागली. पुढें नऊ महिने पूर्ण झाल्यावर ती दोन जुळ्या पुत्रांना प्रसवली. शिष्यांनीं ही बातमी वाल्मीकीला सांगितली, त्यावेळीं त्याच्या हातांत कुश ( दर्भ ) व लव ( लव्हाळा ) होते, व त्यांनींच त्या पुत्रांवर पुण्योदकांचें त्यानें प्रोक्षण केलें. म्हणून तींच नांवें त्यांना अनुक्रमें प्राप्त झालीं. त्यांचे मौंजिबंधनादि संस्कार वाल्मीकीनें यथाक्रम करून त्यांना सर्व विद्यांत प्रवीण केलें. कुशलव हे दोन बधु त्या आश्रमांत मुनीच्या आज्ञेंत एकचित्तानें राहूं लागले. यांत आलेल्या कथाभागाला जैमिनीनें निराळें नामाभिधान केलें नाहीं. तथापि या अध्यायाला ‘कुशलवजन्म’ असें नांव द्यावें. **श्लोक १. कळेवर**–सीतेचें शरीर. **वराशी**–

( वरा+अशी )-थोराची आहे अशी. जवळ येऊन पाहिल्यावर वाल्मीकीला सीतेची खरी कल्पना आली. **मृदूपक्रम**–हळुवार प्रारंभ. ज्या योगानें तिचा दुःखभार राहणार नाहीं, अशा संभाषणाला हळुवार प्रारंभ केला. ऋषीच्या भाषणानें सीतेचा श्रमपरिहार व्हावा असेंच त्याचें भाषण मृदु होतें. **श्लोक २.** वाल्मीकी सीतेला विचारतात. **सुकृतैक इ०**–कोणा पुण्यसागराच्या वंशांत तुझा जन्म झाला ? **जनी**–जन्म. कोणत्या पुण्यवानाच्या वंशांत तूं जन्मलीस ? **हेतुला**–कारणाला. दुःखाचें सर्व कारण सांग. **श्लोक ४. मैथिल**–जनकराजा. **भूवल्लभाज्ञा इ०**–राजाची आज्ञा हेंच ज्याचें आवडतें घर आहे अशा दिरानें, लक्ष्मणानें. रामाची आज्ञा प्रिय मानणाऱ्या लक्ष्मणानें. ( मला येथें आणून सोडलें ). **श्लोक ६.** वाल्मीकीचें सीतेस आश्वासन. **पतिव्रता इ०**–सर्व पतिव्रतांत अग्रगण्य. **क्षोणीशचूडामणी**–राजश्रेष्ठ. दशरथ राजाही आपला मित्रच होता, म्हणजे तिच्या सासरच्या घराण्याशीं आपला पिढीजात स्नेहसंबंध आहे, असें ऋषी सीतेला ध्वनित करतो. **या वेळेसि इ०**–मग अशा तुझ्या कठिणप्रसंगीं मला तुझी दया कशी येणार नाहीं ? येथें मोरोपंतांनीं कालिदासाचाच अनुवाद केला आहे. पहा–“ तवोरुकीर्तिः श्वशुरः सखा मे सतां भयोच्छेदकरः पिता ते । धुरिस्थिता त्वं पतिदेवतानां किं तन्न येनासि ममानुकम्प्या ॥ रघु० १४।७४. **श्लोक ७.** रामानें रावणहननाचें अवघड कार्य केलें, तो न्यायानें राज्य करतो, पण त्यानें निरपराध सीतेचा त्याग केला, याबद्दल वाल्मीकीचा त्याच्यावर राग आहे. **क्ष्मादेव**–ब्राम्हण. **निजजन इ०**–स्वजनांच्या दुःखरूपी अरण्याचा जो अग्नि ( शिखी). स्वजनांचें दुःख नाश करणारा. **सत्वोदरी**–गरोदर. हा श्लोकही कालिदासाच्या कृतीवरच आधारलेला आहे. पहा– “ उत्खातलोकत्रयकंटकोऽपि सत्यप्रतिज्ञेप्यविकत्थनेपि । त्वां प्रत्यकस्मात्कलुषप्रवृत्तावस्त्येव मन्युर्भरताग्रजे मे ॥ ” रघु. १४।७३. **श्लोक ८.** सीतेला वाल्मीकि आशीर्वाद देतात. **रिपुयमयम इ०**–शत्रूंना यमाप्रमाणें होणारे जुळे पुत्र तुला होतील. **पुण्यपुंजाश्रम**–पुण्यांचा सांठा जेथें आहे, अशा आश्रमाला. **श्लोक ९.** आपल्या आश्रमाचें महात्म्य ऋषि सांगतो. **मदाश्रम इ०**—माझ्या आश्रमाचा आश्रय करणाऱ्या जड व चेतन वस्तूंना. **व्यापत्ति**–दुःख. **महानुकंपास्पदा**–अत्यंत दयाशील, व सुख देणाऱ्या ( शर्मदा ) अशा ब्राह्मणकन्यका तुला भिन्नभाव दाखविणार नाहींत, आपुलकीनें वागवतील. पहा–“ विनोदयिष्यंति नवाभिषंगामुदारवाचो मुनिकन्यकास्त्वाम् ” ॥ रघु० १४।७७. **श्लोक १०.** आपला आश्रम पित्याच्या घराप्रमाणें मान असें वाल्मीकि सांगतो. **स्वगुरुचें**–जनक

राजाचें. याही श्लोकाबद्दल पंत कालिदासाचे ऋणी आहेत. पहा–" तपस्विसंसर्गविनीत सत्वे तपोवने वीतभया वसास्मिन् । इतो भविष्यत्यनघप्रसूतेरपत्यसंस्कारमयो विधिस्ते ॥ " रघु० १४।७५. व " तन्मा व्यथीष्टा विषयांतरस्थं प्राप्तास्मि वैदेहि पितुर्निकेतम् ॥ " रघु० १४।७२. या दोन श्लोकांचा अनुवाद पंतांनीं या आपल्या श्लोकांत केला आहे. **श्लोक ११. काकुत्स्थराणी**–रामाची पत्नी. **स्तुत्य विश्वास**–जगास वंद्य. **श्लोक १२.** सीता वाल्मीकीच्या आश्रमास जाते. **निजाश्रुसलिलालिला**–आपल्या अश्रूंच्या जलधारेस. **कलानिधिमुखी**–चंद्रमुखी. **गती करी**–गमन करी. **श्लोक १३.** सीतेला ब्राह्मणसमूह सामोरा येतो. **ब्रह्ममाला**–ब्राह्मणांचे समूह. **सद्विद्या इ०**–ब्रह्मविद्येंत गढून गेलेल्या शिष्यसमूहासह व मुलें, मुली व बायका यांसह, तो ब्रह्माणवृन्द सीतेला सामोरा आला. **रामरामागम**–रामाच्या पत्नीचें आगमन. **मुनिवरघन**–श्रेष्ठ ऋषि हेच कोणी मेघ, आशीर्वादरूपी जलाचा वर्षाव सीतेवर करीत होते. परंपरितरूपक. **श्लोक १४.** ऋषिस्त्रियांची उक्ति. **स्पर्श करुनिया इ०**–तिच्या पाठीवर हात फिरवून. **आम्ही सर्व इ०**–आम्हीच तुझ्या सेविका आहों. हें घर तुझें आहे. **श्लोक १५. हिंस्रगणाचिया भवनीं**–क्रूरपशूंचें जें घर अशा या वनांत. **न मनीं मनीं**–मनांत मानूं नको. **तापसीनिकरें**–तापसींच्या समूहानें. **वरें**–उत्तम. 'कंदमूळफळां'चें विशेषण. **श्लोक १६. शिष्यप्रकारानें**–शिष्यगणानें. **निदेश**–आज्ञा. **दलशाला**–पर्णशाला. शिष्यांनीं पर्णशाला सीतेला बांधून दिली. **श्लोक १७.** सीतेचा आश्रमांतील कार्यक्रम. **तद्वदनोद्गत इ०**–वाल्मीकीच्या वदनांतून निघणाऱ्या कथारूपी अमृताच्या धारेला. वाल्मीकीच्या तोंडांतून निघणाऱ्या कथा सीता ऐके. **तमसाविश्वंभर इ०**–तमसानदीच्या पाण्यानें. **विश्वंभर**–पाणी. **सुमासि**–फुलें. **श्लोक १८. वन्याहारपरा**–वनांत मिळणारा आहार सेवन करणारी, कंदमूळफळें खाणारी. **संवीतवल्कांबरा**–नेसलेली आहे वल्कलरूपी वस्त्रें जी. वल्कलवेष्टिता. **तमसा इ०**–तमसानदीच्या स्नानाबद्दल प्रीति आहे जिला अशी. **कल्पव्यायत इ०**–कल्पाप्रमाणें लांब अतएव कंटाळवाणे दिवस. **श्लोक १९.** सीता प्रसूत होते. **वृद्धस्त्रीसमुपासिता**–वृद्ध स्त्रियांनीं परिवेष्टित. **महासिध्यासिता**–महासिद्धि जिच्याजवळ बसलेल्या ( आसिता ) आहेत अशी शंकराची शक्ति. ( शांकरी ). सीता ही शंकराच्या शक्तीप्रमाणें व वृद्धस्त्रिया महासिद्धीप्रमाणें शोभल्या. शंकरशक्तीभोवतीं जशा महासिद्धि असतात, तशा सीतेभोवतीं त्या वृद्धस्त्रिया होत्या. **सल्लग्न इ०**–उत्तम लग्न व ग्रह यांनीं युक्त अशा

रात्रीं. या पुत्रांच्या जन्मकाळीं शुभलग्न व उच्चीचे ग्रह होते. **श्लोक २०.** या वेळच्या शुभशकुनांचें वर्णन करतात. **स्वधेश**—अग्नि. **प्रदक्षिणार्चि**—उजव्या बाजूला ज्याच्या ज्वाला आहेत असा अग्नि. हें शुभचिन्ह आहे. **काष्टा**—दिशा. **सदागती**—वायु. **सौरभ**—सुगंधी. **श्लोक २१. द्युतिकर**—तेजःपुंज. **पर्णशाला** इ०—ज्या पर्णशालेंत सीता प्रसूत झाली ती, भावब्या लोकांना प्रकाशकिरणांची पेटीच वाटली. त्या बालकांचें तेज पर्णशालेंत प्रसृत झालें होतें. **श्लोक २३.** शिष्य वाल्मीकीला सीताप्रसूतीची वार्ता सांगतात. **किशोरयुगुळाला**—पुत्रद्वयाला. **तेजःप्रसरें**—त्या पुत्रद्वयाच्या तेजामुळें, दिव्याचा तेजस्वीपणाचा गर्व गळाला. दिव्यापेक्षांही ते पुत्र अधिक तेजस्वी असा अर्थ. पुत्रजन्माच्या वेळचीं हीं शुभचिन्हें, मोरोपंतांनीं कालिदासवर्णनावरून घेतलीं असावीं असें दिसतें. पहा—" दिशः प्रसेदुर्मरुतो ववुः सुखाः प्रदक्षिणार्चिर्हविरग्निराददे । बभूव सर्वं शुभशंसि तत्क्षणं भवोहि लोकाभ्युदयाम तादृशाम् ॥ अरिष्ट शय्यां परितो विसारिणा सुजन्मन स्तस्य निजेन तेजसा । निशीथदीपाः सहसा हतत्विषो बभूवुरालेख्य समर्पिता इवा " रघु० ३।१४–१५. पंतांनीं या श्लोकांत प्रतीपालंकार साधला आहे. **श्लोक २४.** शिष्य त्या नवीन जन्मलेल्या मुलांचें वर्णन करतात. " या मुलांना सूर्य चंद्र म्हणावें, तर सूर्य तापानें, किंवा उष्णतेनें व चंद्र कलंकानें युक्त आहे. या पुत्रांच्या ठिकाणीं हे दोष नाहींत. सूर्याचें प्रखर तेज व चंद्राची शीतलता, हीं अनुक्रमें या पुत्रद्वयांत आहेत. यांत निश्चयांत संदेहालंकार झाला आहे. **साधुचिन्हें**—शुभचिन्हें. **श्लोक २५. कुशलवमुष्टिधर**—दर्भ व लव्हाळा मुठींत धरलेला वाल्मीकि. **रुचिरव संग्रहणें**—त्या मुलांची कांति ( रुचि ) व शब्द ( रव ) यांचें ग्रहण करून, ऐकून. **श्लोक २६.** वाल्मीकि मुलांचीं नांवें ठेवतो. **क्षमानिर्जरें**—ऋषीनें. **मंत्रपूत** इ०—मंत्रांनीं पवित्र केलेल्या तमसानदीच्या जलकणांनीं, ते कुमारद्वय शिंपिले गेले. **तींच**—कुशलव हींच. **सुजातकर्म** इ०—पुत्रावणाच्या वेळीं कुशलव हींच मनांत कल्पिलेलीं नांवें, बाराव्या दिवशीं ठेवलीं. **श्लोक २७.** बाराव्या वर्षी त्या मुलांची मुंज केली. **तपःशिखि** इ०—तपरूपी अग्नीच्या मुखांत टाकलें आहे आपलें शरीररूपी सर्पण ज्यानें, अशा वाल्मीकीनें. तपानें आपलें शरीर ज्यानें क्षीण केलें आहे, अशा त्यानें. येथें नेहमींप्रमाणें परंपरित रूपक व पर्यायोक्त असे आपले आवडते अलंकार पंतांनीं साधले आहेत. **श्लोक २८. नंदिनी**—वशिष्ठ ऋषीच्या कामधेनूची मुलगी. ही नंदिनीही आपल्या आईप्रमाणें

इच्छित वस्तु देणारी होती. म्हणून मुंजीच्या समारंभाच्या वेळीं ब्राह्मणभोजनासाठीं वाल्मीकीनें या धेनुला मुद्दाम मागून आणली. **विपिन इ०**—अरण्यांत राहणाऱ्या ब्राह्मणांच्या जिभांचे शेंडे, त्यांच्या तोंडांत नटले–तृप्त झाले. अशीं पक्वान्नें या अरण्यवासियांनीं पूर्वी कधीं चाखलीं नव्हतीं. **श्लोक २९. विद्यास्वयंवरवधू**—चवदा विद्यारूपी स्वयंवर कन्यकांनीं त्या कुमारांना वरलें. चवदा विद्या त्यांना आपोआप आल्या. पहिल्या ओळींतील विशेषणें 'विद्या' व 'वधू' यांना लागू पडतात. **मुक्ताहारा**—मुक्त झालेल्या लोकांचा हार जिच्या कंठांत आहे अशी (विद्या), मोत्यांचा हार जिच्या कंठांत आहे अशी (वधू). **विधृतचत्तुषष्टि इ०**—चौसष्ट कला धारण केल्या आहेत ज्यांनीं अशा. **श्लोक ३०.** यालाच समानार्थक पहा—"सांगंच वेदमध्याप्य किंचिदुत्क्रांतशैशवौ । स्वकृतीं गापयामास कविप्रथमपद्धतिम् ॥" रघु० १५।३३. **श्लोक ३१.** कुशलवांच्या मधुर गायनाचा प्रभाव. हरिण देखील चारा सोडीत. **अष्टौसात्त्विक**—स्तंभ, स्वेद, रोमांच, स्वरभंग, वेपथु, वैवर्ण्य, अश्रु व प्रलय हे आठ सात्विक भाव. **श्लोक ३२. भुजगलोचनें**—सर्पाचे डोळे, तृप्त होती. सर्प डोळ्यांनीं ऐकतात व ते फार गानप्रिय आहेत. सर्वांना डोलावयास लावणारें असें या कुमारांचें गायन. **सुधर्मा**—देवसभा. देव या सभेंतून उठून कुशलवांचें गाणें ऐकण्यास धावल्यामुळें, ती मोकळी पडली. **पवनाचें दार**—वाऱ्याच्या स्त्रिया अर्थात् वारे. **मानवत्ती**—संतोषल्या. कुमारांचे मधुरालाप वायुलहरींत मिसळल्यामुळें, त्यांनांही फार आनंद वाटला. गायनालाप वायुलहरींत मिसळले इतकाच अर्थ. काव्यसंग्रहकारांनीं 'दार' याचा अर्थ दारें, खिडक्या, झरोके इ० केला आहे, तो चुकीचा वाटतो. **श्लोक ३३.** गाण्यानें संतुष्ट होऊन कुमारांना कोणी कोणी देणग्या देत. **कृपाण**—तरवार. **सुचर्म**—उत्तम ढाल. **कार्मुक**—धनुष्य. **तनुत्राण**—चिलखत. योद्धयांना योग्य अशाच या देणग्या होत्या. **श्लोक ३४.** त्यांच्या गाण्यानें कधीं चमत्कार झाला नाहीं? प्रत्येक वेळां झाला. प्रत्येक वेळीं ब्राह्मणांनीं त्यांचा सत्कार केला. **श्लोक ३५.** त्यांचे बाण (शिलीमुख) दुष्टांच्या हृदयांतील रक्त पीत. त्यांचे बाण दुष्टांचें पारिपत्य करीत. **हेचि**—हे कुमार सज्जनांच्या पदकमलीं भ्रमर (शिलीमुख) होत. हे सज्जनपदकमलीं मिलिंदायमान होत. जितके शूर तितकेच विनित असा अर्थ. **श्लोक ३६.** आईच्या आज्ञेंत राहणारे कुमार. **स्वप्रसूच्या**—आपल्या आईच्या. **भिन्ना इ०**—ते कुमार शरीरानें भिन्न पण मनानें एकच होते.

## अध्याय सहावा

इकडे अयोध्येंत, आपल्या हातून रावणाचा म्हणजे ब्राह्मणाचा वध झाल्यानें घडलेलें महापातक कसें निवारावें, याच्या काळजींत राम असतां, ऋषींनीं त्यांना अश्वमेध करण्याचा उपाय सांगितला. त्याप्रमाणें रामानें घोडा सोडून त्याच्या रक्षणार्थ शत्रुघ्नाची योजना केली. "हा घोडा रामचंद्रानें सोडला असून धीर व सामर्थ्य असेल अशा पृथ्वीवरील कोणत्याही वीरानें हा धरावा व युद्धास तयार व्हावें," असें आव्हानपत्रही त्या घोड्याच्या मस्तकीं बांधण्यांत आलें होतें. असा हा घोडा सेनेसह, ठिकठिकाणच्या राजांकडून विजयपत्रें मिळवीत वाल्मीकीच्या आश्रमांत आला. आश्रमस्थ लवानें तो धरून केळीच्या खांबाला बांधला. जैमिनीच्या २९ व्या अध्यायाला '**तुरगग्रहण**' हें नांव दिलें असून त्याच कथाभागामुळें, या अध्यायाला तेंच नांव देणें उचित आहे. **श्लोक १. साकेत**–अयोध्या. **ब्रह्महत्या**–हें महापातकांपैकीं, एक होय. पहा–'ब्रह्महत्या सुरापानं चौर्यं गुर्वंगनागमः ।'–मनु. रावण हा ब्राह्मण होता, त्याच्या वधानें रामाला ब्रह्महत्येचें पाप लागलें होतें. **सुकृतजळें**–पुण्यरूपी उदकानें. कोणतें पुण्य केलें असतां, हें महापातक धुऊन निघेल ? **जगच्छक्र**–जगाचा इंद्र, राजा. **वाजिराजक्रतु**–अश्वमेध, अश्वयज्ञ. **श्लोक २.** रामानें सीतेचा त्याग केल्यामुळें, तो पत्नीरहित होता. असा गृहस्थ यज्ञकर्म करण्याला पात्र नाहीं, असें वेदांचें मत. म्हणून रामानें सीतेची सोन्याची प्रतिमा करून, तिला पत्नी मानली व यज्ञाची दीक्षा घेतली. **कनकजनकजाकांत**–सोन्याच्या सीतेचा पति, राम. **ताटकारी**–ताटका राक्षसीचा वध करणारा, राम. **मखहयपतिच्या इ०**–यज्ञाच्या अश्वश्रेष्ठाच्या रक्षणासाठीं (त्राणकर्मीं). **श्लोक ३.** रामानें आपल्या घोड्याच्या कपाळीं बांधलेल्या जयपत्राचा मजकूर. **समरबळी**–रणांगणांतील बलवान् योद्धा. **सौवर्णपत्रीं**–सोन्याच्या पानावर. **सोडीविध्युक्त इ०**–रामानें तो घोडा विधिपूर्वक शुभवेळेस आपल्या हातानें सोडला. पहा– "एकवीराद्य कौसल्या तस्याः पुत्रो महाबलः । तेन मुक्तं हरिवरं गृण्हातु बलवान्नृपः ॥" जैमि. २९।५७. **श्लोक ४.** शत्रुघ्नाच्या स्वारीचें वर्णन. **अक्षौहिणी इ०**–तीन अक्षौहिणी सैन्याचा सेनापति. एक अक्षौहिणी = २१८७० रथ + २१८७० हत्ती + ६५६१० घोडे + १०९३५० पायदळ इतकें सैन्य. **व्यथितारिनारी**–दुःखित केल्या आहेत शत्रूंच्या स्त्रिया ज्यानें. अर्थात् शत्रूंना मारूनच त्या दुःखित होणार. शत्रूंना मारणारा असा अर्थ. **सोत्साह इ०**–उत्साहानें, जोमानें निघालेल्या सैनिकांच्या

हातानें वाजलेल्या मोठ्या नगाऱ्यांचा आवाज ( ध्वनि ). **प्रतीपनृप**–विरोधी राजांच्या आनंदाचा अपहार करी, नाश करी. शत्रुघ्नाच्या सैन्यांतील मोठ्या नगाऱ्यांच्या आवाजानें विरोधी राजे भयानें दुःखित होत. **श्लोक ५.** सैन्याचें आणखी वर्णन. **शत्रुघ्नध्वजिनी इ०**–शत्रुघ्नाच्या सैन्याच्या पायांनीं उडालेला धुळीचा लोट, आपोआप आकाशांत उडून जाऊन चंद्रबिंबांत शिरला. **यात्रासमयीं**–सैन्याची हालचाल होतांना. **नीरात्मबिंब**–जलमय आहे बिंब ज्याचें असा चंद्र. **चिक्कणपंक**–चिकट चिखल. जलमय चंद्रांत धूळ मिसळल्यावर तेथें चिखल झाला. **स्वच्छेंदुदेहास**–मूळच्या स्वच्छ अशा चंद्राला हा चिखल घट्ट डसला. **धौतस्फाटिक इ०**—स्वच्छ अशा स्फटिकाच्या भांड्यावरील काजळाप्रमाणें चंद्र आजही दिसत आहे. चन्द्रावर जो काळा डाग आहे तो वरील घट्ट चिखल डसल्याचा परिणाम आहे, अशी कविकल्पना. हें संबंधातिशयोक्तीचें उदाहरण आहे. **श्लोक ६.** सेनेचें पुढें वर्णन. **वाजी**–घोडे. **मुखफेनघर्म इ०**—तोंडांतील फेसानें व अंगांतील घामानें. **दंतिव्रज इ०**–हत्तींच्या समूहाच्या गंडस्थळांतून गळणाऱ्या मदानें. **पंकिल**–चिखलमय. **पत्तिस इ०**—सर्व रस्ता चिखलट झाल्यामुळें पायदळाचे पाय चटचट उचलेनात. इतके घोडे व इतके हत्ती त्या सैन्यांत होते कीं, त्यांच्या घामानें व मदानेंही रस्ता चिखलमय व्हावा. अतिशयोक्ति. **नानावाद्यनिनाद**–त्या सैन्यांतील अनेक रणवाद्यांचा आवाज, सज्जन लोकांच्या कानाला अमृतासारखा वाटला, तर तोच दुष्टांच्या मनाला, मूर्छित करणाऱ्या सर्पांच्या तोंडांतून निघणाऱ्या विषाप्रमाणें वाटला. हें भेदकातिशयोक्तीचें उदाहरण आहे. **व्यालास्यजन्मा**–सर्पाच्या तोंडांतून निघालेली. **सुधा**–( ओळ ४ )–विष. ती सेना साधूंच्या परित्राणाकरितां व दुष्कृतांच्या विनाशाकरितां होती असा अर्थ. **श्लोक ७.** अनेक राजांनीं शत्रुघ्नाचें वैभवयुक्त स्वागत केलें. पहिल्या तीन ओळींतील सामासिक शब्द 'अनेकमानववरश्री' याचीं विशेषणें होत. **रत्नस्वर्ण इ०**—रत्न व सोनें यांनीं अलंकृत. **गजघटा इ०**—हत्तींच्या समूहांच्या ज्या घंटा त्याच रुणझुणणारे पैंजण आहेत जिचे अशी. **स्यंदन**–रथ. **शुभयशोहास्या**–शुभकारक यश हेंच जिचें हास्य अशी. हास्य व यश यांचे रंग पांढरे म्हणून परस्पराला ती उपमा शोभते. **नानाभूप इ०**–अनेक राजांच्या मुकुटांतील रत्नें हींच आहेत दिवे किंवा नीरांजनें जिचीं अशी, अनेक राजांची लक्ष्मी शत्रुघ्नाला ओवाळून आलिंगन देती झाली. अनेक राजांनीं शत्रुघ्नाचें स्वामित्व स्वीकारून मोठ्या

वैभवानें त्याचें स्वागत केलें व प्रेम संपादलें असा अर्थ. **श्लोक ८.** शत्रुघ्नाचा पराक्रम. **मखवाजि इ०**–यज्ञाचा घोडा हरण करणारा राजांचा समूह. ज्या ज्या राजानें घोडा धरला त्याला शत्रुघ्नानें मोडून काढला ( मर्दिला ). **तच्चिताभसितें**–त्या राजाच्या चितेच्या राखेनें. **सितें**–पांढऱ्या. **कपर्दि**–शंकर. शत्रुघ्नानें त्या राजांच्या चिताभस्मानें शंकराची पूजा केली. म्हणजे त्यांची त्यानें राखरांगोळी केली, असा अर्थ. पर्यायोक्त. **तृणानन**–जो राजा दातीं तृण धरून आला ( शरण आला ), त्याला. **दिनेशसूनुकरीं**–यमाच्या हातीं दिला नाहीं. मारला नाहीं. **आत्मनामगतार्थ**–आपल्या नांवांतून निघणारा अर्थ. 'शत्रुघ्न' या नांवांतून 'शत्रूंना मारणारा' हा अर्थ, त्यानें आपल्या पराक्रमानें योग्य सिद्ध केला. **श्लोक ९. परिभवें**–पराभव केल्यामुळें. **दास्यपर**–सेवातत्पर. जे पूर्वी महामानी राजे होते, त्यांचा शत्रुघ्नानें पराभव केल्यामुळें, ते त्याचे सेवक बनले. **सेनानयननिकरातें**–सेनेच्या नयन-समूहाला. **कविश्रीवाल्मीक इ०**–वारुळापासून उत्पन्न झालेल्या विद्वान् मुनीचें राहण्याचें ठिकाण. **नवसुधा**–नवीन अमृत. त्या सेनेला तो वाल्मीकीचा आश्रम वाटेंत अमृताप्रमाणें आनंद देणारा झाला. वसति करावयास तें ठिकाण त्यांना मान्य झालें. **श्लोक १०. नंदनवनगर्व इ०**–नंदनवनाच्या गर्वाचा चोर अशा उपवनांत. वाल्मीकीचें उपवन ( बाग ) इंद्राच्या नंदनवनाचाही गर्व उतरविणारें होतें. **अवनीशवाह**–राजाचा घोडा, रामाचा घोडा. **स्वजवें इ०**–आपल्या वेगानें वाऱ्याच्या मनांत लज्जा उत्पन्न करणारा. घोड्यानें आपल्या वेगानें वाऱ्यालाही लाजविलें. प्रतीपालंकार. पहा–'नोहे हा पवन जवन वारु भासतो.' **श्लोक ११. गहनींच्या**–रानांतील. **मरकत इ०**–पांचेच्या समुदायाच्या तेजाच्या सवती. त्या दूर्वा इतक्या हिरव्यागार कीं, पाचेच्या मण्यांनाही त्यांचा सवतीमत्सर वाटावा. **हरिच्या**–घोड्याच्या. यांतील उपमा हृद्य आहे. **श्लोक १२.** तेथें लव, वनाचें रक्षण करीत होता. **करवाली**–तरवार धरलेला. **विप्रपुत्र इ०**–ब्राह्मणांच्या मुलांच्या घोळक्यासह. **ग्रहसंधानप्रयुक्त**–ग्रहांच्या मेळाव्यानें युक्त असा. **करमाली**–सूर्य. सूर्याच्या भोंवतीं जशा अनेक ग्रहमाला असतात, तसा लवाच्या भोंवतीं त्याचा मित्रपरिवार होता. **श्लोक १३. तेणें**–लवानें. **दूर्वांकुर इ०**–दूर्वांचे अंकुर खाण्यास आसक्त झालेला, घोडा ( हरी ). **त्याची श्री**–त्या घोड्याची शोभा. **तन्मानस इ०**–त्याच्या ( लवाच्या ) मनरूपी कमळास. त्याच्या हृदयास. त्या घोड्यानें त्याचें चित्त हरण केलें. **श्लोक १४.** लवानें घोडा

धरला. **नंदनवन इ०**–नंदनवनांतून चुकून आलेला इंद्राचा हा घोडा अशी भ्रांति ठाणें देऊन बसली आहे मनांत ज्याच्या, अशानें ( लवें ). हा इंद्राचा घोडा अशी लवाची पक्की समजूत झाली म्हणून त्यानें तो धरला. **कांतें**–वीरश्रीच्या पतीनें, वीरानें. **रुषाक्रांतें**–क्रुद्धानें. ( लवानें ). **श्लोक १५. हयभालबद्ध इ०**–घोड्याच्या कपाळावर बांधलेल्या सुवर्णपत्रिकेंत लिहिलेल्या मजकुरानें ( अर्थग्रह ) पेटला आहे गर्व ज्याचा, अशा ( कुशानुजें ). **कुशानुज**–कुशाचा धाकटा भाऊ लव. **खळश्रमदें**–दुष्टांना दुःख देणाऱ्यानें ( लवानें ). घोड्याच्या कपाळीं बांधलेली सुवर्णपत्रिका लवाला स्वतःला कमीपणा देणारी वाटली. त्याचा स्वाभिमान जागृत होऊन त्यानें घोडा केळीला बांधला. **श्लोक १६.** लव त्या सुवर्णपत्रिकेंतील मजकुरावर टीका करतो. **क्षितिदुहितृसुतें**–पृथ्वीच्या मुलीच्या मुलानें ( लवानें ) दृग्द्वयें संध्या तुच्छ केली. त्याच्या डोळ्यांतील रक्तिमा संध्यासमयाच्या रक्तिम्यापेक्षांही अधिक होता. त्यानें डोळे रागानें लाल केले, इतकेंच. **भूपाश्व इ०**–राजाच्या अश्वाचे रक्षक. **श्राद्धदेवालयाला**–यमसदनाला. **दवडतील**–पाठवतील; तुला मारतील. लवाला त्याच्या मित्रांनीं हा सल्ला दिला. **श्लोक १७. सभयसुहृज्जन इ०**–भ्यालेल्या मित्रांचें म्हणणें ( लपित ). **कुलोचित**–आपल्या क्षत्रिय कुलाला योग्य. **द्विषद्दलाक्रमणीं**–शत्रूंच्या सैन्याला जिंकण्याची बुद्धि धरून. **श्लोक १८.** लवाचें आपल्या मित्राशीं संभाषण. **विप्रस्त्री इ०**–ब्राह्मण आईच्या पोटीं जन्म घेतलेले ( तुम्हीं ). **क्षत्रियादेहभू**–क्षत्रिय आईच्या पोटीं जन्मलेला ( मी. ) मी जर घोड्यास सोडीन तर सर्व पृथ्वी मला–क्षत्रियाला–हंसणार नाहीं काय ? घोड्यासाठीं दुर्जनांनीं–शत्रूंनीं जरी मला मृत्यूच्या तोंडांत दिलें, तरी तो मृत्यु केव्हांही श्रेयस्कर ( असेंच मला वाटेल ). निदान लढून आलेल्या मृत्यूनें माझ्या आईच्या पोटीं घेतलेल्या जन्माला कालिमा तरी लागणार नाहीं. पहा–" परं श्रेयस्तु मरणं न लज्जा मामुपाव्रजेत्–" जैमि० २९।७४.

---

## अध्याय सातवा

घोड्याचा शोध करीत शत्रुघ्नाची सेना वाल्मीकीच्या आश्रमांत आली, व सर्वांनीं केळीच्या खांबाला बांधलेला घोडा पाहिला. शत्रुघ्नाचे लोक घोडा सोडून नेऊं लागले असतां, ' मला जिंकल्याशिवाय घोड्यास सोडतां येणार नाहीं,' असे लवानें स्पष्ट आव्हान दिलें. एवढ्यानें युद्धाला तोंड लागून लवानें सैन्याची

दाणादाण उडविली. शत्रुघ्नाला यामुळें राग येऊन तोही धावून आला व पुढें लव व शत्रुघ्न यांची रणधुमाळी झाली. शत्रुघ्नाच्या एका तीक्ष्ण बाणानें लव मूर्च्छित झाला, त्यावेळीं सर्व सेनेला आनंद झाला. पण लवाचा रामासारखा तोंडवळा पाहून शत्रुघ्नाला त्याची करुणा आली, व त्याला रथावर घालून सर्वजण घोड्यासह अयोध्येकडे चालूं लागले. हाच कथाभाग जैमिनी अश्वमेधाच्या तिसाव्या अध्यायांत आला असून त्याला 'लवमूर्च्छाप्राप्ती" हें योग्य नांव देण्यांत आलें आहे. **श्लोक १. चतुरंग**–हत्ती, घोडे, रथ व पायदळ यांनीं युक्त अशा सेनेला चतुरंग सेना म्हणतात. **जीच्या इ०**–शत्रुघ्नाच्या या सेनेनें उडविलेल्या धुळीनें (रजें) सूर्याला पृथ्वी दिसेना. धूळ सूर्यापर्यंत उंच जाऊन सूर्य दिसेनासा झाला. इतकी धूळ उडविण्याइतकी सेना अफाट होती असा अर्थ. **अन्योन्यशब्द इ०**–अन्योन्य शब्दग्रहणीं भेरी (बधिर झालेली) भेरी (नगारा) वृंदस्वनें (लोकसमुदायाच्या आवाजामुळें, स्व (आपला स्वतःचा आवाज, लटकेंचि घें (खोटाच मानी). परस्प-रांच्या आवाजानें बधिर झालेले नगारे, लोकसमुदायाच्या आवाजांत स्वतःचा आवाज होत नाहीं असें मानीत. नगाऱ्यांचा आवाज लोकसमुदायाच्या आवाजांत मिसळून गेल्यामुळें तो ऐकूं येईनासा झाला. काव्येतिहाससंग्रहाच्या पाठाप्रमाणें 'भें' व 'री' असे निराळे शब्द मानल्यास 'भें' याचा 'भीति' असा अर्थ लागेल पण 'री' याचा समाधानकारक अर्थ लागत नसल्यामुळें, तो पाठ अग्राह्य वाटतो. **श्लोक २. सादी**–घोडेस्वार. **तदीय**–घोडेस्वारांची (दृष्टी). **आसादी**–पकडी; पाही. केळीच्या खांबाला बांधलेल्या घोड्याकडे त्यांनीं पाहिलें. **श्लोक ३. लववयस्यस्तोमातें**–लवाच्या मित्रपरिवारास. दुसऱ्या ओळींत 'हरि' व 'रंभा' यांच्या श्लिष्ट अर्थांनीं पंतांनीं विनोद केला आहे. हा विनोद लवाचा उपहास करणाऱ्या योद्ध्यांच्या तोंडीं शोभतो. हरि–घोडा, इंद्र. रंभा–केळी. रंभा–अप्सरा. योद्ध्यांचा म्हणण्याचा आशय असा कीं, घोड्याला केळीला बांधून लवानें इंद्र व रंभा यांचा संबंध घडवून आणला व या पृथ्वीची अमरावती बनविली. एरव्हीं इंद्ररंभेचा हा संबंध किंवा योग अमरावतीशिवाय कोठें दिसणार? **क्षोणी**–पृथ्वी. **श्लोक ४.** लवाचे ब्राह्मणमित्र लवाचेंच नांव सांगून त्याला दगा देतात. **श्लोक ५. पूर्वाश्रमस्थ इ०**–चार आश्रमांपैकीं पहिला जो ब्रह्मचर्याश्रम, त्यांत असणाऱ्या ब्राह्मणांचें वचन म्हणजे त्या ब्रह्मचारी ब्राह्मणमुलाचें भाषण. **स्वात्मकानें**–आपल्या कानांनीं ऐकून, योद्धे म्हणतात. **श्लोक ६.** लवाचें योद्ध्यांना आह्वान. **तुरगमोचनोपक्रमीं**–घोडा

मोडण्याचा प्रयत्न (योद्धयाकडून) चालला असतां. **श्लोक ७. भट**–योद्धे. **स्वघोटक** इ०–आपला घोडा सोडण्यास. **करांसि हरी**–लवानें त्या वीरांचे हात तोडले. **धरणिधर इ०**–पर्वताचे पंख आपल्या वज्रानें इंद्रानें जसे तोडले त्याप्रमाणें ( उपमा ). **श्लोक ८.** सैनिक लवावर आयुधांची वृष्टि करतात. **धरणीवरि इ०**–हा लव पृथ्वीवर न राहो, मरो. **प्रधानीं**–मुख्य अशा आयुधांनीं. **श्लोक ९. श्री गौतमी-तोय इ०**–गोदावरी नदींत स्नान करणाऱ्या मानवाला ज्याप्रमाणें पातकें स्पर्श करीत नाहींत, त्याप्रमाणें लवाच्या अंगाला तीं घातक शस्त्रें शिवलीं नाहींत. यांतील उपमा जैमिनीची आहे. पहा–"यथा हि गौतमीतोये स्नातं पापचयो महान् । तच्छस्त्रसंघं चिच्छेद योगीव भवबंधनम्" ॥ जैमि० ३०।११. याचाच अनुवाद पुढील श्लोकांत केला आहे. **श्लोक १०.** लवानें शत्रुघ्नसैन्यांत केलेला हाहाकार. **धनुर्वल्लीस**–धनुष्यरूपीं वेलीस, धनुष्यास. **संसृतिबंधनाप्रति**–संसारबंधनास. योगी ज्याप्रमाणें जन्ममरणाचा फेरा तोडून टाकतो, त्याप्रमाणें. **अनेकपपक**–अनेकप + पक = हत्तींचे महात. **गृध्रव्रातवितान इ०**–गिधाडांचे कळप हेंच छत, त्याच्या सावलींत. **भूमंचकी**–जमिनीच्या पलंगावर. घोडेस्वार, पायदळ, सारथी व महात मेल्यामुळें, ते सर्व गिधाडांच्या पंखांच्या केलेल्या चांदव्याखालीं, जमिनीच्या पलंगावर निद्राच घेत आहेत कीं काय असे भासले. उत्प्रेक्षा. घोडेस्वार इ० रणभूमिवर मरून पडून गिधाडांच्या भक्ष्यस्थानीं पडत होते असा अर्थ. **श्लोक ११. शिवा**–कोल्ह्या. वीर मेल्यामुळें त्यांचे मृत देह कोल्हे व गिधाडे यांच्यांत वाटले गेले. वीरांच्या शवांची अशी शोचनीय अवस्था झाली. **वारण**–हत्ती. **शुंडादंडविहीन**–सोंडविरहित, सोंड तुटलेले. **वारण**–प्रतिबंध. **श्लोक १२.** रणांगणावरील लवाचें वर्णन. **कोदंड**–धनुष्य. **अक्षयी**–ज्यांतून बाणांचा तुटवडा कधींही पडत नाहीं असे (भाते). **जानकीसुनुभा**–सीतेच्या पुत्राची ( लवाची ) कांति. **रक्षोवृंदस्थ**–राक्षससमूहांनीं घेरलेल्या रामाची आठवण करून देई. लव हा रामाइतकाच पराक्रमी असा अर्थ. **ओळ ३.** त्या लवानें कोणाला म्हणून पांच पांच बाणांनीं जखमा केल्या नाहींत ? सर्वांना केल्या. कोणीही त्याच्या तडाख्यांतून सुटला नाहीं. **श्लोक १३. शार्दूलविक्रीडित**–वाघाची ( पराक्रमाची ) लीला. या सामासिक शब्दानें या श्लोकाचें वृत्तही खुबीनें सूचित केलें आहे. **रिपुघ्न**–शत्रुघ्न. **'तिष्ट' म्हणें**–लव शत्रुघ्नाला हा 'थांब' असें म्हणाला. **श्लोक १४. खर**–प्रखर, तीक्ष्ण. **वेधिले**–जखमी केले. **रथचक्ररक्षक**–रथांच्या चाकांचे रक्षक.

**चापज्या**–धनुष्याची दोरी. **श्लोक १५. नाराच**–बाण. **खदिरानळनिभ**–खदिराच्या निखाऱ्याप्रमाणें ( दाहक ). खदिराच्या लांकडाचे निखारे जास्त दाहक असतात. **श्लोक १६. स्मितजितौषधिपास्य**--आपल्या हास्यानें जिंकलें आहे चंद्राचें तोंड ज्यानें असा तो. ( सुंदर हास्य करणारा लव ). शत्रुघ्नानें भाषण ज्यानें हास्यावर घालविलें. इतका तो बेफिकीर होता. शत्रुघ्नाच्या बाणांना त्यानें कमलतंतुप्रमाणें मृदु लेखलें. **विगर्वित बाहुसारें**–(तुझ्या) बढाई मारलेल्या बाहुबलावरून. आतांपर्यंत ज्या बाहूंच्या बलाची तूं बढाई मारलीस त्याचा विचार करतां. **श्लोक १७. रौद्रेक्षणें**–रागानें लाल झालेल्या डोळयांनीं. **ध्वंसाकुलात्मा**–चाप, घोडे, सारथि व रथ यांच्या नाशानें भ्रांत झालें आहे चित्त ज्याचें, असा. लवानें त्याला एका क्षणांत त्याचे घोडे, सारथि वगैरे मारून भ्रांतचित्त केला. **तो**–शत्रुघ्न. **कार्मुक**–धनुष्य. **ओळ २.** शत्रुघ्न लवाला म्हणतो. **दे पाठ**–आतां पाठ दाखव, तुझा पराभव झाला, हें कबूल करून मागें फीर. **श्लोक १८. राघवें**–शत्रुघ्नानें. **ओळी ३।४.** तो बाण चांगला वेगवान् असूनही त्याचें अधःपतन झालें, त्याला खालीं पडावें लागलें. कसें ? तर खोटी साक्ष देणाऱ्यांचे पूर्वज स्वतःच्या पुण्यानें परलोकीं उत्तमगति पावले असले तरी आपल्या वंशजांच्या पापानें जसें त्यांचें पुनः अधःपतन घडतें तसें. 'सद्गतिमान्' व 'अधःपतन होणें' हीं विशेषणें 'बाण' व 'पूर्वज' या दोघांनाही लागू पडतात. या उपमेचें श्रेय जैमिनीकडेच जातें. पहा–"यथाहि पूर्वजाः पापात्स्वर्गाद्वै निपतंत्यधः । कूटसाक्ष्यंच ये कुर्युर्व्यवहारच्युतास्तथा ॥" जैमि. ३०।३२. **श्लोक १९. बाणासन**–धनुष्य. **ओळी ३।४.** पूर्वी ज्या बाणानें ( विशिखें ) ब्राह्मणशत्रु लवणासुराचें आयुष्य पिऊन टाकलें होतें, तोच शत्रुघ्नानें आतां लवाबरोबर लढतांना धनुष्याला लावला. **श्लोक २०. वन्हिनिभा इ०**–अग्नीप्रमाणें तेजस्वी बाण ( आशुग ) सोडून शत्रुघ्न लवाला म्हणाला. **समजला**–हा बाण अचूक ( अमोघ ) आहे, हें लवानें जाणलें, व तो म्हणाला, " या बाणाचा नाश माझ्या वडील भावानें ( कुशानें ) केला असतां, पण तो येथें आज नाहीं. तथापि माझ्या आईच्या पातिव्रत्याच्या पुण्याईनें हा मी तोडीन. हा भयंकर बाण तर आलाच." लवाला तो बाण थोडा आपल्या आटोक्याबाहेरचा वाटला. **श्लोक २१. तत्पूर्वार्ध**–त्या बाणाचें एका बाजूचे तुकडे. **छिन्नाहिनिभि**–तोडलेल्या सापाप्रमाणें दिसणारे. **स्वभंगहेतुकडे**–आपले तुकडे करणाऱ्याकडे, लवाकडे आले. **श्लोक २२.** लव मूर्च्छित पडतो. शत्रुघ्नानें अगोदर लवाचें धनुष्य छेदून मग

त्याच्या छातीवर प्रहार केला. **मोहभारें**—प्रबल मूर्च्छेनें. **नेत्रांबुजाला रजनि**—डोळ्यांना सर्व अंधकार झाला; तिरमिरी आली. **स्नपन**—स्नान. **शोणिताच्या**—रक्ताच्या. **श्लोक २३. महामानिला**—मानी अशा लवाला. **हतशेषवीरनिकरें**—टिकून राहिलेल्या वीरसमुदायानें. **श्लोक २४.** मूर्च्छित लवाला पाहून शत्रुघ्नाला दया आली. त्याला दया येण्याचें मुख्य कारण, लव हा रामाप्रमाणें दिसत होता. **छायावायु इ०**—सावली, वारा घालणें, व पाणी यांचे उपचार ज्याला केले आहेत असा ( लव ). मूर्च्छितावर हेच उपचार करावयाचे. **चालिला**—शत्रुघ्न हा कर्ता. पहा—"ततस्ते सेवकाः शीघ्रमंभोभिः सिषिचुर्लवम्। सजीवं रथमारोप्य पृष्ठतोऽश्वस्य ते ययुः ॥" जैमि० ३०।४४.

## अध्याय आठवा

मूर्च्छित लवाला रथावर बांधून नेल्याचें वृत्त ऋषिकुमारांनीं आश्रमस्थ सीतेला सांगितल्यावर तिला फार दुःख झालें. ती त्याचे सर्व गुण आठवून रुदन करूं लागली. यावेळीं आश्रमांत कुश व वाल्मीकि दोघेही नसल्यामुळें, आतां काय करावें हें तिला समजेना. इतक्यांत कुश अरण्यांतून परत आला. त्याला सीतेकडून लवानें घोडा धरल्याचें, व शत्रूंनीं त्याला बंदिवान् करून नेल्याचें सर्व वृत्त समजलें. तात्काळ तो आपलें धनुष्यबाण सिद्ध करून निघाला व त्यानें वाटेंतच शत्रुघ्नाच्या सैन्यास गांठलें. "एक तर लढण्यास तयार व्हा किंवा शरण येऊन माझ्या भावाला सोडा," अशी कुशानें गर्जना केली. शत्रुघ्नानेंही आपला सेनापति कुशावर पाठविला. कुशानें सेनापतीचा व त्याच्या नाग नांवाच्या भावाचा वध करून शत्रुघ्नाच्या सेनेचा पुरा मोड केला. या अध्यायाला 'कुशयुद्धवर्णन' हें नांव सार्थ आहे. **श्लोक १. लोचनांभोलवातें**—डोळ्यांतील पाण्याच्या थेंबांना, अश्रूंना. **पुस्तें**—पुस्तकें. **भूमिकन्यालयाला**—सीतेच्या आश्रमाला. **श्लोक २. पृथुक**—मुलें, ब्राह्मणकुमार. **मेध्य**—यज्ञाचा. **हरी**—घोडा. **दिव्यलिलाकरें**—आश्चर्यकारक किंवा मनोहर लीला करणाऱ्यानें, ( तुझ्या पुत्रानें, लवानें. ). 'लीलाकर' या शब्दानें कवीनें या वृत्ताचें नांव सुचविलें आहे. **नरवरहय इ०**-ब्राह्मण पुत्र सांगतात. " आम्हीं राजाच्या घोड्याला बांधूं नको असें म्हणून लवाला पुष्कळ प्रतिबंध केला." **बाणनिर्भिन्न इ०**—बाणांनीं जखमी केलेल्या पायदळ, घोडे, हत्ती व वीर यांच्या रक्तरूपी उदकानें नद्या वाहिल्या. रक्ताच्या नद्या वाहिल्या.

**वाहिनी**–नदी. **स्वात्मदेशाकडे**–आपल्या देशाकडे. **वाहिनी**–सेना. लवाला आपल्या रथावर घालून ती सेना आपल्या देशाकडे निघाली. प्रत्येक ओळींत प्रथम दोन नगण व पुढें सारखे रगण असें 'दंडक' वृत्ताचें लक्षण आहे. येथें चवथ्या ओळींत एक गुरु अक्षर मुळांत कमी आहे, तेथें आम्हीं 'तत्' हा शब्द योजला आहे. काव्य-संग्रहकार तेथें 'त्या' हा शब्द योजतात. **श्लोक ३. क्षमाजा**–सीता. **धर्म**–पतिव्रताधर्म.–हें वर्तमान (लव धरून नेल्याचें वर्तमान) ऐकून सीता म्हणाली, "माझा पतिव्रताधर्म नष्ट झाला नसेल तर कुश परत येईपर्यंत लव आपल्या आज्याला नमस्कार करण्यास (नतिस) स्वर्गास जाणार नाहीं." "मी जर खरी पतिव्रता असेन तर कुश येईपर्यंत, शत्रूंच्या हातीं सांपडलेला लव मरणार नाहीं. **श्लोक ४.** सीता लवाबद्दल शोक करते. **अकरुण भट इ०**–क्रूर अशा योद्धयांच्या बाणांनीं जखमी झालेल्या! **विवत्सा**–वत्सरहित. **कलीला**–भांडणास, युद्धास. **श्लोक ५.** सीता पुढें आणखी हळहळते. **अन्यमहीपवाहीं**–दुसऱ्या राजाच्या घोड्याच्या ठिकाणीं. **दुःखनदीप्रवाहीं**–दुःखनदीच्या प्रवाहांत, दुःखांत. **खरासी**–(खर+असि)=प्रखर तरवार. **दैवसृष्ट**–दैवानें उत्पन्न केलेली. मला यावेळीं मृत्यु कां येत नाहीं? असा अर्थ. **श्लोक ६.** सीता लवाचीं कृत्यें आठवून दुःख करते. "जातांना आश्रमाच्या आंगणांत जीं (लवाचीं) पावलें उमटलीं आहेत, तीं (लव नाहींसा झालासें पाहून) माझ्या हृदयास संताप देणारी झालीं आहेत. हे लवा! झाडांना व लतांना आळीं करण्याचें तुझें कौशल्य, व तूं जें जें हातानें केलेंस तें माझ्या हृदयाला जाळतें." **पद्मशोभाजितें**–कमलाची शोभा जिंकणाऱ्या तुवां. या श्लोकांतील दुसरी ओळ मुळांतून गळली आहे. म्हणून आम्हीं ती रचून घातली आहे. काव्यसंग्रहकारांनीं बनवून घातलेली ओळ 'होतीं तीं हृदयास या इषुपरी अत्यंत संतापदें' अशी आहे. पण सीतेसारख्या स्त्रीच्या तोंडीं 'बाणांप्रमाणें दुःखद' ही उपमा अयुक्त वाटल्यावरून, ती आम्हीं स्वीकारली नाहीं. काव्येतिहाससंग्रहकारांच्या प्रतींत ही ओळ नाहीं. **श्लोक ७.** सीता पुढें म्हणते. **उडुपनिभ**–चंद्रासारखें. **स्मृतिगत होऊन**–आठवण होऊन. **शोकक्षितिध्र इ०**–शोकरूपी पर्वत भेदण्यास योग्य. **पवितें धरिता**–वज्राला धारण करणारा (इंद्र) ज्याप्रमाणें पर्वतांना भेटण्यास समर्थ होतो, तसा हा लव माझ्या शोकरूपी पर्वताचा भेद करण्यास केव्हां समर्थ होईल? मी शोकमुक्त केव्हां होईन? **श्लोक ८. लवहिरण्यातें**–लवरूपी सुवर्णास. परंपरितरूपक. **श्लोक ९. शोकदीक्षा**–शोकाची दीक्षा घेऊन; एकसारखा शोक करून. **पुत्रपथप्रतीक्षा**–कुशाची

मार्गप्रतीक्षा, वाट पाहणें. **गृष्टी**–नुकती प्रसूत झालेली गाय. नुकत्याच व्यालेल्या गाईचें, वासरांवर अधिक प्रेम असतें. त्या प्रेमाची उत्कटता वर्णिली आहे. **श्लोक १०. क्षयाला**–घरास. **मातृदृगब्जअर्क**–आईच्या दृष्टिरूप कमळांचा सूर्य. आईचे डोळे आनंदित करणारा, निववणारा. **श्लोक ११.** आपण वनांतून आलों, तरी लव पुढें कां येत नाहीं, याबद्दल कुश शंका काढतो. **दवाला**–अरण्याला. "सकाळीं माझ्याबरोबर अरण्यांत येण्यास निघालेल्या लवाला मी नको म्हटलें म्हणून रागावून तो पुढें येत नाहीं काय? आजच्यासारखें ( ओस ) घर ( निकाय ) कधींच दिसलें नाहीं." लवाला धरून नेल्याची कुशाला कांहींच वार्ता नव्हती. **श्लोक १२.** कुशानें वनांत कांहीं दुश्चिन्हें पाहिलीं, तीं आतां त्याला आठवलीं. **देहीं**–स्वतःच्या शरीरावरही, कांहीं अपशकून कुशानें पाहिले. हे लवाच्या नाहींसें होण्याचे सूचक होते. **चिंतानदी इ०**–( कुशानें ) आपली चिंतानदी विवेकाच्या सूर्यकिरणांनीं आटविली. सारासार विचारानें आपली चिंता कुशानें बाजूला सारली. **श्लोक १३. निजोटजांतीं**–आपल्या आश्रमाच्या कोंपऱ्यांत. **द्विडिभांकुशानें**–शत्रूरूपी हत्तींच्या अंकुशानें. शत्रूंना वठणीवर आणणाऱ्या कुशानें. **स्वपुत्र इ०**–आपल्या पुत्राच्या ( लवाच्या ) दुःखानें उन्मळून पडली आहे अंगरूपी लता जिची अशी. **अरण्याग्नि इ०**–वनांतल्या अग्नीनें दग्ध झालेल्या मालतीप्रमाणें. **श्लोक १४. अश्रुप्रवाह इ०**–अश्रूंनीं धुतली आहे अंगकाठी जिची. **वायुवारी**–वारा व पाणी. मूर्च्छित सीतेला कुशानें सावध केली. **श्लोक १५.** कुश सीतेचें सांत्वन करतो. **व्यसुता**–मरण. "तुझ्या पोटीं येऊन जर मी तुझें दुःखनिवारण केलें नाहीं, तर मरण बरें." **श्लोक १६. तुला**–तुलना, तुझ्या श्रमाला दुसरी तुलना नाहीं. **वक्त्रनिशीन**–( वक्त्र + निशि + इन )–मुखचंद्र. **श्लोक १७.** कुश लवाची पृच्छा करतो. **वाल्मीकि इ०**–वाल्मीकीच्या पायांच्या ठिकाणीं नम्र असणारा. **त्वदंघ्रि इ०**–तुझ्या चरणांच्या सेवारूप कमलिनीवरील भ्रमरमुख्य. तुझ्या पायांची सेवा करणारा. **वेदपयोधि इ०**–वेदसमुद्रांतील मासा, वेदपारग. **श्लोक १८.** सीता लवाचा वृत्तांत सांगते. **दुःखक्ष्माध्र**–दुःखाचा पर्वत. माझ्यापुढें दुःखाचा डोंगर उभा केला. **श्लोक १९. मम भुज नको छेदूं**–'हे दैवा! माझ्या दोन हातांसारख्या असणाऱ्या पुत्रांपैकीं माझा एक हात ( लव ) तोडूं नको.' **करुणापांगें**–कृपाकटाक्षानें ( सीता आपल्या आईची, पृथ्वीची करुणा भाकते ). **श्लोक २०. प्रलापबीज**–विलापाचें, शोकाचें कारण. **श्लोक २१.** कुश आपल्या आईला धीर

देतो. **त्यातें**–शत्रूतें. **आहवीं**–युद्धांत. **जिंकूनि इ०**–तुझ्या मुलाला जिंकून पृथ्वीवर कोण जिवंत राहील ? तुझा पुत्र अजिंक्य आहे, असा अर्थ. **श्लोक २२. विषंग**–भाता. **वर्म**–चिलखत. **चर्म**–ढाल. **तवसुत**–हा तुझा पुत्र कुश. **श्लोक २४.** कुशाच्या रागाचें येथें उत्तम वर्णन केलें आहे, पण तो जैमिनीचाच अनुवाद दिसतो. पहा–" विस्फारयन्धनुश्चोग्रं जगाम त्वरितो बली । यथा मत्तद्विपान्सिहीतनयोऽभ्येति निर्भयः ॥ " जैमि० ३१।३२. **श्लोक २५. क्ष्मापुत्रीचा इ०**–सीतेचा शोक नाश करणारा. लवाची सुटका करून सीतेचें दुःख हरण करणारा. **श्लोक २६.** कुशाचें योद्धयांना आव्हान. **मौर्वी**–धनुष्याची दोरी. **ममानुजातासि**–माझ्या धाकट्या भावास. **श्लोक २८.** पृथ्वीवर धनुष्य तरी रोखा किंवा पृथ्वीवर तुमचें मस्तक तरी नम्र करा. लढा किंवा शरण या असा अर्थ. **द्रुत**–सत्वर. तुम्हीं आपल्या जीविताची इच्छा तरी सोडावी किंवा आमचा लव तरी सोडावा. काव्यसंग्रहकारांनीं वृत्तसुखार्थ पहिल्या ओळींत 'तुम्ही' ऐवजीं 'वा' असा पाठ स्वीकारला आहे. पण अर्थाच्या दृष्टीनेंही एकाच ओळींत 'वा' व 'तऱ्ही' असे दोन विकल्पसूचक शब्द अयोग्य वाटल्यावरून आम्हीं 'काव्येतिहाससंग्रहा'प्रमाणें 'वा' बद्दल 'तुम्ही'ची योजना केली आहे. **श्लोक २९. प्रोद्दाम**–उद्धट. **काळ**–यम. शत्रूंना कुश यमाप्रमाणें भासला. **उद्यद्वायूत्थ इ०**–उठलेल्या वावटळीनें उडालेला धुळीचा लोट. **व्योमगर्भांत**–अंतराळांत. **शीर्ण झाल्या**–फाटून गेल्या. **मग इ०**–मग शमनीं ऱ्हेषितें आणि हाका, शांत झाल्या असा अन्वय. मग सर्वत्र मृत्यु पसरल्यावर घोड्यांचीं खिंकाळणीं ( ऱ्हेषितें ) व योद्धयांच्या हांका थांबल्या. येथें अनेक कर्त्यांना एकच क्रियापद असल्यामुळें क्रियादीपक अलंकार होतो. **श्लोक ३०. व्यूह**–ही एक विशेष आकृतीची सेनेची रचना आहे. चक्रव्यूह, मकरव्यूह इत्यादि व्यूहरचना प्रसिद्ध आहे. **बळरमण**–सेनापति. **दिग्बाण**–दहा दिशा इतके बाण, दहा बाण. ज्या बाणांचीं तोंडें प्रखर, ( तीक्ष्ण ) व कांडीं विस्तृत ( आततें ). **श्लोक ३१. तो भटपति**–योद्धा कुश. **पार्ष्णिग्राह**–पिछाडीला असणारा शत्रु ( An enemy in the rear ), त्याला घोड्यांना व सारथ्याला, कुशानें यमलोकास धाडलें. **चापांगत्राण इ०**–चाप+अंगत्राण ( चिलखत )+तूण ( भाता ),+असि ( तरवार ), रथवर ( उत्तम रथ ) व किरीट इत्यादींना आपल्या बाणानें छेदून. **त्यासि**–सेनापतीस. **नाकासि जाणें घडवी**–स्वर्गास जाणें भाग पाडी; मारी. **श्लोक ३२. तद्बंधु**–सेनापतीचा बंधु. **नागाभिध**–नाग नांवाचा. जैमिनीनें 'नग' असें याचें नांव दिलें आहे. पहा–" सेनावाहं हतं

दृष्ट्वा भ्राता तस्य नगाह्वयः ।" जैमि. ३१।४८. **हस्तिमस्तकग**–हत्तीच्या गंडस्थलावर बसलेला. **तद्वारण**– नागाचा हत्ती. **छिन्नांघ्रि**–तोडलेले आहेत पाय ज्याचे असा. **श्लोक ३३. नागापासुनि**–हत्तीवरून. **नाग**–सेनापतीचा भाऊ ( उपरिनिर्दिष्ट ). **तीनें** इ०–गदेला त्याच्या हातासहित खालीं पाडली. गदा धरलेला हात तोडला. **शय**– हात. **श्लोक ३४. धूलीधूसर इ०**–धुळीनें मळलेलें व रक्तानें ओलें चिंब झालें आहे शरीर ज्याचें असा. **स्वांतीं**–आपल्या मनांत कुशानें त्याची स्तुतीच ( स्तव ) केली. शत्रूच्या पराक्रमाचीही प्रशंसा करण्याचें औदार्य कुशांत होतें. **मखहा**–शंकर. **घे मुंड मालेस्तव**–कुशानें नागाला मारल्यावर शंकरानें त्याचें शिर आपल्या गळ्यांत रुंडमाला करण्यासाठीं घेतलें. शंकर, लढाईत शौर्यानें मेलेल्या वीरांचींच शिरें रुंडमालेस्तव घेतो. नागाच्या शिराला हा मान मिळाला असा अर्थ. **श्लोक ३५. पादाताश्व इ०**– पायदळ, घोडे, पर्वताप्रमाणें शोभणारे हत्ती ( इभ ). **क्ष्मातळीं**–पृथ्वीवर. **सद्यशोणित इ०**–ताजें रक्त पिण्यास उत्सुक अशा कोल्ह्याची व गिधाडांचीं तोंडें भाजत. नुकत्याच मेलेल्या वीरांचीं रक्तें ऊन असल्यामुळें, वरील प्राण्यांचीं तोंडें पोळत असा अर्थ. **श्लोक ३६. वारणशिरीं**–हत्तीच्या गंडस्थळावर. **कार्तस्वररत्न इ०**– सुवर्ण व रत्नांनीं भूषित अशा रथांत. **तद्बाणाहत**–कुशाच्या बाणानें मेलेले. ते योद्धे अधःपतन भोगते झाले, खालीं पडले. कसे? तर, कन्येच्या द्रव्यावर, कन्येचा विक्रय करून जो उपजीविका करतो त्याचे पूर्वज जसे अधःपतन पावतात, तसे हे योद्धेही अधःपतन पावले. यांतील उपमेचें श्रेय मोरोपंतांना देऊन, त्यांच्या वेळच्या समाजस्थितीचा जो तर्क काव्यसंग्रहकरांनीं काढला आहे तो बरोबर नाहीं. कारण ही उपमा पंतांची नसून जैमिनीची आहे. त्यावरून वरील दुष्ट चाल जैमिनीकालींही रूढ असून तिचाच त्यानें निषेध केला आहे. पहा– "हस्त्यश्वरथसंघाताः पदातान्यपतन्भुवि । विष्णुभक्तिमकुर्वाणाः संसृताविवचाधमाः ॥ ६३ ॥ कन्या वित्तेन यो जीवेत्तदीयाः पितरो यथा ।" जैमि० ३१।६३, ६४. **श्लोक ३७. द्विग्महेभांकुशानें**–शत्रूरूपी महागजांचा जो अंकुश, अशा कुशानें, त्यांचें सैन्य क्षीण केलें. कसें तर, वेदशास्त्रोक्त धर्मानें कुकर्में जशीं क्षीण होतात, तसें. वेदविहित कर्मांनीं वाईट कृत्यें नाश पावतात. पहा–"एवं विनिहतं सैन्यं रथनागसमाकुलं । कुशेन तेन वीरेण स्वधर्मेणेव दुष्कृतम् ॥" जैमि० ३१।६५.

## अध्याय ९ वा

कुशानें शत्रुघ्नाच्या हृदयावर प्रहार करून त्याला मूर्च्छित केलें. याच वेळीं लवही सावध होऊन त्यानें आपल्या सुटकेस आलेल्या कुशास आलिंगन दिलें. युद्धांतून जीव घेऊन पळालेल्या कांहीं सैनिकांनीं, रामाला लवानें घोडा बांधल्याचें व कुशानें शत्रुघ्नाच्या सेनेची दाणादाण उडवून त्याच्या सेनापतीलाही मारल्याचें, सर्व वर्तमान सांगितलें. हें एकून रामाला अत्यंत दुःख झालें, व घोडा सोडवून आणून त्या ब्राह्मणपुत्रांना ( कुशलवांना ) शिक्षा करण्यासाठीं, लक्ष्मणाला त्यांनीं रणांगणावर पाठविलें. रामाज्ञेप्रमाणें लक्ष्मण मोठ्या सेनेसह निघाला. या कथाभागास अनुलक्षून जैमिनीनें या अध्यायास 'लक्ष्मणागमन' असें नांव दिलें आहे. **श्लोक १. तो**–कुश. **त्याचे**–बाणाचें. **रज**–पीठ, चूर्ण. **अनिलकरें**–वाऱ्याबरोबर. बाणाचें व रथाचें कुशानें केलेलें चूर्ण वाऱ्यानें आकाशांत उडालें. **रथोपस्थदेशीं**–रथाच्या एका कडेला. **करट**–कावळे. कुशानें शत्रुघ्नाच्या सेनेच्या मांसाचे तुकडे, बगळे, कावळे, कोल्हे व गिधाडें यांना वाढले. **श्लोक २.** शत्रूसेनेची दाणादाण. **तत्करें गळाले**–कुशाच्या हातून सुटले. **विमोह**–सावध. **अग्रजाला**–वडील भावाला, कुशाला. **श्लोक ३. अनवद्य**–स्तुत्य. **कटक**–सैन्य. **तुरंगमातें**–घोड्याला. सावध झाल्यावर लव घोड्याला धरण्याचीच भाषा बोलतो. **श्लोक ४. सीतापुत्राची**–कुशाची. **वाय्वग्नीसे**–वायु व अग्नि यासारखे परस्परांना मदत करणारे. **श्लोक ५. साकेत आसादिलें**–अयोध्या गांठली. **स्वस्वांती**–आपल्या मनांत. आपण जीव बचावून आलों हें मोठेंच कृत्य आपण केलें असें ते मनांत म्हणाले. **तद्दृग्भृंग**–त्याचे डोळे हेच भ्रमर. **रघूत्तमांघ्रि इ०**–रामाच्या पदकमलाच्या स्वादासाठीं. **झेपावले**–उडी टाकली. रामाच्या पायांना ज्यांनीं मोठ्या उत्सुकतेनें वंदन केलें. **श्लोक ६.** यज्ञाची दीक्षा घेतलेल्या रामाचा वेष वर्णन करतात. **रुरुचर्म**–हरिणाजिन. **सभाजित**–अलंकृत. **स्वर्णभूतनया इ०**–सीतेच्या सुवर्णप्रतिमेनें युक्त. **भूमिदेव सभाजित**–ब्राह्मणांनीं अलंकृत. "पृथ्वीवरच जिंकिली आहे देवसभा ज्यानें" असा काव्यसंग्रहकारांचा अर्थ थोडा ओढाताणीचा वाटतो. पण 'सभाजित' याचा अलंकृत असा अर्थ दुसऱ्याही ओळींत केल्यास यमकांत भिन्नार्थता येत नाहीं हेंही खरें आहे. **विलोहितेक्षण**–होमाच्या धुरानें तांबडे झाले आहेत डोळे ज्याचे. **दीक्षित**–अश्वमेधाची दीक्षा घेतलेला. **श्लोक ८. रविनंदनलोकमार्ग**–यमपुरीचा मार्ग. ज्यांनीं घोडा धरला त्यांना मृत्यु ठरलेलाच होता. **श्लोक ९.** ते पळून आलेले वीर लवकुशांना ब्राह्मणकुमार समजून रामाला, सर्व वृत्तांत

सांगतात. **तदग्रज दुजा**—दुसरा त्याचा थोरला भाऊ (कुश). **श्लोक १०. सानुज**—बंधूसह, नागासह. **शार्दूलविक्रीडित**—वाघाचा पराक्रम. येथेंही या शब्दानें वृत्ताची सूचना दिली आहे. **तत्साध्वसें**—त्या कुशाच्या भयानें. **श्लोक ११.** रामाचें भाषण. **पिशाचाविष्टोक्तासमान**—पिशाचानें झपाटलेल्या माणसाच्या बोलण्याप्रमाणें (तुमचें बोलणें मला दिसतें). **प्रजल्प**—बडबड. **मदनुजनिला**—माझ्या कनिष्ट बंधूला. **न विष्णु**—पण राम प्रत्यक्ष विष्णूचा अवतार होता ना? मग त्यानें असें कां म्हणावें? **वृत्रहा**—इंद्र. चवथी ओळ पंतांनीं स्वकल्पनेनें रचली आहे. जैमिनीचा तिला आधार नाहीं. पहा—"पैशाच्यं किमु युष्माकं शत्रुघ्नः केन पात्यते ।" जैमि० ३२।१५. **श्लोक १२. ओळी २।३.** "तुझ्या नामाचें स्मरण मायेचा नाश करून ब्रम्हज्ञान देणारें आहे. मग (तुझें स्मरण करणाऱ्या आम्हाला) पिशाच्चबाधा कशी होईल?" **श्लोक १४. गोष्पदीं**—चिखलांत उमटलेल्या गाईच्या पावलांत सांठलेल्या पाण्यांत. शत्रुघ्नासारख्या वीराला ब्राम्हणकुमारांनीं नामोहरम करणें म्हणजे, कोल्ह्यानें सिंहाला मारण्याइतकें किंवा गोष्पदांत हत्ती बुडण्याइतकें अशक्य व हास्यास्पद आहे. **श्लोक १५.** रणांगणावर जाऊन त्या ब्राम्हणकुमारांना शिक्षा करण्याची आज्ञा राम, लक्ष्मणास करतात. **लवणरिपुचिया**—लवणराक्षसाच्या शत्रूच्या. शत्रुघ्नाच्या मृत्यूपाशांना तोड. शत्रुघ्नाला मृत्यूपासून सोडीव. **मद्यशोघ्नासि**—माझ्या यशाचा नाश करणाऱ्यांना (ब्राम्हण पुत्रांना). **दंडी**—शिक्षा कर. **त्वां पुत्रें इ०**—सर्व देवांची माता म्हणून अदिति जशी वंद्य झाली, तशी तूं पुत्र झाल्यामुळें, तुझी-माझी-आई सुमित्रा वंद्य झाली. **श्लोक १६.** लक्ष्मणाची सेना. **तत्सेनाहत इ०**—त्याच्या सेनेनें वाजविलेल्या नगाऱ्यांचा आवाज स्वर्गापर्यंत पोंचला. ते सर्व वीर (भट) एकपत्नीव्रत पाळणारे होते, म्हणून त्यांच्या ठिकाणीं प्रबल शौर्य होतें (प्रोद्दामवीर्यास्पद). ते आपल्या जीविताला तृणवत् व समुद्राला गोष्पद मानणारे होते. जिवावर उदार होणारे होते. **श्लोक १७. खुरकुट्टण**—खुरांचें आपटणें. **ओळ २.** घोड्यांच्या खुरांच्या आपटण्यानें जे दगड चुरा झाले, त्यांचे रजःकण स्वर्गापर्यंत पोंचले. आकाशांत उंच गेले. **भूभृत्कल्प इ०**—पर्वताप्रमाणें (भूभृत्कल्प) असणारे जे हत्ती (मतंगज), त्यांचे जे उद्दाम असे समूह, त्यांच्या भारानें आकुल झालें आहे अंग जिचें अशी पृथ्वी (धरा), जणु काय आपल्या नातवाचा (कुशाचा) वध होईल या भीतीनेंच कांपत होती. हेतूत्प्रेक्षा. मोठमोठ्या हत्तींच्या भारानें पृथ्वी भाराक्रांत

झाली होती. पण कवीला असें वाटलें, कीं, ती आपल्या मुलीच्या मुलाच्या वधाच्या भीतीनेंच जणु कांपत आहे. **श्लोक १८. धुनी**–नद्या. त्या सैन्याच्या भीतीनें शत्रूच्या स्त्रियांच्या डोळ्यांतून ( अश्रूंच्या ) नद्या वाहिल्या. त्या सैन्याच्या भीतीनेंच शत्रु मेल्यामुळें, त्यांच्या स्त्रियांच्या कपाळीं रडणें आलें. पर्यायोक्त. **ओळ २.** जेवढें म्हणून तृण होतें तेवढें रामाच्या शत्रूच्या तोंडांत बळेंच शिरलें. रामाचे शत्रु लक्ष्मणापुढें दातीं तृण धरून आले, त्याला शरण आले. **रामसुरद्रु इ०**– रामरूपी कल्पद्रुम व रामाचे गुणरूपी लता, यांनीं सोडलेलीं ( लोकांचीं तोंडें. ) रामांना टाकलेलीं व रामाचें नांव जे घेत नाहींत अशा लोकांचीं तोंडें, लता वृक्ष-हीन वनाप्रमाणें शोभत नव्हतीं. **श्लोक १९. धरासंस्थ**–पृथ्वीवर पडलेला. **जीवशेष**–श्वासोच्छ्वास फक्त राहिला आहे असा. पहा–" ददर्श वीरं विकलं सुकेशं शत्रुघ्न मात्यंतिक जीवशेषम् ॥ " जैमि. ३२।३७.

---

## अध्याय दहावा

लक्ष्मणाचें सैन्य आपल्यावर चालून येत आहे, असें पाहून कुशलवांना मोठा विचार पडला. लवानें सूर्याची आराधना आरंभिली. सूर्यानें प्रसन्न होऊन लवाला एक धनुष्य दिलें. त्याच्या बळावर कुशलवांनीं प्रयत्नांची शिकस्त केली. लक्ष्मण व त्याचा सेनापति काळजित, हे कुशाला रोधीत असतां एकट्या लवानें त्यांच्या सर्व सेनेची भंबेरी उडविली. दोन्हीबाजूंनीं अनेक शस्त्रास्त्रांचा मारा झाला. शत्रुघ्नानें लवणाक्ष राक्षस मारल्यावर त्याचा मामा रुधिराक्ष हा रामांना शरण आला होता. तोही या युद्धांत सामील होऊन लवाशीं अंतरालांत युद्ध करीत होता. शेवटीं तोही लवाकडून मारला गेला. लव सर्व सैन्याकडून वेढला गेला तरी त्यानें सर्वांचें मर्दन केलें. यास अनुसरून ' लवयुद्धविजय ' असें या अध्यायाला नांव देण्यांत आलें आहे. **श्लोक १. दुष्प्रधर्ष**–मोडण्यास अशक्य. यांत लवाचा आत्मविश्वास चांगला व्यक्त झाला आहे. **श्लोक २.** लव कुशास म्हणतो. " हें सैन्य तुझ्याबरोबर युद्ध करण्याच्या लायकीचें नाहीं, इतकें तें क्षुद्र आहे. अगस्तीला जसा समुद्र प्राशन करतांना तृणवत् वाटला, तसेंच हें सैन्य मला भासत आहे. " **लोकबंधु**–सूर्य. पहा– ' लोकबंधू तो होय रवी ऐसा '-नलदमयंती स्वयंवर. आपलें चाप मोडलें असतां लवासारख्या सूर्यवंशीयानें अशा संकटकाळीं सूर्याच्या तोंडाकडे पाहावयाचें नाहीं

तर कोणाकडे ? **श्लोक ३.** लवानें केलेली सूर्यस्तुति. हीच जैमिनीनें अध्याय ३३।१०–१७ या श्लोकांत घातली आहे. **तिमिरद्विपहर्यक्षा**–अंधकाररूप हत्तीच्या सिंहा ( हर्यक्ष ). अंधकार नाशका ! **तेजःपक्षा**–तेजःपुंजा ! **क्षतामरविपक्षा**–जखमी केलेले आहेत देवाचे शत्रू, राक्षस ज्यानें असा तूं. **दे मज चाप**–लवानें सूर्याजवळ धनुष्याची मागणी केली. **श्लोक ५. धनुव्रतति**–धनुर्वल्लि, धनुष्य. सूर्यापासून धनुष्य मिळाल्यावर लवाला, आतां सर्व निर्विघ्न होणार असा भरंवसा वाटला. **श्लोक ६. विभावसु**–अग्नि. **मांसकर्दमपटें**–मांसाच्या चिखलाच्या थरानें. **रक्तस्रवंती**–रक्ताच्या नद्या. **श्लोक ७. सेनानी**–सेनापति. **घनरवहा**–मेघनादाला मारणारा ( लक्ष्मण ). **वरिली**–कह्यांत घेतली. **श्लोक ८.** लवाची बेफिकीर वृत्ति. **अनलसा**–अग्नीप्रमाणें. **ओळ २**–ज्याचे भुज ( दोर्वल्ली ) शरसंधान करण्यांत आलस्यरहित ( तत्पर ) होते. **इभ**–हत्ती. **वीरविहिता**–वीरांनीं युक्त अशा. **श्लोक १०.** अनेक आयुधांचीं नांवें येथें दिलीं आहेत. **शूलगदा इ०**–शूल ( भाला ), परशु ( कुऱ्हाड ), असिलता ( तरवार ), शक्ति ( पोलादी गोळा ) ऋष्टि ( दुधारी तरवार ), कुंत, ( हा दुसऱ्या प्रकारचा भाला दिसतो ). **प्रास**–( फेंकण्याचा भाला ), **भुशुंडि**–( a kind of weapon–Apte ) मुद्गर ( गदा ), महापाश ( मोठा दोऱ्यांचा पाश ). **ओळ ४.** ही ओळ पंतांनीं स्वतः कल्पिलेली दिसते. जैमिनीच्या ग्रंथांत याला आधार नाहीं. **श्लोक ११.** प्रावण्मेघापरी–वर्षाकालांतील मेघाप्रमाणें. **भूमिध्र**–पर्वत. **श्लोक १२. शरासन**–धनुष्य, ( लवाचें ). **तो**–रुधिराक्ष राक्षस. **व्योमीं**–आकाशांत. **श्लोक १३.** लव व रुधिराक्ष यांच्या आकाशांतील युद्धाचें वर्णन. **आमिषलुब्ध**–मांसावर लुब्ध झालेले. **श्येन**–ससाणा. **चक्रें शक्रानुजसा**–चक्र घेतल्यामुळें लव इंद्राच्या भावाप्रमाणें ( विष्णूप्रमाणें ) शोभला. **श्लोक १४. हा माथां इ०**–लव आकाशांत युद्ध करीत असल्यामुळें, तो आपल्या डोक्यावर केव्हां पडेल अशी प्रत्येकाला भीति वाटली. **मृतेभांतरीं**–मेलेल्या हत्तींच्या खालीं. **चर्मासि**–ढालींना. **श्लोक १५. दिक्स्यंदनाच्या**–दशरथाच्या प्रधानाचे जे जितश्रमादि दहा पुत्र होते. **रुडनळें**–क्रोधाग्नीनें. ( लवाच्या अंगाची आग ( दहा ) झाली. **परिघ**–चक्र. **ओळ ४.** यांतील उपमेला जैमिनीचाच आधार आहे. पहा–" वेदबाह्याः कुशास्त्रज्ञा विष्णुभक्तिविवर्जिताः । मातापित्रोर्भक्तिहीना नास्तिका रौरवे यथा ॥ " जैमि० ३३।४७. **श्लोक १७.** दुसऱ्या ओळींतील वेदांती उपमा जैमिनीची आहे.

मोरोपंत सहसा अशा वेळीं जैमिनीचाच अनुवाद करतात. पहा–" ततःसैन्येन महता वेष्टितः पुनरेव सः । गर्भस्थोहि यथा जंतुरज्ञानेन बहिस्थितः ॥ जैमि० ३३।५२. **श्लोक १८. तृणेंधनाच्छादित**–तृणानें व सर्पणानें आच्छादित अशा. **आश्रयाश**–अग्नि. पहा–" तृणैरावेष्टितो वन्हिस्तान्येव दहति ध्रुवं । तद्वत्स बालस्ततसैन्यमदहत्कोपपूरितः ॥ जैमि० ॥ ३३।५४.

## अध्याय अकरावा

कुशाचें व लक्ष्मणाचें घनघोर युद्ध झालें. कुशानें आग्नेयास्त्र सोडावें तर लक्ष्मणानें त्यावर उतारा म्हणून जलास्त्र सोडून पुनः मारुतास्त्र सोडावें, असा प्रकार चालला होता. सेनापतीला जेव्हां कुशानें मारला, तेव्हां तर लक्ष्मण फारच खवळला. दोघांमध्यें पुनः दारुण रण झालें. पण कुशाच्या बाणांनीं लक्ष्मण मूर्च्छित पडला, व त्याच्या सैन्याच्या संहारानें सर्वत्र रक्ताच्या नद्या वाहिल्या. इतका कथाभाग येथें आल्यामुळें, ' लक्ष्मण-सेनापराजय' असें नांव जैमिनीनें या आध्यायाला दिलें आहे. **श्लोक १. योग झाला**–दोघांची गांठ पडली. **मृगराड्**–सिंह. **घनरवरिपु**–मेघनादशत्रु (लक्ष्मण). **स्यंदन**–रथ. ( रथ माघारा घेऊं नको ). **पिशितें**–मांसानें. **कोले**–कोल्हें. **श्लोक २. भोवेंकरिता**–फेरे घेत असतां, फिरत असतां. येथें 'भोवें' असाच काव्येतिहाससंग्रहकारांचा पाठ मान्य करणें जरूर आहे. कारण जैमिनीनंही याच अर्थाचें वर्णन आपल्या ग्रंथांत केलें आहे. पहा–" तेन बाणेन सरथो बभ्राम घटिकाद्वयम् ॥ अति भ्रमेण चत्वारो वाजिनः पंचतां ययुः ।" जैमि० ३४।३,४. **तो**–कुश. **वर्म**–कवच. **हरिपदीं**–विष्णूच्या पायजवळ वैकुंठांत–आकाशांत. त्यानें त्याचें किरीट आकाशांत उडविलें, असाही अर्थ होईल व तो बराही आहे. कारण ' धाडी ' या क्रियापदानें कवीला तोच अर्थ सूचित करावयाचा दिसतो. त्यामुळें ' घोड्याच्या पायांत ' हा काव्यसंग्रह-कारांचा अर्थ युक्त नाहीं. **श्लोक ३. वैरिता**–शत्रुत्व. या श्लोकांतील कुशाचें भाषण खोंचदार व छद्मी आहे, हें काव्यसंग्रहकारांच्या लक्षांत आलेलें दिसत नाहीं. या प्रसंगींचे मूळ जैमिनीचे श्लोक पाहिले असतां, वरील वक्रोक्ति लक्षांत येते. कुश म्हणतो–" हे लक्ष्मणा ! बहार केलीस. माझ्याशीं असणारें आपलें शत्रुत्व सोडून ( मला मित्र किंवा आपला मानून ), रणांत तूं माझें बळ हरण केलेंस ( घेतलेंस ) हा जो तुझा माझ्यावर उपकार झाला

त्याची फेड मी तुझ्या बळाच्या हरणानें करीन. मित्रत्वाच्या नात्यानें माझें बळ नेऊन तूं जो माझ्यावर उपकार केला आहेस, त्याची परत फेड मी तुझें बळ हरण करून करीन. जैमिनीचे श्लोक पहा–" अब्रवील्लक्ष्मणं वीरः कुशो विनयपूर्वकं। द्विषद्भावं परित्यज्य मम भारस्त्वया हृतः ॥ उपकारः कृतो नूनं त्वया कर्ता तथाप्यहम्।" जैमि ३४।७–८. काव्यसंग्रहकारांनीं दिलेला–" जरि तूं संप्रती वैरिता त्यजुनि ( शरण येऊनि ) मदीय भाराप्रती हरिलेंस, ( तरि ) तूं भला ! भला !" हा अन्वयार्थ थोडा चमत्कारिक आहे. लक्ष्मण शरण येऊन कुशाचें बळ कसें हरणार ? मुळांत असलेली उपकार–प्रत्युपकार भावना काव्यसग्रहकारांच्या अर्थांत येत नाहीं. **श्लोक. ४. अनळ**–अग्नि. **वीरव्रज**–वीरसमूह. **उष्ट्रकांला**–उंटांना. **शिखिभयें**–अग्निभयें. **श्लोक ५. वारुणास्त्र**–जलास्त्र किंवा मेघास्त्र. **मारुतास्त्र** वाय्वस्त्र. 'सोडी' याला कर्ता 'कुश' ( अध्याहृत ). वायूच्या अस्त्रानें उडालेला धुमाकूळ वर्णिला आहे. **ओळ** ४. या अस्त्राच्या प्रभावानें वृक्ष व पर्वत आकाशांत पक्ष्याप्रमाणें उडूं लागले, व उडालेल्या वृक्षांनीं व पर्वतांनीं, पृथ्वीवरील लोकांच्या टाळक्यांत पडण्याची भीति उत्पन्न केली. काव्यसंग्रहाचा 'भीति घेती' असा पाठ घेतल्यास 'आकाशांत पक्ष्याप्रमाणें उडालेले वृक्षसमूह पाहून, आपणही तसेंच उडून जाऊं अशी पर्वतांनींही भीति घेतली' असा अर्थ होईल. **श्लोक ६. यासि**–कुशाला. सेनापति लक्ष्मणास म्हणाला, "मी याला मारतों, तरच हा एकटा सांपडेल. हें पहा मी त्याच्या अस्त्राचें निवारण करतों." **श्लोक ७.** कुश, सेनापतीची जीभ कापतो. **अर्धेंद्वाकारबाणें**–अर्धचंद्राकृति बाणानें. **रामबंधू**–लक्ष्मण. **श्लोक ८. त्याला**–लक्ष्मणाला. **सप्तधा**–सात वेळ. **श्लोक ९. नभोंतरी**–आकाशांत. **शिखिशिखा**–अग्निज्वाळा. **लोकेश**–राजे. काव्यसंग्रहकारांनीं 'दिक्पाल' असा अर्थ करून इंद्र, वरुण, यम व कुबेर अशीं नांवें दिलीं आहेत. पण येथें दिशांचा कांहीं संबंध नाहीं, व असला तर आठ दिक्पालांचीं नांवें देणें योग्य होतें. तथापि अष्टदिक्पाल घेण्यास हरकत नाहीं. **लक्ष्मणहृत्कपाटकवच**–लक्ष्मणाच्या हृदयकपाटावरील चिलखत. **मूर्च्छास्वहस्तीं दिलें**–मूर्च्छेच्या हातीं दिलें. लक्ष्मणाला मूर्च्छित केलें. स्वहस्तीं यांतील 'स्व'चा प्रयोग मोरोपंत वारंवार करतात. पहा—१३।१५. **श्लोक १०. बंधुसिंहनिनद**–बंधुरूपी सिंहाची गर्जना, लवाची गर्जना. **असे**–शिरे. **तयाच्या**–कुशाच्या. **बळराजिवेष्टित**–सैन्याच्या रांगांनीं वेष्टित. शेवटच्या ओळींतली उपमा नित्याचीच आहे. **श्लोक ११. पिशितभुक्**–

मृतांचें मांस खाणारे–कोल्हे, गिधाडें इ०. **पललक्ष्माधर**–मांसांचे पर्वत. **क्ष्मातळीं**–पृथ्वीवर. **रुधिरें**–रक्तानें. सर्वत्र मांसाचे ढीग व रक्ताचे पाट वाहूं लागले.

## अध्याय बारावा

लक्ष्मणाची कांहींच बातमी नाहीं असें पाहून रामांना फार चिंता वाटूं लागली. म्हणून त्यांनीं आपल्या पांच दूतांबरोबर लक्ष्मणास असा निरोप पाठविला कीं, "जे ब्राह्मण कुमार एवढें युद्ध करीत आहेत, त्यांना मोहनास्त्रानें मोहून जिवंत धरावें. त्यांच्या आईबापांचीं नांवेंही विचारावीं." राम हें दूतांना सांगत असतांच बरेच जखमी वीर तेथें आले व त्यांनीं लक्ष्मणाला ब्राह्मणकुमारांनीं मूर्च्छित केल्याची बातमी रामांना निवेदन केली. रामांनीं यावर बराच शोक केला, असें पाहून भरतानें मोठ्या सेनेसह रणांगणावर जाण्यास आज्ञा मागितली, व रामांनीं ती त्याला आनंदानें दिली. भरत रणांगणावर गेला, पण त्याला मूर्च्छित लक्ष्मणाचा शोध लागेना. मारुतीनें शत्रुघ्न व लक्ष्मण हे दोघे पडले होते, त्या स्थलाचा शोध काढून भरताला तेथें नेलें. आपल्या बंधूंची दुःस्थिति पाहून भरताला क्रोध आला व त्या ब्राह्मणकुमारांच्या नाशार्थ त्यानें आपल्या सेनेला आज्ञा दिली. हनुमंतानें रणांगणांत पडलेल्या शत्रुघ्नलक्ष्मणांचा शोध लावला म्हणून या अध्यायास 'हनूमद्वाक्य' असें नांव ठेवलेलें दिसतें. **श्लोक १. त्वदनुज**–शत्रुघ्न. लक्ष्मण यशस्वी होऊन अद्याप कसा आला नाहीं? **श्लोक २.** लक्ष्मणाचा पूर्व पराक्रम राम वर्णन करतात. **जन्योद्युक्तमना**–ज्यावेळीं माझा धाकटा भाऊ लक्ष्मण युद्धाला (जन्य) प्रवृत्त होईल, त्यावेळीं लक्ष्मणाच्या भयापासून शत्रूंचें कोण रक्षण करील? **शरण्य**–आश्रयस्थान. **श्लोक ३. सुतनाशाकुलचित्ता**–मुलाच्या मरणानें व्याकुळ झालेली. राम म्हणतात– "माझा भाऊ रागानें ज्या वेळीं ब्राह्मणकुमारांचा नाश करण्यास प्रवृत्त होईल, त्यावेळीं त्या मुलांची आई आपल्या मुलांच्या रक्षणार्थ कोणाकडे याचना करील?" कारण लक्ष्मणाच्या हातून ते कुमार मरणार यांत संशय नाहीं. **श्लोक ४.** "हा लक्ष्मण आपल्या बंधुरत्नाला शत्रुघ्नाला, यमलोकांतूनहि (धर्मगृह) परत आणील." **चंडपराक्रममंडित**–जाज्वल्य पराक्रमानें युक्त असा (लक्ष्मण). रामांना लक्ष्मणाबद्दल केवढा विश्वास आहे! **श्लोक ५. दारक**–कुमार. **विनिर्मिला आजी**–युद्ध उत्पन्न केलें. **सुगळ**–सुग्रीव. **पवनज**–मारुति. **अनादरिलें**–या कुमारांनीं घोडा धरून

अंगद सुग्रीवादि वीरांचा कसा उपमर्द केला? **फणिफणमणि**–सर्पाच्या फडेवरील मणि. "माझा घोडा कुसारांनीं धरला. यांत त्यांनीं अजाणता सापाच्या फडीवरील रत्नालाच हात घातला आहे." सर्पाच्या फणेवरील रत्नाला स्पर्शणें जसें मृत्युप्रद तसेंच माझ्या घोड्याचें हरण करणें होय. **श्लोक ७. लेखा**–पर्वा, हिशेब. **श्लोक ८. चार**–दूत. **श्लोक ९.** भरतानें तसे दूत आणविले. **तत्सेवालाभरतें**–रामाच्या सेवेच्या लाभाविषयीं आसक्त अशा (भरतानें). **हृतभूभर**–हरला आहे पृथ्वीचा भार ज्यानें, (असा राम). **कृपांबुनिधिला**–ज्या रामाच्या कृपासागराला भरतें आलें आहे. कुमारांनीं एवढा हाहाकार मांडला म्हणून रामांना त्यांचा राग न येतां, त्यांच्याबद्दल करुणाच वाटली. **श्लोक १०.** रामांनीं दूताकरवीं लक्ष्मणास पाठविलेला संदेश. **रिपुसिंधु इ०**–शत्रुरूपी समुद्रांत बुडालेलें आहे यशरूपी शरीर ज्याचें अशा यातें (रामातें) बाहेर काढ. (समुद्धरणें). शत्रूंनीं हरलेलें या रामाचें यश परत मिळीव, असा अर्थ. **श्लोक ११. वीरसेवितरथ**–वीरांनीं युक्त आहे रथ ज्याचा. ज्याच्या रथाला वीर अनुसरतात असा. **धनुश्रुतिज्ञ**–धनुर्वेद जाणणारा. **विरथ**–रथरहित असे (कुमार). **पशुप्रकृति**–पशूसारखे, अडाणी, अर्धवट. **श्लोक १२. कीर्तिमा**–कीर्ति व लक्ष्मी. बहुपुत्रपौत्र इ०–पुष्कळ पुत्र व नातू यांच्या लालनसुखांचें स्थान असे ते (लोक) गोड (मधु) संसार (संसृतीसी) करतात. हा श्लोक जैमिनीचाच अनुवाद आहे. पहा–"परबाले दयायुक्तं चित्तं कुर्वंति ये जनाः। ते पुत्रपौत्रैःसहिता जायंते भुवि साधवः॥"–जैमि० ३५।१७. **श्लोक १३.** संसारांत आपणास सुख मिळालें नाहीं, पुत्रमुख तर आपण पाहिलेंच नाहीं, असें रामाचें नैराश्ययुक्त भाषण. **श्लोक १४.** त्या कुमारांबद्दल रामांना अजाणतांच प्रेम वाटतें, हें पुढील सुखांताचें सूचक होय. **श्लोक १५.** हा संदेश राम सांगत असतांना तेथें रक्तानें माखलेलें आहे शरीर ज्यांचें (क्षतज+उक्षित+गात्र) असे वीर आले. **वेपथु**–कांपरें. **श्लोक १६.** वीरांचें भाषण. ते लक्ष्मणाच्या मूर्च्छेची बातमी देतात. **देवासह्य**–देवांनाहि न आटोपणारा (असा लक्ष्मण). **मोहहस्तीं देणें**–मूर्च्छित पाडणें. **श्लोक १७.** लक्ष्मणाचा पूर्वपराक्रम. **अप्रधृष्य**–जिंकण्यास अशक्य. **मर्त्यदेवरमणी**–मानवस्त्रिया व देवांगना. **संमूढ**–मूर्च्छित. **श्लोक १८.** रणभूमीचें बीभत्स वर्णन. **तटिनी**–नद्या. **नाहीं अशा पाहिल्या**–त्या नद्या रक्तमांसानें दुथडी भरून चालल्यामुळें, सर्वत्र रुधिरमांसमय झाल्यामुळें, नद्या नाहींतच अशी स्थिति झाली, मूळ नद्या कोठें आहेत तें ओळखूं येईना.

**शक्रच्छिन्न** इ०–इंद्रानें फोडलेले तांबड्या कावेचे पर्वतसमूह. हत्ती रक्तानें न्हाल्यामुळें तांबड्या कावेच्या पर्वताप्रमाणें भासत होते. **हृच्छल्यें**–छातींत रुतलेल्या बाणांनीं. **श्लोक १९. नानावीर** इ०–अनेक वीरांच्या शिरकमलांनीं व्याप्त झालेल्या भूमितलावर. **गृध्रश्येन** इ०–गृध्र ( गिधाड ) + श्येन ( ससाणा ) + शिवा ( कोल्ह्या ) + असकृत्प्रज ( डुक्कर ) + बक ( बगळे ) यांच्या समुदायांत ( प्रेतभक्षणाबद्दल ) भांडण वाढे. म्हणून हे वीर रामाला म्हणतात; " हे राजश्रेष्ठा ! अश्वमेधाची दीक्षा सोडून आतां तूं त्या रणांगणाकडे धांव घे. नाहींतर तुझी कीर्ति गेली असें तूं समज." **श्लोक २०. तो**–राम. **तदाशिषा योजिती**–त्याला आशीर्वाद देती. **व्यजनमारुतें**–पंख्याच्या वाऱ्यानें. **श्लोक २१. प्रवीरमूर्धमणें**–वीरांच्या शिरोमणे ! **श्लोक २२. धर्मच्युत शोच्य**–धर्मभ्रष्ट असणाऱ्याची दशा शोचनीय होते. लक्ष्मण तसा ( धर्मभ्रष्ट शोच्य ) नव्हे. **तच्छोकें** इ०–'लक्ष्मणाच्या शोकानें, हे धैर्यरत्नसानो ! हे धैर्याच्या मेरुपर्वता ! तूं विव्हल होणें योग्य नाहीं.' **श्लोक २३.** या युद्धाच्या मिषानें लक्ष्मण उलटा धौतपाप झाला असें भरत सांगतो. " निष्पाप सीतेला वनांत सोडल्यामुळें लक्ष्मण पापी ( पंकिल ) झाला. त्याला आपलें शरीर भारभूत वाटूं लागलें. तें पाप त्यानें कुशाच्या प्रखर बाणांच्या नदींत धुवून टाकलें, व त्यामुळें तो पवित्र होऊन त्याच्या यशानें स्वर्गाला व पृथ्वीला सफेती चढविली गेली आहे. **कांड**–बाण. **तटिनी**–नदी. लक्ष्मण शोच्य नव्हे, असें सांगण्याचा भरताचा आशय. **श्लोक २४.** " लक्ष्मणाप्रमाणें मीही कुशासीं लढून पवित्र होईन " असें भरत म्हणतो, व युद्धास जाण्याची आज्ञा मागतो. त्याप्रमाणें रामानें आज्ञा दिल्यावरून भरत हर्षप्रेरित होऊन निघतो. **श्लोक २५.** राम म्हणतो. **तातादेशकरें**–वडिलांची आज्ञा पाळणाऱ्या म्यां. **बहुतरें**–पुष्कळ. हा शब्द पंतांनीं, १३।५ मध्यें वापरला आहे. **भीकरें**–भयंकर. **ओळ २.** " हे भरता ! तूंही वल्कलें ( चीर ) व जटा धारण करून माझें वचन खरें केलेंस. तूंही वल्कलें व जटा धारण करून व नंदीग्रामीं राहून मी वनवासांतून येईपर्यंत माझ्या आज्ञेप्रमाणें राज्य रक्षिलेंस." **श्लोक २६. बळमथनकुशळ**–सैन्य मर्दिण्यांत कुशल असे ते दुष्ट (खळ) कुमार. **न मानस त्वरतें**-मन धांव घेत नाहीं. **श्लोक २७.** रामाचें भाषण. " ते कुमार कोणते हें तुला ठाऊक नसेल तर अंगदाला किंवा मारुतीला विचार " असें राम भरताला म्हणतात. **श्लोक २८. सती**–पतिव्रता सीता. **त्वद्गोत्रोद्भव**–तुझ्या वंशांतच जन्मलेले. "तुझेच ते पुत्र असावे " असा आपला

तर्के, अंगद रामापुढें व्यक्त करतो. **श्लोक २९. पवननंदन**–वायुपुत्र हनूमान्. **क्षम सर्वविष्टपाक्रमणीं**–जग जिंकण्यास समर्थ. **श्लोक ३०. संकुल**-युक्त. **भूमिव्योमासि**– पृथ्वी व आकाश यांना व्यापून ( वेष्टुनी ). पृथ्वी ज्या शेषाच्या मस्तकावर आधारलेली आहे, तें शेषमस्तक भारानें पीडित होऊन हालूं लागलें. इतकें तें रामाचें नरवानरांचें सैन्य अफाट असा आशय. **श्लोक ३१.** हत्तीचें वर्णन. **करी**–हत्ती. मदोदकानें गळणारे. **गंभीरध्वान**–गंभीर आवाजाचे. **कज्जलाभ**–काजळाच्या कांतीचे. हे ( हत्ती म्हणजे ) पृथ्वीवरील ( भूगत ) मेघ, असें मानून स्त्रीजन ( मुग्धाजन ) कौतुक करी. **श्लोक ३२. गणिका**–वेश्येच्या स्पर्शानें यश क्षीण होतें, व पुण्यसमुदाय जळतो. पृथ्वी ही अनेक राजांनीं उपभोगलेली अतएव वेश्येप्रमाणें असल्यामुळें, तिला स्पर्श करून आपलें पुण्य जाईल, म्हणून वानरें पृथ्वीला स्पर्श करीत नव्हतीं. वास्तविक पृथ्वीला स्पर्श न करतां उड्या मारीत जाणें हा वानरांचा स्वभाव. पण त्यावरच पंतांनीं वरील सुंदर हेतूत्प्रेक्षा केली आहे. **श्लोक ३३.** सैन्याचा विस्तार. **चापी**–चाप धारण करणारे. **रुक्मरथी**–सोन्याच्या रथांत बसणारे. **कांडी**– बाण धरणारे. **हारी**–हार घालणारे. **रदी**–हत्ती. चालणाऱ्या पर्वताप्रमाणें ( चलत्क्षोणीध्र ). त्या सैन्यामुळें नद्या दिसेनाशा झाल्या. **श्लोक ३४. दानोदकें**– हत्तीच्या गंडस्थळांतून गळणारा मद. **झाला कर्दम**–धुळीचे लोट, हत्तींच्या मदांत मिसळल्यामुळें चिखल झाला. **दानघर्मसलिलें**–हत्तीचा मद व घाम यांचें पाणी या पाण्यामुळें मोरांना पावसाळाच आला असें वाटून, ते आपल्या सहचरींसह नाचूं लागले. येथें भ्रांतिमान् अलंकार होतो. **शिखी**–मोर. पावसाळा हा मोरांना आनंदप्रद असतो. **श्लोक ३५. बंधूद्वयातें**–लक्ष्मण व शत्रुघ्नाला. **भेरीध्वानें इ०**- आपल्या नगाऱ्याच्या आवाजानें देवांनाही बहिरें करून. त्याच्या नगाऱ्यांचा आवाज स्वर्गापर्यंत उंच गेला. **युद्धयज्ञक्षमा**–रणभूमीला. **सुमित्रासुतभटजन**– लक्ष्मणाचे योद्धे. **श्लोक ३६.** युद्धभूवर्णन. वीरांच्या शरीराचे निरनिराळे अवयव तुटलेले, व त्यांच्या अंगावरील अलंकार इतस्ततः रणभूमीवर पसरलेले, भरतानें पाहिले. **रदन**–दांत. **त्वक्**–कांतडी. **मूर्धज**–केस. **अंत्रें**–आंतडीं. **कलेवरें**–शरीरें, धडें. **गलदसृक्पूरें**–गळत आहे रक्ताचा ( असृक् ) पूर ज्यांतून अशीं अर्धीं धडें. **निष्क**– पदकें. **कटक**–कडीं. **च्युटव्यक्तीरीटांगदें**–तुटकें किरीट व बाहुभूषणें. **सांगदे**–अंगद वानरासह तेथें जाणाऱ्या भरतानें. हा श्लोक बीभत्स रसाचें एक चांगलें उदाहरण आहे. **श्लोक ३७. सलवणरिपुला**–लवणासुराच्या शत्रूस–शत्रुघ्नास व लक्ष्मणाला

शोधावयास गेलेला भरत, रणांगणावर मोठी भयंकर रक्ताची नदी पाहून मारुतीला म्हणतो, "तूं पूर्वी सीतेचा शोध करतांना समुद्र उल्लंघून जन्मरहित (अज) रामाला संतुष्ट केलेंस, तसाच आतां या रक्ताच्या नदीला तरून जाऊन लक्ष्मण-शत्रुघ्नांचा शोध कर व मला संतुष्ट कर पाहूं". **आपगा**–नदी. **श्लोक ३८.** मारुती उत्तर करतो. "पूर्वी समुद्र तरलों त्यावेळीं सीतेकडे आम्हीं जात होतों. (अभिमुख). आतां त्याच सीतेनं आमच्याकडे तोंड फिरविलें आहे. (पराङ्मुख). म्हणून ही (रक्ताची) लहान नदीही दुस्तर वाटते. **उडे**–उड्डान केलें. **सीताधव**–रामचंद्र. **स्तव**–स्तवन. **श्लोक ३९.** लक्ष्मण व शत्रुघ्न रणभूमीवर पालथे पडले होते. त्यावर कवीची उत्प्रेक्षा कीं, हे दोघे बंधु सीतात्यागामुळें संतापानें विव्हळ झालेल्या सीतेच्या आईची (धात्री)-पृथ्वीची, जणु क्षमाच मागत आहेत. **पहा**–"शरनिर्भिन्न सर्वांगौ रणे शत्रुघ्नलक्ष्मणौ । प्रार्थयंताविव धरां सीतात्यागेन दुःखिताम् ॥" जैमि० ३५।७३. **म्हणे**–भरत (कर्ता). **चित्रा**–विचित्र. **स्वर्णक्ष्माधाकृती**–मेरुपर्वताप्रमाणें प्रचंड शरीर आहे ज्याचें (असा मारुति). **श्लोक ४०. दोघेही**–लक्ष्मण,–शत्रुघ्न. **भाविले**–कल्पिले. वानरयोद्धयांना ते (लक्ष्मण–शत्रुघ्न) मेलेले आहेत असें वाटलें. **ओळी ३।४.** इंद्रजिताच्या शक्तीनें जेव्हां पूर्वी लक्ष्मणाचें हृदय भेदिलें होतें, तेव्हां देखील इतकी मूर्च्छा त्याला आली नव्हती, व मरणाची एवढी भीति वाटली नव्हती, तेवढी आतां वाटली. **भें**–भय. **श्लोक ४१. उद्दंडचंड इ०**–उचललेल्या प्रखर अशा कुशाच्या बाणांनीं, फुटलेलें आहे हृदय ज्याचें असा लक्ष्मण. **रामबंधु**–लक्ष्मण. **घोरा**–भयंकर; लक्ष्मण भयंकर दिसत होता. **वक्षःक्षत इ०**–हृदयाला झालेल्या जखमेंतून वाहणाऱ्या रक्तानें माखलें आहे शरीर ज्याचें असा लक्ष्मण, (दशरथपुत्र) सर्वांना शोकाकुल करता झाला. **पंक्तिरथ**–दशरथाचा मुलगा. **तोक**–पुत्र. यांतील 'आत्म' शब्द निरर्थक आहे. **श्लोक ४२. त्याच्या**–लक्ष्मणाच्या. **चमूला**–सेनेला. **म्हणे**–भरत मारुतीला म्हणाला. **रघुपतिभजन इ०**–रामाच्या भजनानें नाश केलें आहे संसाराचें बीज ज्यानें अशा तुवां. **रक्षोवृंदैककाला**–राक्षसगणांचा मृत्यु! **सततगति**–वायु. **बाळकातें**–कुशाला. कुश कोठें आहे तो पहा. **ओळ ४.** भरत रागानें म्हणतो–"या वेळीं या दुष्ट कुशाला त्याच्या कर्माचें फळ, यमसदनांतच मिळो." याला मी आतां यमलोकाला धाडतोंच. **श्लोक ४३. ताडविला**–भरतानें नगारा वाजवावयास सांगितलें. सेनेचा हल्ला करण्याच्या वेळीं इशारा म्हणून नगारा वाजविण्यास सांगितलें. **आज्ञाविधूदयीं**–त्या

भरताच्या आज्ञारूपी चंद्रोदयानें सेनारूपी समुद्राला भरती आली. भरताची स्वारीची आज्ञा होतांच सेनेला उत्साह येऊन तिनें चाल केली असा अर्थ. परंपरितरूपक.

## अध्याय तेरावा

हल्ला करावयास आलेलें भरताचें सैन्य पाहून कुश व लव दोघेही खवळले, व त्यांनीं भयंकर हातघाईची लढाई केली. भरताच्या सेनेची वाताहात झाली. हें पाहून भरत सामोपचारानें कुशास म्हणाला, 'हे मुला ! आमचा घोडा सोड. उगीच मरून आपल्या आईला दुःखी करूं नको. तुला मी जीवदान देतों !' या भाषणानें स्वाभिमानी कुशाला फार राग आला. त्यानें भरतावर शरवृष्टि करून मूर्च्छित पाडलें. ही बातमी युद्धांतून पळालेल्या वीरांनीं येऊन रामाला निवेदन केली. रामानें भरताबद्दल पुष्कळ शोक केला. सुग्रीव-बिभीषणांसह तो स्वतःच रणभूमीवर जाऊन पोंचला. तेथें त्यांना आपल्याच नांवाचा जय करीत असलेले ते सुंदर कुमार पाहून आनंद झाला. रामांनीं त्यांची सर्व हकीकत विचारली. कुश म्हणाला, 'आमची हकीकत कांहींही असो, त्याशीं हे राजा ! तुला काय करावयाचें आहे ? तूं युद्धास तयार हो म्हणजे झालें.' हें कुशाचें बोलणें ऐकून राम म्हणाले, 'तुझें नांव-गांव कळल्याशिवाय मला तुझ्याशीं युद्ध करतां येणार नाहीं.' तेव्हां कुशानें आपली आई सीता असून वाल्मीकि मुनीनें आपणास धनुर्वेद पढविल्याचें सर्व वृत्त निवेदन केलें. 'सीता' असा शब्द, कुशाच्या तोंडून ऐकल्यावर रामानें ते कुमार आपलेच पुत्र, असें ओळखलें. राम थोडा वेळ वात्सल्यानें मोहित झाले. इतक्यांत सुग्रीवानें या कुमाराशीं युद्ध करण्याची आज्ञा मागितल्यावरून रामांनीं ती त्यांस दिली. कुशानें, सुग्रीव, नीळ यांना मूर्च्छित केलें असें पाहून रामांना राग येऊन तेच स्वतः युद्धाला उभे राहिले. पण कुशाच्या बाणांनीं ते लवकरच मूर्च्छित पडले. या घनघोर युद्धांत जांबवान् व मारुति हे दोघेच मूर्च्छेचें सोंग घेऊन रामाच्या रथावर पडले होते. त्यांना पाहून लव कुशास म्हणाला, "या वानरांना आपण घरीं नेऊं. आपल्या आईला गंमत वाटेल." हें ऐकून मारुतीला व जांबवानाला आपलें लक्षण ठीक नाहींसें वाटलें. लवानें कुशाच्या पराक्रमाचें सीतेजवळ वर्णन करून दोन वानरें धरून आणल्याचें सांगितलें. सीतेनें मारुतीला ओळखलें व 'माझ्यापुढें त्यांना आणूं नका' असें म्हणून त्यांना सोडून देण्यास सांगितलें. याच वेळीं वाल्मीकि ऋषि समुद्रस्नानाहून परत आले. त्यांना कुमारांचा

पराक्रम कळला, पण राम मूर्च्छित केल्याचें वर्तमान समजतांच ते दुःखी झाले, व त्या जागीं तत्काळ आले. 'राम हा तुमचा पिताच' असें कुशलवांना त्यांनीं सांगून सर्वांवर मंतरलेलें पाणी शिंपडलें. रामासहित सर्व, झोंपेंतून उठल्याप्रमाणें सावध झाले. सर्वांना आनंद झाला. शेवटीं वाल्मीकि रामांना म्हणाले, "केवळ लोकापवादामुळें तूं आपली पत्नी वनांत सोडलीस, तिचें योग्य पालन मी केलें आहे. हे कुश-लव, तिचेच पुत्र असून त्यांनींच तुझ्याशीं युद्ध केलें. आतां मी सांगतों म्हणून ही आपली पत्नी व पुत्र आपल्या घरास घेऊन जा." असें म्हणून शिष्याकडून सीतेला त्यांनीं तेथें आणली. रामांनीं तिचा पुनरपि स्वीकार केला. त्यावेळीं स्वर्गांतून पुष्पवृष्टि झाली. सर्वत्र आनंदी आनंद झाला. वास्तविक या अध्यायाचें कथानक पाहतां, याला 'कुमारलाभ' असें नांव शोभण्यासारखें होतें. कारण येथें रामांना पुत्रभेटीचा आनंद प्राप्त झाला आहे. पण जैमिनीनें आपल्या अश्वमेध प्रकरणास अनुसरून याला 'रामाश्वमेधपरिसमाप्ति' असें नांव दिलें आहे. **श्लोक १. तो**–भरत. **निमाले**–नष्ट झाले. **विकटकटकभट**–भयंकर वीर. **कटकसे**–डोंगराच्या कड्याप्रमाणें. दुसऱ्या ओळींत 'ट' नें अनुप्रास साधला आहे. **श्लोक २. भरतकटकांतीं**–भरताच्या सैन्यांत. **महाकांडव्रातें**–मोठ्या बाणांच्या समूहानें. **बुडे इ०**–कुशाच्या बाणांच्या अग्नीनें तापलेल्या सूर्यानें जणु समुद्रांत (थंडाव्यासाठीं) बुडी घेतली. वास्तविक नेहमींप्रमाणें सूर्य मावळला, पण पंतांनीं ही उत्प्रेक्षा केली आहे. **श्लोक ३.** सूर्यास्ताचें हें वर्णन दुसऱ्या श्लोकापासून चवथा श्लोकापर्यंत आलें असून पंतांचें तें स्वतंत्र आहे. **सूर्यरश्मिसमुदाय**–सूर्यकिरणांचा समूह. **जनविलोचनें**–लोकांचे डोळे, दृष्टि. **वृथा जाहलीं**–निरुपयोगी झाली. कोणास कांहीं दिसेना. तुलनेस पहा– "लिंपतीव तमोंगानि वर्षतीवांजनं नभः। असत्पुरुषसेवेव दृष्टिर्निष्फलतां गता॥" मृच्छकटिक. या श्लोकाचीच थोडी छाया पंतांच्या या सूर्यास्त वर्णनावर पडली असावी, असें वाटतें. **नासली इ०**– यशकारक युद्धाचा विरस झाला. कारण अंधारांत काय लढणार? **श्लोक ४. स्वपरासि**–आपल्या पक्षाच्या माणसास आणि शत्रूस. अकस्मात् वैभव प्राप्त झाल्यामुळें धुंदी चढलेले दुष्ट व हीन कुलांत जन्मलेले लोक, जसे मित्र किंवा शत्रु ओळखीत नाहींत तद्वत्. अशा उपमा कवीचें समाजनिरीक्षण दाखवितात. **श्लोक ५. गजकरी**–हत्तीच्या सोंडेवर (करीं). **करवाले**–तरवारीनें. **रण**–युद्ध. **बालें**–कुशानें. **अन्वय**–ज्यातें लवकरें क्षत निर्मिलें, ते बहुतर क्षतजा वाहती. **लवकरें**–लवाच्या हातून. **क्षत**–जखम.

**क्षतजा**–रक्ताला. **वाहती**–धारण करीत होते. **श्लोक ६. खड्गपात**–तरवारीचा वार. **गजदंतीं**–हत्तीच्या दांतावर. **शब्दसंचरती इ०**–हत्तीच्या दातांवर तरवार आपटल्यानें सर्वत्र खणखणाटानें आकाश भरून जाई, त्याचप्रमाणें तरवार व हत्तीचे दांत यांच्या घर्षणानें उत्पन्न झालेला अग्नी, सर्वांना भाजून काढी. **धांवता इ०**–लोक धांवत असतां त्यांना हत्ती व घोडे चिरडीत. **श्लोक ७.** युद्धाचें वर्णन पुढें चालू केलें आहे. **काळसर्परसना**–कृष्णसर्पाच्या जिभाप्रमाणें भासणाऱ्या ( तरवारी ). **कातर**–भित्रा. कोणता भित्रा माणूस त्या तरवारींना प्रतिबंध करूं शकेल ? **काय ते इ०**–ती तरवार म्हणजे जणु उद्भवलेली महामारीच. महामारीच्या उपद्रवानें जसा मनुष्यसंहार पटापट होतो, तसाच या तरवारीनें होई असा अर्थ. **नरमारी**–महामारी. **श्लोक ८.** युद्धांत उडालेला हाहाकार. **सोदर**–भाऊ. **कलितशस्त्र**–शस्त्र हातांत धरलेलीं. **कबंध**–धडें. वीर लढत असतां त्यांचीं डोकीं तुटल्यामुळें, त्यांनीं हातांत धरलेलीं शस्त्रें तशींच राहून, धडें लढत होतीं. **अंधें**–लढाईंत डोळे गेलेले वीर आपल्या पक्षाच्या लोकांनाच मारीत. 'अंधें' हें 'कबंधें' याचें विशेषण मानण्यांत विशेष अर्थ साधत नाहीं. **श्लोक ९. शोणिततटिन्युदरांत**–रक्ताच्या नदीच्या प्रवाहांत. **कातरांतर**–भित्र्या मनाचे. **तमांत**–अंधारांत. **क्षितिसुतातनयायुधांनीं**–कुशाच्या शस्त्रांनीं. **यमराजधानी भरली**–मृत्युलोकाला अनेक वीर पाठविले, मारले. **श्लोक १०. निषेवुनि**–पिऊन. **भूतें इ०**–अनेक वीर युद्धांत कुशानें मारल्यामुळें त्यांचें मांस खाऊन, व रक्त पिऊन कोल्हे, गिधाडादि प्राणी कुशासंबंधीं म्हणतात जणु, "या बाबानं ! आम्हांला चांगली गोड मेजवानी दिली आहे." **भूतें**–प्राणी. **श्लोक ११. आसूर्योदय**–उजाडेपर्यंत. **कोपशिखिने**–कोपाग्नीनें. **उद्दंड**–उदंड, पुष्कळ. भरताला फार राग आला असा ध्वनि. **ओळ ३**–भरतानें आपल्या तप्त बाणांनीं कुशाच्या हृदयावर प्रहार केला. **संताडी**–जोरानें प्रहार करी. **अनळज्वाळाकुळेषुव्रजें**–अग्नीच्या ज्वाळांनीं युक्त अशा बाणसमूहानें. ज्वालाग्राही बाणांनीं. **ओळ ४**–जे बाण साधूंना रक्षिण्यांत कोमल होत, व जे दुष्टांना रडविण्यांत (असत्संक्रंदनीं) तीक्ष्ण होत. हें भेदातिशयोक्तीचें उदाहरण होईल. **श्लोक १२. वारणशत्रुप्रताप**–सिंहप्रतापी. **काम**–इच्छा. येथें पहिल्या व दुसऱ्या पादांत, 'वारण' या, व तिसऱ्या व चवथ्या पादांत 'काम रणीं, व कां 'मरणीं,' या अक्षरांनीं दामयमकें साधलीं आहेत. **श्लोक १३.** कुश म्हणतो, "सेनेच्या पंचतेचें ( मरणाचें व लक्ष्मण-शत्रुघ्नांच्या मूर्च्छेचें मी कारण ( हेतु ) आहे;

मींच सेनेला मारलें व लक्ष्मण-शत्रुघ्नांना मूर्च्छित पाडलें, असे असतां दिव्यावर उडी घालणाऱ्या पतंगाप्रमाणें ( माझ्याबरोबर युद्ध करून ) तुम्हीं विनाकारण कां मरतां ?" माझ्यापुढें तुमचें कांहीं चालणार नाहीं असा अर्थ. **पंचता**–मरण. **पतंगदीपकन्याय**–दिव्यावर उडी घालणें व नाहक मरणें, हा पतंगांचा धर्म आहे, त्याच्या दृष्टांतासच हा न्याय म्हणतात. **श्लोक १४. ओळी २**–"हे नीच मुला ! मनांत गर्व धरून जर माझें म्हणणें मान्य करणार नाहींस तर ( मी तुला मारीन–हें अध्याहृत ). **ओळी ३।४**–विनाकारण यमलोकाच्या मार्गाचा प्रवासी बनूं नको ( मरूं नकोस ); मी तुला क्षमा करीन, मारणार नाहीं. तुझी तापसी आई ( तुझ्या मरणानें ) दुःखी न होवो." भरत कुशाला सामोपचारानें शरण आणण्याचा प्रयत्न करीत आहे. **प्रसू**–आई. **सश्रमा**–दुःखयुक्त. **श्लोक १५. मदीयबळशोणितें इ०**–माझ्या सैन्याच्या रक्तानें तूं पृथ्वीला संतुष्ट केलेंस. तूं माझें पुष्कळ सैन्य मारलेंस. **मखहयास**–यज्ञाच्या घोड्यास. **अन्यथा**–नाहींतर. **पुरास**–अयोध्येस. **श्लोक १६. समर्थभय**–थोरांचें भय. 'शरण येऊनच थोरांचें भय टळतें. म्हणून तुम्हीं शरण येऊन रामापासून उत्पन्न होणारें भय घालवा ' असा भरताच्या म्हणण्याचा आशय. **श्लोक १७. निजजीवनदातृकीर्तिला**–आपल्यास प्राणदान करणाऱ्याची कीर्ति गावी. ' मी तुला क्षमा करून सोडतों, मारीत नाहीं, म्हणून तूं माझे उपकार मानले पाहिजेस, मी तुझा प्राण घेतला नाहीं, म्हणून तूं तुझ्या आईला माझें नांव सांग. ' **श्लोक १८.** भरताच्या भाषणानें कुशाला आलेल्या क्रोधाचें वर्णन. **खर मृदुल**–भरताचें भाषण मऊ, सामोपचाराचें, तसेंच तें दुसरीकडून कठोर, धाकदपटशाचें होतें. **आत्मतुंडें**–आपल्या तोंडानें. **खादिरांगारकुंडें**–खदिराच्या लाकडाच्या निखाऱ्याचीं कुंडेंच. खदिराच्या लाकडाचे निखारे अधिक प्रखर व टिकाऊ असतात, म्हणून कुशाच्या डोळ्यांना त्या निखाऱ्यांच्या होमकुंडांची सार्थ उपमा दिली आहे. आपल्या क्रुद्ध डोळ्यांनीं लोकांना नुसता भाजून काढतो, कसा कुश भासला. **सोडी निश्वास इ०**–पायानें तुडविलेल्या ( पादाहत ) सापाप्रमाणें ( उरग ) तो फुस्फुसूं लागला. कुशाला दिलेली सापाची उपमा फारशी हृद्य नाहीं. **दंतवस्त्रासी**–ओठांना. **खंडी**–चावी. रागांत हा प्रकार नेहमीं होतो. **कोदंडी**–धनुष्य धरणारा ( कुश ). **चंडकांडी**–प्रखरबाण बाळगणारा किंवा सोडणारा ( कुश ). **पत्र**–वाहन. **शिखंडी**–मयूर. ज्याचें वाहन मोर आहे, अशा कार्तिकेयाप्रमाणें कुश शोभला. कार्तिकेय हा देवांचा सेनापति आहे, त्याची उपमा कुशासारख्या वीराला अगदीं युक्त आहे. **श्लोक १९.**

**सप्तेषुवृंदें**–सात बाणांच्या समुदायानें. **वाताच्या नंदनाला**–मारुतीला प्रखर असे शंभर बाण ( खरविशिखशतें ). **तदर्धें**–पांचशें बाणांनीं. **स्थविर**–म्हातारा, जांबवान्, त्याच्यावर तीन हजार बाण ( तीससहस्र ) सोडून कुशानें त्याला छिन्न केला. **वाहे महास्त्रें**–त्यांच्यावर मोठीं अस्त्रेंही सोडलीं. **श्लोक २०. बळाकृष्टशिलीमुखें**–जोरानें ( धनुष्य ) ओढून ( आकृष्ट ) सोडलेल्या बाणानें. "ज्यांच्या ज्यांच्या उरावर कुशाच्या जोरदार बाणांचा प्रहार झाला, ते ते वीर जमिनीवर मरून पडले ( भूगत ), व त्यांनीं आपलीं तोंडें पसरलीं ( वाशिलीं ). कुशाचे बाण ज्यांना लागले, त्यांना मरण ठेवलेलेंच, असा भाव. **श्लोक २१. षट्चंडकांडप्रकरें**–सहा प्रखर अशा बाणसमूहानें. **धनु**–( भरताचे ). **लवानें**–एका क्षणांत. **ससूतवाजी**–सारथी व घोडे यांसह. **शुभलक्षणानें**–चांगल्या लक्षणाच्या लवानें. **संचूर्णिला**–निखालस पूड करून टाकला. **श्लोक २२. युद्धनिरंकुशानें**–युद्धांत ज्याला कसलाच प्रतिबंध नाहीं, अशा कुशानें. पहा–निरंकुशाः कवयः । दुसऱ्या ओळींत भरताची दुःस्थिति वर्णन केली आहे. **श्लोक २३. भास्वत्कुळाचा**–सूर्यवंशाचा. **टिळा**–तिलक, भूषण, सूर्यवंशभूषण, भरत. **योजनायत**–( एक योजन = चार कोस. ) = चार कोस लांब ( असा पर्वत ). **समुत्पाटिला**–उपडला. **हुंकारध्वनि इ०**–आपल्या हुंकारानें ज्यानें पृथ्वी, स्वर्ग व पाताळ या तीन लोकांना कांपविलें आहे, अशा ( मारुतीनें ). **दोघांवरी**–लवकुशांवर. **ओळ ४.** मारुतीनें जो पर्वत लवकुशांवर टाकला, त्याचे त्यांनीं रजःकणाएवढे बारीक तुकडे करून आकाशांत सोडले. त्या पर्वताची धूळ करून त्यांनीं ती आकाशांत उडविली. **त्र्यसरेणु**–खिडकींतून येणाऱ्या सूर्यकिरणांत जे सूक्ष्म रजःकण दिसतात त्यांना त्रसरेणु म्हणतात. **वियद्गंगांतरीं**–आकाशगंगेंत. **श्लोक २४.** लव-कुशांनीं उडविलेल्या त्या पर्वताच्या धुळीनें स्वर्गांतील अप्सरांची कशी दाणादाण उडाली तिचें वर्णन. ती धूळ स्वर्गापर्यंत उंच गेली, इतका लव-कुशांच्या बाणांचा प्रभाव. **वातोद्धुत इ०**–वाऱ्यानें उडविलेल्या, त्या पर्वताची धूळ. **खांखणीं**–आकाशांत. **युद्धालोकन इ०**–( कुशलवांचें ) युद्ध पाहण्याच्या कौतुकानें आलेल्या व आकाशांत बसलेल्या अप्सरा ( स्वर्वधू ). **वक्त्रें**–तोंडें. **धुतस्वालंकृती**–झाडलेले आहेत अलंकार ज्यांनीं अशा. धुळीनें अप्सरांची त्रेधा उडाली असा भाव. पण त्यामुळें लव-कुशांच्या बाणांचाच प्रभाव व्यक्त होतो. **श्लोक २५. लवयुतें**–लवासह असणाऱ्या कुशानें. **सद्यशः संचकें**–उत्तम यशाचा सांठा करणाऱ्यानें ( कुशानें ). **वामीं**–डाव्या

बाजूंत, असा अर्थ होईल. 'वामी' याचा 'प्रतिकूळ' असा काव्येतिहाससंग्रहाचा अर्थ मात्र कोशांत सांपडत नाहीं. मूळ जैमिनीच्या श्लोकांत मारुतीच्या डाव्या बाजूचा उल्लेख नाहीं. पहा–"पंचभिस्तं हरिसुतं प्रभिन्नमपि मूर्च्छितं । शरैः कनकचित्रैश्च कुशश्चक्रे स्वपौरुषात् ॥ जैमि० ३६।३२. **वज्रछिन्न इ०**–वज्राच्या आघातानें फुटलेल्या पर्वताप्रमाणें. **क्षोणी**–पृथ्वी. **सांद्र**–अतिशय. **विनासरा**–आश्रयरहित. येथें 'विघट्टिता' हा शब्द काव्यसंग्रहकारांनीं सुचविला आहे. मूळ पंतांचा कोणता शब्द होता हें समजत नाहीं. काव्येतिहाससंग्रहकारांचा 'विनाकरा' हा पाठ अर्थाभावीं अग्राह्य आहे. पण त्यावरून 'विनासरा' हा शब्द येथें असावा असें वाटतें. कारण पंतांनीं याच काव्यांत १३।५६ येथें बाणांच्या, 'निकरें,' तदा थरथरा कांपे असारा मही.' या ओळींत 'विनासरा' याशीं समान असा 'असारा' हा शब्द योजला आहे. **श्लोक २७.** पळालेल्या कांहीं वीरांनीं भरताच्या मूर्च्छेची बातमी रामाकडे आणली. **ओळ २.** रामाला अनुलक्षून आहे. रामाच्या डोळ्यांतून पाणी आलें, तोंड उतरलें, तथापि त्यानें धैर्य धरलें, (धृतीतें). **बाष्प**–अश्रु. **श्लोक २८.** रामाचा शोक. **मदुक्तिनिरता**–माझ्या आज्ञेंत आनंद मानणाऱ्या (भरता!). **घननादनाशकुशला**–इंद्रजिताचा नाश करण्यांत कुशल अशा (लक्ष्मणा). **भिन्नरक्षोगणा**–नामोहरम केले आहेत राक्षस ज्यानें अशा (लक्ष्मणा!). **श्लोक २९. सवें**–बरोबर. **जवें**–त्वरेनें. **उडुराट्**–चंद्र. **खांगणीं**–आकाशांत. आकाशांत चंद्र जसा शोभतो, तसा राम सेनेच्या मध्यभागीं शोभला. **क्षोणींद्रचूडामणी**–राजश्रेष्ठ. **श्लोक ३०.** रणांगणावरील रामाचे योद्धे, रामाचें पुढीलप्रमाणें गुणवर्णनपर नामस्मरण करीत होते. **मनोज्ञगुणधामा**–चांगल्या गुणांचें माहेरघर. **पलाशजनता इ०**–(पल + अश + जनता + मारण + एक + निरत) मांसभक्षक राक्षसांना मारण्यांत अत्यंत तत्पर अशा. **कामारिचित्तसदना**–शंकराचें मन हेंच ज्याचें विश्रांतिस्थान आहे अशा. शंकराच्या मनांत राहणाऱ्या. शंकर रामाचें नित्य ध्यान करतात असा उल्लेख. **मारुतिप्रियसुनामा**–ज्याचें नांव मारुतीला प्रिय आहे अशा. **नशत्रूविजिता**–शत्रुकडून न जिंकला गेलेल्या अशा. **धामाधिपा इ०**–सूर्यवंशश्रेष्ठा! (धाम = तेज, त्याचा अधिप = सूर्य). **मानशौर्यसुभगा**–मान व शौर्य यांनीं संपन्न असणाऱ्या. **मानिषेव्यचरणा**–लक्ष्मीनें सेविले आहेत, चरण ज्याचे अशा. **वामाकृते**–सुंदर आहे रूप ज्याचें अशा. **इतरवामापरङ्मुखमना**–परस्त्रियांविषयीं पराङ्मुख आहे मन ज्याचें अशा. रामाच्या एकपत्नीव्रताची

प्रसिद्धी आहे. **मानवैकशरणा**–मनुष्यांचें एकमेव आश्रयस्थान अशा. **श्लोक ३१. शल्यनिपीडित इ०**–( कुशाच्या ) बाणांनीं ( शल्य ) पिडलेल्या आपल्या लोकांच्या तोंडांतून निघालेले शब्द, युद्धभूमीजवळ येतांच रामाच्या कानीं आले. **श्रीरामकर्णाध्वनीं**–श्रीरामाच्या कर्णमार्गांत ( अध्वनीं ). **त्यांला**–आपला नामजप करणाऱ्या लोकांना. **कृपापांपती**–दयासागर. **किशोर**–बालक. **श्लोक ३२.** लवकुशांचें स्वरूपवर्णन. **काकपक्षधर**–झुलपें राखलेलें. **कृपाणी**–तरवार धरणारे. **तुल्यलक्षण**–सारख्या लक्षणांचे. **ओळ २.** अन्वय–'यांचे तुल्य लक्षण, मानव समान वयाचे देवसे गणिति.' कुशलवांसारख्या लक्षणांचे मानव, समान वयाच्या देवाप्रमाणें भासतात. कुशलव हे समवयस्क देवाप्रमाणें होते असा भाव. येथें पंतांनीं पहिल्या ओळींत जैमिनीचा अनुवाद केला, पण दुसरी ओळ स्वतंत्र आहे. पहा–" बालकौ कार्मुकयुतौ घनश्यामौच संगतौ । काकपक्षधरौ वीक्ष्य हनूमानिदमब्रवीत् ॥ जैमि० ३६।१६–१७. **श्लोक ३३.** रामानें कुमारांचीं मुखकमलें पाहिलीं. **जानकीवदनपद्मसमानें**–सीतेच्या मुखकमलासारखीं, त्यांचीं मुखें. **स्वाकृतीधर**–स्वतःप्रमाणें ( रामाप्रमाणें ) रूप धारण करणारे. कुशलवांचें रूप रामाप्रमाणें होतें. **श्लोक ३४.** राम कुमरांना प्रश्न करतो. **तद्वृत्त इ०**–त्यांचें वृत्त ऐकण्यास उत्सुक आहेत कान ( श्रुति ) ज्याचे, असा. **सांगचापनिगमीं**–अंगोपांगांसह धनुर्विद्येंत. **उद्दंडध्वजिनीविनाश**–प्रचंड सेनेचा ( ध्वजिनी ) नाश. एवढ्या मोठ्या सेनेचा नाश करतांना तुम्हाला कांहींच कसे श्रम झाले नाहींत ? **क्षोणीभूषणराजिरत्न**–पृथ्वीच्या अलंकारसमूहांतील रत्न. पृथ्वीला भूषणभूत असा तुमचा आश्रम कोठें ? असा भाव. **श्लोक ३५. उपनय**–मुंज. काव्येतिहाससंग्रहकारांचा 'उपनयन' हा पाठ स्वीकारल्यास, श्लोकाच्या वृत्तांचें एक अक्षर वाढतें. **शब्दब्रम्हाभ्यसन**–वेदाध्ययन. **महत्संनिधानें**–मोठ्याच्या आश्रयानें. **ओळ ३**–सर्व धर्मकृत्यें अप्रतिबंध घडतात ना ? तुम्हाला तुमच्या नित्य नैमित्तिक कृत्यांत अडथळा येत नाहींना ? **निष्प्रत्यूहें**–निर्विघ्न. **सद्विधानें**–चांगलीं कृत्यें. आश्रमवासियांचा योग्य परामर्श येथें राम घेत आहे. तशांत ह्या कुमाराबद्दल त्याच्या मनांत विशेष कुतूहल उत्पन्न झाल्यामुळें, तो हे प्रश्न करीत आहे. **श्लोक ३६.** पण कुशाचें रामास सडेतोड उत्तर. **गुणीं**–चापाच्या दोरीस. **विशिख**–बाण. **श्लोक ३७.** राम कुशास म्हणतो, "तुझें वृत्त सांगितल्याशिवाय तुझ्याशीं युद्ध होणार नाहीं." मग कुशानें आपली हकीकत सांगितली. **स्मितलसन्मुख इ०**–आपल्या हंसण्यानें शोभ-

णाऱ्या मुखांतील दंतपंक्तीच्या शुभ्र कांतीनें, शुभ्र केलें आहे ( धवलित ) आकाश व पृथ्वी ज्यानें असा ( कुश ). **श्लोक ३८.** कुश आपलें वृत्त सांगतो. **केवळ**–उघड्या. **सोपनयें**–मुंजीसह; **चित्र**–चमत्कारिक. वाल्मिकीनीं कुशलवांना रामाचें चरित्र सांगितलें होतें, कारण ते रामाचे पुत्र म्हणून त्यांना माहीत होतें, व स्वतः तेही रामभक्तच होते. रामाचें चरित्र ऐकून आपली बुद्धि सोज्ज्वळ झाली असें कुश सांगतो. कुशलवांच्या मनांत रामाबद्दल आदर अगोदरच मुनींनीं उत्पन्न करून ठेविला होता. **सोज्वळा**–स्वच्छ. **श्लोक ३९.** कुश आपल्या तोंडानें रामकथेचें महत्त्व वर्णन करतो. **देहीं मोक्ष**–मनुष्याला जिवंतपणींच मोक्ष मिळतो. **करींजय इ०**–हाताला यश येतें. **काळारि**–काळरूपी अरि, मृत्युरूपी शत्रु. **कितीक कौतुक इ०**–कित्येक लोकांना विनाकारण आश्चर्य वाटतें. तसें आश्चर्य वाटण्याचें वास्तविक कारण नाहीं. **श्लोक ४०.** येथें कुश रामाला ‘ रामा ! ’ असें संबोधितो; त्याअर्थी युद्ध करण्यापूर्वी रामानींही आपलें नांव त्यांस सांगितलें असावें. श्लोक ३६ पर्यंत, कुश त्यांना एक ‘ नृप ’ असेंच समजत होता. “ हे रामा ! आपली पत्नी, पुत्र व घर यांच्या ठिकाणीं जेथें तुझी प्रीति नाहीं, तेथें मृत सैन्याची तुला क्षिति नसावी ” स्वकीयाबद्दल जेथें तुला प्रेम नाहीं, तेथें परकी सेनेबद्दल तें कसें असणार ? येथें कुश रामाच्या कठिण ह्रदयाबद्दल उल्लेख करून त्याला थोडा टोमणा देत आहे. **श्लोक ४१. शक्ति**–सीता ही रामाची शक्ति होय. शक्ति = एकाद्या देवाचें सामर्थ्य हेंच त्याच्या पत्नीच्या ठिकाणीं आहे, असें कल्पिलें जातें. (शक्ति = The active power of a deity, regarded as his wife–Apte) ‘शक्ति’ हा शब्द येथें श्लिष्ट आहे, ( शक्ति = सामर्थ्य व पत्नी. ) पण या दोन्ही अर्थांचा येथें समन्वय केला आहे. सीतेचा त्याग केल्यामुळें राम सामर्थ्यविहीन झाले, व अशा स्थितींत ते युद्ध करण्यास योग्य नाहींत, असा कुशाचा आशय. सीतात्यागाची गोष्ट रामाच्या मनास लागली होती, तीच नेमकी कुशानें उल्लेखली. **श्लोक ४२.** ‘ सीता ’ असा शब्द ऐकून रामाला पूर्वीचें सर्व आठवून मूर्च्छा येते. कुश-लव हे आपले पुत्र आहेत, हें रामाला समजलें. **कश्मळ**–मूर्छा. **श्लोक ४३. सुकंठासि**–सुग्रीवास. **श्लोक ४४.** रामानें आपले पुत्र असें ओळखलें, तरी सुग्रीवाकडून तो पुनः खात्री करून घेतो. **वाळीबंधो**–वाळीच्या भावा ! सुग्रीवा ! **दावा**–भांडण, युद्ध. **निवेदावे**–सांगावे. **श्लोक ४५.** हे कुमार तुझ्याच प्रतिमा असाव्या असें सुग्रीव रामाला सांगतो. **प्रतिबिंब**–प्रतिमा. **श्लोक ४६.** असें

असूनही कुश-लवाशीं युद्ध करण्याबद्दल सुग्रीव, रामाची आज्ञा मागतो. **दशास्यमृति इ०**–" रावणाच्या वधापासून मला युद्धाची इच्छा आहे. **भक्तकाम-सुरपादपराज**–भक्तांची इच्छा पूर्ण करणाऱ्या कल्पवृक्षश्रेष्ठा ! रामा ! **ओळ ४–आजी**–युद्ध. **श्लोक ४७.** रामानें सुग्रीवाला युद्ध करण्यास आज्ञा दिली. या युद्धांत सुग्रीव मूर्च्छित झाला. **त्यांहीं**–कुशलवांनीं. कुशलवांनीं त्या वृक्षाचे आपल्या बाणांनीं कोट्यावधि तुकडे केले. **तद्वक्षोरक्त**–सुग्रीवाच्या हृदयांतील रक्त. **शरतति**–शरमालिका. कुशलवांनीं सुग्रीवाच्या हृदयांतील रक्त जसें आपल्या शरमालिकेस दिलें, तसाच त्याचा देह देखील पृथ्वीला दिला. येथें कारकदीपक अलंकार होतो. सुग्रीवाचें रक्त त्यांनीं आपल्या बाणांना पाजलें व त्याला भूमीवर पाडला. **ओळ ४**–मूर्च्छेनें जणूकाय सुग्रीवाच्या प्राणांचीच याचना कुशलवाकडे केल्यामुळें, तिच्या हातीं ते प्राण त्यांनीं दिले. सुग्रीवाला त्यांनीं मूर्च्छित पाडलें असा अर्थ. **श्लोक ४८. ओळ २**–अन्वय–क्रोधाला मनांत धरुनी ( व ) हस्तीं तरुला धरुनी ( तो ) खांगणीं उडे. येथेंही कारकदीपक आहे. नीळ क्रोधाविष्ट होऊन व हातांत वृक्ष घेऊन आकाशांत उडाला. **ओळ ३**–यांत देखील कारकदीपक आहेच. **धरारुहें**–वृक्षानें. पाणिद्वये बाहूसि ताडी = हातानें शत्रू मारला. **ओळ ४,** अन्वय–हाही खंडितद्रु सानुज कुश, तद्वक्षासि स्वयें बाणें ( ताडी ). झाडाचे ज्यानें तुकडे केले आहेत अशा कुशानें नीळाच्या हृदयावर आपल्या बाणानें प्रहार केला. **खंडितद्रु**–( बहुव्रीही समास ). खंडित केला आहे द्रु ( झाड ) ज्यानें असा. **श्लोक ४९.** नीळाच्या हृदयापासून जे रक्तबिंदु जमिनीवर पडले, त्यांपासून आणखी नीळ प्रगट झाले. त्यांच्यावरही कुशानें बाण सोडले. त्यांच्या रक्ताच्या धारांपासून आणखी मोठ्या शरीराचे नीळ उत्पन्न झाले. अशा प्रकारें पर्वत, वृक्ष यांसह पृथ्वी व आकाश यांमध्येंही न मावणारा नीळांचा मोठा समुदाय उत्पन्न झाला. **महाकायनीळात्ममाता**–मोठ्या शरीराच्या नीळांच्या माता, विशालदेही नीळ उत्पन्न करणाऱ्या ( धारा ). मूळच्या एका नीळापासून अनेक नीळ उत्पन्न झाले असा भाव. **श्लोक ५०.** रक्तबिंदूपासून नीळ उत्पन्न होत आहेत असें पाहून, कुशानें हा प्रकार थांबविण्यासाठीं जलौकास्त्र ( जळवा उत्पन्न करणारें अस्त्र ) योजलें. **त्यांच्या इ०**–रक्तबिंदूपासून उत्पन्न झालेल्या नीळांच्या शरीराला अनेक जळवा लागून, ते सर्व नीळ, रक्तरहित झाले. मग ते सर्व नीळ मूळच्या नीळासह बाणांनीं युक्त असे भूमीवर पाडले

१०

गेले. अशा प्रकारें रक्तहीन झाल्यामुळें, कोड भरल्याप्रमाणें पांढरे फटफटीत झालेल्या सर्व नीळांनीं युद्धाकरितां थोडी धडपड केली, पण त्या सर्वांनांच कुशाकडून यमसदनाला पाठविण्यांत आलें. **श्लोक ५१.** गुणज्ञ लोकांनीं कुशाचा पराक्रम पाहून त्याची वाहवा केली. **मा**–तुझा पक्ष लक्ष्मी धरो, लक्ष्मी तुझ्या बाजूला असो, तुला जयश्री मिळो. **ओळ ३, क्षमाबळ इ०**–क्षमा + बळ + पराक्रम + तेज (द्युति) + यश यांचा सांठा असा तूं, उदारांचा राजा (वदान्यपति) हो. **सुहृत्सर्वदा**–मित्रांना सर्व कांहीं देणाऱ्या! **श्लोक ५२.** त्या कुशलवांकडून भ्यालेलें रामाचें सैन्य अरण्यांत शिरलें (पळालें). इकडे लवकुशांचें यश लोकांत शिरलें (पसरलें), व त्यांचे गुण अप्सरांच्या तोंडांत शिरलें. (अप्सरा त्यांचे गुणगान करूं लागल्या). येथेंही 'शिरे' या एका क्रियापदानें कारकदीपकालंकार साधला. हा अलंकार संक्षेपाच्या दृष्टीनें पंतांचा आवडता दिसतो. **श्लोक ५३.** आपलें सैन्य पळालेलें पाहून रामाला राग आला. **रघूद्वह**–रघुश्रेष्ठ, राम. **ओळ २.**–रामाच्या भीतीनें पीडित झालेली पृथ्वी, आपला भार ज्यानें सहन केला आहे, त्या शेषाला कांपवती झाली. पृथ्वी धारण करणाऱ्या शेषाचे डोकेंहि चलित झालें. इतका रामाच्या भीतीचा प्रताप. **ओळ ३**–पुष्कळ दिवसांचा सांठविलेला आपला यशसंचय (चिरसंचितोत्तम यशस्तोम) आपल्या देखत (कुशानें) हरण केलासें पाहून, राम म्हणाला. **श्लोक ५४.** "प्रलयकालच्या अग्नीसारख्या तेजाचे बाण दोरीला जोडून रामानें आपलें धनुष्य कानापर्यंत ओढलें. त्या कुमारांवर ते बाण त्यांनीं आपल्या कृपेसह सोडले." **ओळ ३**–याला समानार्थक पहा–"तां विलोक्य वनितावधे घृणां पत्रिणा सह मुमोच राघवः । रघु० ११।१७. **श्लोक ५५.** **सत्वरतातें**–सत्वस्थ अशा कुशास. **क्षुरप्र**–बाण. **तातें**–पित्यानें (रामानें). **बाणांशीं इ०**–कुशाच्या व रामाच्या बाणांची स्पर्धाच लागली होती. रामानें सोडावे व कुशानें ते तोडावे, असा प्रकार चालला होता. **श्लोक ५६. प्रावण्मेघ**–वर्षाकालांतील मेघ. **असारा**–बलरहिता. **ते**–कुशलव. **ओळी ३।४** रामांनीं त्यांच्यावर बाणांचा वर्षाव केला, तोंच त्यांनीं त्या बाणांचे सहज तुकडे करून, ते जमिनीवर पाडले, व कित्येक आकाशांत उडविले. रामाच्या बाणांचें त्या कुमारांना कांहीं वाटलें नाहीं. **व्योमस्थ**–आकाशांतील. **श्लोक ५७.** रामाचे बाण कुशलवाशीं युद्धांत कसे निष्फळ झाले, याला उपमा दिल्या आहेत. **निर्धनलोक इ०**–दरिद्री लोकांचे मनोरथ, चिक्कू माणसाचें घर, व शरदृतूंतील मेघ यासारखे. हे

जसे निष्फळ असतात तसे रामाचे बाण निष्फळ झाले. **श्लोक ५८. रण**–युद्ध. **दारकयुग्मासवें**–दोन पुत्रांबरोबर. **खरतरशर इ०**–प्रखर बाण धरणाऱ्या करकमलानें. **गुणाचयारामें** – गुण + आचय + आरामें = गुणसमूहाच्या उद्यानानें ( रामानें ). **श्लोक ५९.** "त्यांचें ( कुशालवांचें ) बळ आपल्या इतकेंच आहे हें राम, मनांत समजला. आपला बाण त्यांना स्पर्शही करीत नाहीं, ( उलट ) आपणच त्यांच्या बाणांच्या कक्षेंत येतों, हें पाहून तो संतापला." **श्लोक ६०.** जों जों राम त्या कुमारांच्या तोंडाकडे न्याहाळून पाहूं लागला, तों तों त्याला आपल्या पत्नीचें स्मरण होऊं लागलें. **जानकीजानी**–जानकी ज्याची जाया आहे असा ( राम ). **ओळ ३**–अशा आणीबाणीच्या प्रसंगीं ( रंध्रीं ) रामाला आपल्या पत्नीची आठवण होण्यास व तिच्या पुत्रांनीं रामाच्या हृदयावर बाणांचे प्रहार करण्यास एकच ( एकामेंचि ) गांठ पडली. **एकामें**–एकदम. **श्लोक ६१.** राम मूर्च्छा पावतात. **उरःक्षत इ०**–उरावर झालेल्या जखमेंतून गळणाऱ्या पुष्कळ रक्तानें माखलें आहे शरीर ( विग्रह ) ज्याचें असा. **प्रमीलिताक्ष**–मिटलेले आहेत डोळे असा. **जगत्क्षयीं**–प्रलयकालीं. **सुराश्रुबिंदु इ०**–देवांच्या अश्रुबिंदुमालिकेसह. राम रथांत पडले तोंच देवांनीं अश्रू गाळले. **लेख**–देव. देवांना दुःखी झालेले पाहून कुशलवांना ( त्यांसही ) आनंद वाटला. आपण देवांनाही दुःखित करूं शकलों, याचा त्यांना अभिमान-पूर्वक आनंद वाटला. **श्लोक ६२.** रामाच्या मूर्च्छेनें देवही दुःखित झाले. **पंक्तितुंडदंडदक्ष**–दशानन रावणालाही शिक्षा करण्यांत तत्पर आहे बाहुदंड ज्याचा असा राम. **किशोरकांड इ०**–( यःकश्चित् ) पोरांच्या बाणांनीं जखमी झालेलें आहे शरीर ( स्वपिंड ) ज्याचें असा झाला. **सतोक**–मुलांसह. दुःखित देवांनीं आपल्या मुलांसह पृथ्वीवर इतकी अश्रुवृष्टि केली कीं, ती गवत उगवण्यासही पुरेशी होती. **श्लोक ६३. मेदिनीमंडलातें**–भूमीवर. त्यांनीं रामाला रथावरून भूमीवर उतरून ठेवला. **स्रक**–हार. रामाच्या अंगावरील दागिने त्यांनीं हरण केले. **श्लोक ६४.** केकेयीसूनु ( भरत )+ मेघध्वनिरिपु ( लक्ष्मण )+लवणद्वेषण ( शत्रुघ्न ) इत्यादिकांच्या अंगभूषा ( अलंकार ). **करांहीं**–आपल्या हातांनीं. **अभय**–भयरहित. ( कुशलव ) पूषा (सूर्य) जसा दिव्याच्या तेजाचें आपल्या किरणांनीं (करांहीं) ग्रहण करतो, तसेंच कुशलवांनीं भरतादिकांच्या भूषणाचें आपल्या हातांनीं ग्रहण केलें. 'कर' हा शब्द येथें श्लिष्ट आहे. **ओळी ३।४.** जणु काय त्यांच्या शरीरावरील भार कमी व्हावा म्हणूनच इतर वीरांच्या अंगावरील भूषणेंही त्यांनीं काढून घेतलीं. **श्लोक ६५.** रामाच्या

रथाला पाहून लवाचें भाषण. **ब्रघ्न**–सूर्य. **स्यंदन**–रथ. **मरुन्नदनीं**–मारुतीवर. त्या कुमारांचें लक्ष मारुतीवर गेलें. **श्लोक ६६. प्लवग**–वानर. **कृत्रिममूर्च्छित**–इतरांची कुशलवांनीं केलेली दशा पाहून जांबवान् व मारुति यांनीं मूर्च्छेचें सोंग घेतलें होतें. **श्लोक ६७.** जांबवानाला व मारुतीला घरीं नेऊन आईला दाखविण्याचा लवाचा बेत ऐकून मारुति म्हणतो. **लवें**–क्षणांत. **मूर्च्छाग्रस्तात्म**–मूर्च्छेनें व्यापलें आहे शरीर ज्यांचें असे रामादि. **ओळ ४.** आतां डोळें झांकून पडावें हें बरें. ( काय होईल तें होवो ). आपणास काळ कांहीं यश देणारा दिसत नाहीं. **श्लोक ६८.** मारुतीचें भाषण. **त्रिजगज्जयार्ह**–यांच्या लक्षणावरून हे ( कुशलव ) तीन्हीं जगांना जिंकण्यास समर्थ आहेत, असें मला वाटतें. **संदिग्ध**–संशयास्पद. **जिणें**–जगणें. **ओळ ४.** सीतेच्या समोर ( आम्हांस नेल्यास ) आज शस्त्राशिवाय ( लाजेनें ) मृत्यु ( पंचत्व ) येईल. **श्लोक ६९. उपांशु**–हळुच. **श्वसनसुत**–वायुपुत्र, मारुति. पहिल्या ओळींत 'स्तब्ध' बद्दल काव्येतिहाससंग्रहाचा 'शब्द' असा पाठभेद आहे. **श्लोक ७०.** सीतेनें पुत्रांनाच केवळ हृदयाशीं घट्ट धरलें नाहीं, तर आनंदालाही तिनें हृदयाशीं धरलें. पुत्रांना आलिंगून तिला आनंद झाला असा भाव. **ओळ २.** तिच्या ठिकाणीं कारुण्य व शोक असे दोन्ही भाव प्रकट झाले. **श्लोक ७१.** आलिंग दिल्यानंतर पुत्रांना जसें तिनें सोडलें, तसेंच दुःखालाही सोडलें. आलिंगनानें तिचें दुःख नष्ट झालें. येथें सहोक्ति अलंकार होतो. **सुततनु इ०**–( आपल्या ) पुत्रांच्या अंगावर शत्रूंनीं केलेल्या जखमा पाहून ती जितकी आनंदित झाली तितकीच भ्याली. सीता, ही वीरपत्नी व वीरमाता असल्यानें, पुत्रांच्या जखमा पाहून त्यांच्या पराक्रमानें तिला आनंद झाला. पण त्याच जखमा पाहून तिचें मातृहृदय भ्याल्याशिवाय राहिलें नाहीं. **श्लोक ७२.** लव, सीतेला कुशाचा पराक्रम वर्णन करून सांगतो. **यमुनाबंधुगेहासि**–यमसदनास. कुशानें रामालाही मूर्च्छित केल्याचें लव आपल्या आईस सांगतो, व त्याचीं आणलेलीं भूषणेंही दाखवितो. **श्लोक ७३.** मारुतीला व जांबवानाला घरीं आणल्याचें लव सीतेस सांगतो. **क्षय**–नाश, घर. **श्लोक ७६. हरीतें**–वानरांना. **लवानें**–क्षणांत. **वदान्या**–उदार. **श्लोक ७७. वरुणसदन**–समुद्र. **मुनी**–वाल्मीकि. **हे दोघे**–कुशलव. **सुरविटपि इ०**–कल्पवृक्षाच्या गर्वाचा नाश करणाऱ्या (हातांनीं). इच्छित वस्तु देण्यांत कल्पवृक्षालाही पाठीमागें सारणाऱ्या हातांनीं, कुशलवांनीं आपण शत्रूचें सैन्य कसें जिंकलें व रामाला कसा मूर्च्छित केला हें वृत्त सांगितलें. **श्लोक ७८. गंगानीर इ०**–गंगेच्या पाण्याचें पवित्र नाम ( महिमा ) कमी

करणाऱ्या प्रेमाश्रुजलानें, वाल्मीकींनीं कुशलवावर वृष्टि केली. वाल्मीकीचे प्रेमाश्रु गंगाजलापेक्षांही पवित्र होते, असा भाव. **सुतनिर्विशेष**–पोटच्या पुत्रासारखीं. **श्लोक ८०.** कुशलवांच्या पराक्रमानें वाल्मीकि संतुष्ट झाले, पण त्यांनीं रामांना मूर्च्छित केलें हें त्यांस बरें वाटलें नाहीं. **श्लोक ८१. विप्रव्रात**–ब्राह्मणसमूह. **श्लोक ८२. त्रैलोक्याभर**–‘ विश्वांत भरलेला ’, असा अर्थ काव्यसंग्रहकारांनीं दिला आहे. पण ‘ त्रैलोक्यभर ’ असा शब्द असणें व्याकरणदृष्ट्या योग्य होतें. त्यापेक्षां ‘ त्रैलोक्यामर ’ असा पाठ घेऊन त्रैलोक्यांत अमर झालेला ( बाळविक्रम ) असा अर्थ करणें अधिक युक्त वाटतें. **लेखिला**–मानला. वाल्मीकीनें रामापासून सर्व मूर्च्छित पडलेल्या वीरांवर मंतरलेलें पाणी शिंपलें. **जनेप्सित करें**–लोकांचे इच्छित करणाऱ्या ( करें ). **पुण्यामृतैकाकरें**–पुण्यरूपी अमृताची एकमेव खाण अशा ( करें ). **श्लोक ८३. सुप्तोत्थिताचेपरि**–झोंपेंतून उठलेल्या प्रमाणें. आपला मृत्यु टाळला म्हणून रामानींही वाल्मीकींना हात जोडले. **श्लोक ८४. अजाला**–जन्मरहित रामाला. **लेखकांत**–देवांचा राजा, इंद्र. **धिषण**–बृहस्पति. बृहस्पतीनें इंद्राशीं जसें बोलावें, किंवा पित्यानें पुत्राशीं जसें बोलावें, तसा तो वाल्मीकि रामाशीं बोलला. **श्लोक ८५.** वाल्मीकीचें भाषण. **ससत्वा**–गरोदर. **यूपार्थ**–यज्ञस्तंभासाठीं. **शुद्धसत्वा**–शुद्धचरित्रा. **अजतनुजवधू**–दशरथाची सून. **त्राण**–रक्षण. **तनुवचनमनें**–कायावाचामनानें. ओळ २. समानार्थक पहा–शिष्यादिच्छेत् पराजयम् । शहाण्या लोकांना शिष्य किंवा पुत्राकडून पराजय घडला असतां दुःख वाटत नाहीं. **त्वद्विप्रयोग इ०**–तुझ्या वियोगाच्या प्रखर अग्निज्वालांनीं तापलेला आहे देह जिचा अशी ( स्वयोषा ). **स्वयोषा**—आपली कांता. **श्लोक ८७. अमर्त्यजन**–देव. **कुसुमवर्षे**–कुसुमवृष्टीनें. **प्रेमाश्रुशीकर**–प्रेमाश्रूंचे बिंदु; शिडकाव. **श्लोक ८८.** सीता व रामांचा पुनःसंयोग झाल्यामुळें सर्वत्र पसरलेल्या आनंदमय वातावरणाचें वर्णन. **भैरीचि**–बहिरीच. **जगती**–पृथ्वी. **श्लोक ८९. विष्टपीं**–जगांत. **सर्षि**–ऋर्षिसहित. **जगत्संभवाद्यें**–जगाच्या उत्पत्तीच्या पूर्वीच्या अशा रामानें. **श्लोक ९०. यज्ञ** अश्वमेध. **अवभृथस्नान**–यज्ञसमाप्तीनंतरचें स्नान. **द्रव्यनाथ**–कुबेर. रामांनीं दिलेल्या धनानें ब्राह्मण इतके तृप्त झाले कीं, कुबेरालाही ते तुच्छ मानूं लागले. इतकें द्रव्य रामांनीं ब्राह्मणांना दिलें. **श्लोक ९१.** यांतील सामासिक शब्द, रामाचीं विशेषणें आहेत. **रावणपीडित इ०**–रावणानें पिडलेल्या त्रिभुवनाच्या दुःखाचा नाशहेतु अशा ( देवें ). **ब्रह्मप्रार्थित इ०**–

ब्रम्हदेवानेंही वंदिलीं आहेत दोन पदकमलें ज्याचीं अशा ( देवें ). **मायामानुष इ०**–मायेसाठीं धारण केलें आहे मनुष्यशरीर ज्यानें. **कृतमहारक्षः इ०**–मोठमोठ्या राक्षसांच्या समूहाला केला आहे दंड ( निग्रह ) ज्यानें. **अनुग्रह**–कृपा. **निर्दोषलीलागृहें**–पुण्यकृत्यांचें माहेरघर अशानें. **श्लोक ९२. सुखाकरें**–सुखाची आगरें, सुखाच्या खाणीं. **एनस्तमोहस्करें**–पापरूपीं अंधकाराच्या सूर्यानें. **अहस्कर**–सूर्य. **भक्तापदातस्करें**–भक्तांच्या दुःखांचा चोर अशानें. भक्तांचीं दुःखें निवारण करणाऱ्या ( रघुवरें ). **ओळ ३**–रामांनीं जीं अनेक सुचरितें केलीं त्यांचा थोडा भाग मोठ्या प्रमुदित मनानें मयूरकवीनें येथें ( कुशलवाख्यानरूपानें ) वर्णिला आहे. **ओळ ४.** रामचरित्राच्या वर्णनापेक्षां दुसरें श्रेष्ठतर कार्य या जगांत या क्षणभंगुर अशा नरदेहाकडून होणें नाहीं. मोरोपंतांनीं येथें आपल्या जीविताचें ध्येयच सांगून टाकलें आहे. हीच या ग्रंथाची फलश्रुति.

# कठीण शब्दांचा कोश.



## अ

अक्लेद्य—न भिजणारा.
अज—जन्मरहित असा.
अजिन—कातडें.
अध्वन्—मार्ग.
अधर—खालचा ओठ.
अनवद्य—अनिंद्य.
अनळ—अग्नि.
अनेकपक—हत्ति.
अनुज—धाकटा भाऊ.
अपांग—कटाक्ष.
अब्धि—समुद्र.
अभिराम—सुंदर.
अमरापगा—देवनदी, गंगा.
अमुत्र—परलोकीं.
अर्क—सूर्य.
अर्ह—योग्य.
अलीन—भ्रमर.
अवतंस—तुरा.
अवभृथ—यज्ञसमाप्तिदर्शक.
अशनि—वज्र.
अशिवा—अशुभ.
अस्रालि—अश्रुपंक्ति.
असकृत्प्रज—डुकर.
असार—बलरहित.
असि—तरवार.

## आ

आतळणें—स्पर्शणें.
आजी—युद्ध.
आपगा—नदी.
आम्नाय—वेद.
आराम—बाग.
आलपन—भाषण.
आलोक—दर्शन.
आशय—मनोगत, हात.
आशुग—बाण.
आश्रयाश—अग्नि.
आश्लेष—आलिंगन.
आसादणें—प्राप्त करणें.
आस्य—तोंड.
आहव—युद्ध.

## इ

इभ—हत्ति.
इषु—बाण.
इंधन—सर्पण.

## उ

उटज—पर्णशाला.
उडु—नक्षत्रगण.
उडुप—चंद्र.
उपनय—मुंज.
उपांशु—हळुच.

### ऋ

**ऋक्ष**–अस्वल.

### ए

**एनस्**–पाप.

### ओ

**ओक**–घर, वमन.

### अं

**अंघ्रि**–पाय.
**अंघ्रिसारस**–पदकमल.
**अंतर्वत्नी**–गर्भिणी.
**अंबर**–आकाश, वस्त्र.
**अंशुक**–वस्त्र.

### क

**कटक**–सैन्य, कडें.
**कपर्दी**–शंकर.
**कबंधें**–धडें.
**कर**–किरण, हात.
**करट**–कावळा.
**करमाली**–सूर्य.
**कलाप**–समूह.
**कलेवर**–शरीर.
**कश्मल**–मूर्च्छा.
**काकपक्षधर**–झुलपें धारण करणारे.
**काण्ड**–बाण.
**कानन**–अरण्य.
**कार्तस्वर**–सोनें.
**कार्मुक**–धनुष्य.
**काष्ठा**–दिशा.
**कीनाश**–यम.
**कील**–शस्त्र.
**कुन्त**–भाला.
**कुम्भोद्भव**–अगस्ति.
**कूटसाक्ष**–खोटी साक्ष.
**कृपाण**–तरवार.
**केयूर**–बाहुभूषण.
**केली**–क्रीडा.
**कोमले**–कोमेजले.
**कौशिक**–घुबड.
**कंबुकंधर**–शंखासारखी मान आहे अशी.
**क्रतु**–यज्ञ.

### ख

**खनी**–खाण.
**खांगण**–आकाश.

### ग

**गणिका**–वेश्या.
**गहन**–वन.
**गिरीश**–शंकर.
**गी**–सरस्वती.
**गुह**–कार्तिकेय.
**गृष्टि**–नुकतीच व्यालेली गाय.
**गोमायु**–कोल्हा.
**गोक्षुर**–सराटे.

### घ

**घटदोहनी**–घागरभर दूध देणाऱ्या.
**घटा**–समूह.
**घोटक**–घोडा.

### च

**चमरी**–वनगाय.

चमू–सेना.
चषक–पेला.
चर्म–ढाल.
चार–हेर.
चिक्कण–चिकट.
चुबुक–हनुवटी.

छ

छद–पान.
छल–मिष.
छात्र–शिष्य.

ज

जनि–जन्म.
जन्य–युद्ध.
जलौका–जळू.
जंबूक–कोल्हा.

त

तति–पंक्ति.
तनुत्राण–चिलखत.
तरणि–सूर्य, नौका.
तरंग–लाटा.
तस्कर–चोर.
तालवृंत–ताडाचा पंखा.
तूण–भाता.
तूर्ण–सत्वर.
तोक–बालक.
त्रपा–लाज.
त्रिदश–देव.
त्रिविष्टप–त्रिजगत्.

द

दव–अरण्य.
दानोदक–हत्तीचा मद.
दाम–हार.
दार–पत्नी.
दारक–पुत्र.
दिनकृत्–सूर्य.
दुरित–पाप.
दुष्प्रधर्ष–मर्दन करण्यास अशक्य.
देवर–दीर.
दोहद–डोहाळे.
दंडक–मार्ग.
दंतवस्त्र–ओठ.
दंती–हत्ती.
द्युतिकर–तेजस्वी.
द्रविण–द्रव्यें.
द्रु–वृक्ष.
द्विजवर–पक्षिश्रेष्ठ.
द्विजिव्ह–सर्प.
द्विट्–शत्रु.
द्विरद–हत्ती.

ध

धनुश्श्रुति–धनुर्वेद.
धर्म–यम.
धव–पति.
धात्री–पृथ्वी.
धिषण–बृहस्पति.
धुनि–नदी.

**ध्वजिनी**—सेना.
**ध्वान**—ध्वनि.

**न**

**नरमारी**—महामारी.
**नवनीत**—लोणी.
**नश्वर**—नाशवंत.
**नाक**—स्वर्ग.
**नाग**—हत्ती.
**निकर**—समूह.
**निकाय**—घर.
**निदेश**—आज्ञा.
**निमाले**—मेले.
**निर्जर**—देव.
**निशित**—तीक्ष्ण.
**निशीथ**—मध्यरात्र.
**निशीन**—चंद्र.
**निषंग**—भाता.
**निष्क**—पदक.
**नीरद**—मेघ.
**नंदिनी**—कन्या, कामधेनूची मुलगी.

**प**

**पत्ति**—पायदळ.
**पत्र**—वाहन.
**पद्मिनीपति**—सूर्य.
**पयोधर**—स्तन, मेघ.
**पलल**—मांस.
**पवि**—वज्र.
**पावक**—अग्नि.
**पाथेय**—शिदोरी.
**पिशित**—मांस.
**पुरोधा**—पुरोहित.
**पुस्तें**—ग्रंथ.
**पूषन्**—सूर्य.
**प्रकृति**—प्रजा.
**प्रत्यर्थी**—शत्रु.
**प्रत्यूह**—संकट.
**प्रजा**—संतति.
**प्रजावती**—भावजय.
**प्रसु**—आई.
**प्रसून**—पुष्प.
**प्लवग**—वानर.
**पंकिल**—पापी.
**पंचमुख**—सिंह.
**पांसुल**—जारिणी.
**पुंज**—समूह.

**ब**

**बळरमण**—सेनापति.
**बाणासन**—धनुष्य.
**बिडाल**—मांजर.
**ब्रध्न**—सूर्य.

**भ**

**भट**—योद्धे.
**भल्लू**—कोल्ही.
**भसित**—भस्म.
**भारती**—वाणी.
**भास्वत्**—सूर्य.
**भुजग**—सर्प.
**भुशुंडी**—एक अग्न्यस्त्र.

भूरुह–वृक्ष.
भेरी–नगारा.
भैरी–बहिरी.
भ्रूणहत्या–बालहत्या.

म

मख–यज्ञ.
मरकत–पाच. ( रत्न )
मराळ–हंस.
मर्त्यदेव–राजा.
मलीमस–पापी, अशुद्ध.
मा–लक्ष्मी.
मातंगज–हत्ति.
मुग्धा–स्त्रिया.
मुद्गर–गदा.
मूर्धज–केस.
मूषक–उंदीर.
मृगराट्–सिंह.
मौर्वी–धनुष्याची दोरी.
मंजूषा–पेटी.

य

यम–जुळे.
युग–जोडी.
यूथ–कळप.
यूपस्तंभ–यज्ञस्तंभ.
योषा–पत्नी.

र

रजक–परीट.
रदी–हत्ती.
रश्मि–किरण.
रसना–जीभ.
राजि–पंक्ति.
रामा–स्त्री.
रुक्म–सोनें.
रुट्–क्रोध.
रुरु–हरिण.
रंभा–केळ.

ल

लपन–मुख.
लास्य–नाचणें.
लेख–देव.
लोकबंधु–सूर्य.
लोहित–तांबडें.

व

वक्त्र–मुख.
वदान्य–उदार.
वन–पाणी, अरण्य.
वयस्य–मित्र.
वर्म–कवच.
वरारोहा–उत्तम आहे कंबरेखालचा भाग जिचा अशी.
वलीमुख–वानर.
वल्मीक–वारुळ.
वसुमति–पृथ्वी.
वामी–प्रतिकूल.
वारण–हत्ति.
वाह–घोडा.
वाहिनी–नदी, सेना.
विग्रह–शरीर.

**विटपि**—वृक्ष.
**वितरण**—दान.
**वितंद्र**—आळसरहित.
**विनागस**—निष्पाप.
**विपाक**—परिणाम.
**पिपिन**—अरण्य.
**विप्रयोग**—वियोग.
**विशिख**—बाण.
**वृक**—लांडगा.
**वृत्रहा**—इंद्र.
**वेपथु**—कांपरें.
**व्यजन**—पंखा.
**व्यसुता**—मरण.
**व्योम**—आकाश.
**व्रज**—समूह.
**व्रतति**—लता.

**श**

**शक्ति**—स्त्री.
**शफरी**—मत्सी.
**शब्दब्रह्म**—वेद.
**शमन**—यम.
**शय**—हात.
**शरण**—रक्षक.
**शरासन**—धनुष्य.
**शर्म**—सुख.
**शाखामृग**—वानर.
**शार्दूल**—वाघ.
**शिखी**—मोर, अग्नि.
**शिलीमुख**—बाण, भ्रमर.
**शिवा**—कोल्ही.
**शीकर**—बिंदु.
**शोणित**—रक्त.
**शम्**—सुख.
**श्येन**—ससाणा.
**श्राद्धदेव**—यम.
**श्वश्रू**—सासू.

**स**

**सकृत्**—एक वार.
**सत्वसंपन्ना**—गर्भिणी.
**सत्वें**—श्वापदें.
**सदागति**—वारा.
**सादी**—घोडेस्वार.
**सद्म**—घर.
**सानु**—पर्वत.
**सन्नत**—नम्र.
**समा**—वर्षें.
**समजित**—युक्त.
**समुदित**—तयार.
**सरणि**—मार्ग.
**सस्य**—धान्य.
**साकेत**—अयोध्या.
**सारंग**—चित्रमृग, चातक पक्षि.
**सुधर्मा**—देवसभा.
**सुरतटिनी**—गंगा.
**सुरभि**—गाय.
**सौरभ**—सुवासिक.
**संकुल**—व्याप्त.
**संगर**—युद्ध.

संदोह–समूह.
संसृति–संसार.
स्तोम–समूह.
स्तंबेरम–हत्ति.
स्थविर–वृद्ध.
स्नपन–स्नान.
स्मर–आठवण.
स्मश्रुल–मिशाळ.
स्यंदन–रथ.
स्रक्–हार.
स्वांत–मन.
स्वाहेश–अग्नि.

ह

हरि–घोडा, वानर.
हर्यक्ष–सिंह.
हायन–वर्ष.
हिरण्य–सोनें.

क्ष

क्षय–घर.
क्षरणें–स्रवणें.
क्षितिध्र–पर्वत.
क्षिप्र–लवकर.
क्षुरप्र–बाण.
क्ष्मादेव–ब्राह्मण.